


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








संपादक –
शंकर सारडा

अंक – २५४ : जुलै ते सप्टें. ९०
" २५५ – ऑक्टो. ते डिसें. ९०
" – २५६ – जाने. ते मार्च ९१
(१९९० सा. आस्वाद विशेषांक)
" २५७ – एप्रिल ते जून ९१

९०-९१ – वार्षिक कार्यवृत्त
हिशेबपत्रके
९१-९२ – अर्थसंकल्प

अंक २५५ – ऑक्टोबर – डिसेंबर १९९०
दिवाळी अंक
(काव्य विशेषांक)

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २५४– जुलै-सप्टेंबर १९९०

(म. रा. साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत)

**संपादक : शंकर सारडा**
संपादक मंडळ : डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. वीणा देव,
डॉ. वसंत सावंत, प्रा. चंद्रकुमार नलगे

या अंकाची किंमत : १० रुपये
वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी : ४० रुपये)

मुखपृष्ठ : लक्ष्मीकांत तोष्णीवाल, पुणे

मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स १०१९, सदाशिव, पुणे ४११०३०
टाईपसेटिंग : प्रमोद वि. बापट, प्रमोद प्रिंटर्स, ११२०, सदाशिव पेठ, पुणे ३०.

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

# संपादकीय

*मित्रहो,*

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा एक विदर्भ विशेषांक काढण्याची कल्पना मनात होती. त्या दृष्टीने अनेकांशी पत्रव्यवहारही झाला. अमरावती-नागपूरला समक्ष काही समीक्षक/प्राध्यापकांशी ' चर्चाही झाली. अनेकविध कल्पना पुढे आल्या. वैदर्भीय संस्कृती-प्रकृतीचे वेगळेपण तेथील वाङ्मयात कसे उतरले आहे, याचा मागोवा घेणे, विदर्भात वैयक्तिक पातळीवर मोठे संशोधनकार्य व दीर्घकालीन प्रकल्प हाती घेणारे महानुभाव अनेक असले तरी सुसूत्रपणे मोठे काम हाती घेणाऱ्या संस्थांची परंपरा पुण्यामुंबईच्या मानाने क्षीण का दिसते याची चिकित्सा करणे, वैदर्भीय लेखक पुण्या-मुंबईला गाजले म्हणजे विदर्भात त्यांना मोठेपणा मिळतो या समजुतीत कितपत तथ्य आहे याची तपासणी करणे, सध्या विदर्भात चाललेल्या संशोधनाची व नवनिर्मितीची वैशिष्ट्ये स्पष्ट करणे वगैरे विषय सुचवण्यात आले; परंतु त्या दृष्टीने ठराविक मुदतीत लेखन करणाऱ्यांची साथ न मिळाल्याने जे काही आढावावजा लेख आले तेच या अंकात देऊन समाधान मानावे लागत आहे. बहुसंख्य प्राध्यापक हे आपल्या ॲकॅडमिक व परिसंवाद, चर्चासत्रे इ. कामात इतके मग्न असतात की, आपल्या चाकोरीबाहेरचा एखादा विषय घेऊन त्यावर काही लिहावे म्हटले तर वेळ काढू शकत नाहीत, असा अनुभव सध्या येतो. एम.फिल, पीएच.डी. यांमुळेही अनेकजण व्यस्त असतात. साहजिकच अभ्यासपूर्ण लेखनाचे आव्हान व आवाहन वाया जाते. या अंकात दिलेल्या वैदर्भीय वाङ्मयाच्या आढाव्यापैकी डॉ. काळे यांचा लेख एका स्मरणिकेत येऊन गेलेला आहे. काही विशिष्ट लेखकांच्या वाङ्मयाचे अंतःप्रवाह शोधण्याच्या प्रयत्नालाही प्रतिसाद मिळाला नाही, परंतु वैदर्भीय लेखकांच्या कामगिरीची धावती रूपरेखा या लेखांमुळे वाचकांपुढे स्पष्ट होईल हे निश्चित ! या सर्व लेखकमित्रांना धन्यवाद.

**वर्धापनदिन**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ८४ वा वर्धापनदिन दि. २७ मे १९९० रोजी उत्साहाने संपन्न झाला. लोकसत्ताचे लोकाभिमुख संपादक माधव गडकरी हे प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. हैद्राबादचे एक निष्ठावंत संशोधक-प्राध्यापक डॉ. श्री. रं. कुलकर्णी यांना साहित्य परिषदेचा रुपये ३००० चा पुरस्कार देण्यात आला. साहित्यिक साहाय्य निधीतून कथाकार बाबा पाटील यांना साहाय्य देण्यात आले आणि डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कारासाठी ग्रंथचळवळीतील एक कार्यकर्ते अ. ल. लिमये यांची निवड करण्यात आली. या सर्वांची मनोगते हृदयस्पर्शी

होती. आपल्या आयुष्यभरच्या व्यासंगाची व कामाची पावतीच साहित्य परिषदेने दिली अशी सर्वांची भावना होती.

**विक्रमी वाचकवीर १९८९**

याच समारंभात 'विक्रमी वाचकवीर' या स्पर्धेतील यशस्वी विजेत्यांची नावे जाहीर करण्यात आली. ग्रंथवाचन संस्कृतीचा सध्या दूरदर्शन-व्हिडिओ-चित्रपट-नियतकालिके यांच्या प्रभावामुळे ऱ्हास होत आहे. वाचनाची प्रवृत्ती कमी होत आहे. नव्या पुस्तकांकडे ज्या अगत्याने पाहायला हवे, त्याचा अभाव आढळतो. हे लक्षात घेऊन नवीन पुस्तकांबद्दल आस्था व जागृती निर्माण व्हावी यासाठी विक्रमी वाचकवीर ही अभिनव योजना साहित्य परिषदेने राबवण्याचे ठरवले. १९८९ मध्ये प्रसिद्ध झालेली किमान शंभर पुस्तके ज्यांनी वाचली आहेत अशाच वाचकांसाठी ही स्पर्धा होती. तीन यशस्वी स्पर्धकांना प्रत्येकी ५०० रुपयांची पुस्तके आणि विक्रमी वाचकवीर सन्मानपत्र द्यावे अशी कल्पना होती. पुण्यातील मेहता पब्लिशिंग हाऊसचे अनिल मेहता, श्री विद्या प्रकाशनचे मधुकाका कुलकर्णी आणि राजहंस प्रकाशनचे दिलीप माजगावकर यांनी प्रत्येकी ५०० रु. ची आपली पुस्तके विजेत्यांना देण्याला होकार दिला. त्यानुसार अनिल बळेल (पुणे), सुशीला परांजपे (नाशिक), गो. म. दिंडोरकर (सोलापूर) यांची विक्रमी वाचकवीर १९८९ म्हणून निवड करण्यात आली. हा उपक्रम १९९० मध्येही चालू राहणार असून, १९९० मध्ये प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांपैकी किमान शंभर पुस्तके वाचणाऱ्या वाचकांना त्यात भाग घेता येईल. जानेवारी १९९१ अखेर अशा वाचकांनी आपली नावे व वाचलेल्या पुस्तकांची यादी साहित्य परिषदेला कळवावी. त्या वाचकांची चाचणी घेऊन तीन विक्रमी वाचकवीरांची निवड करण्यात येईल. या उपक्रमात जास्तीत जास्त वाचकांनी सहभागी व्हावे, त्यासाठी नव्या पुस्तकांचे वाचन सातत्याने करावे, असे आग्रहपूर्वक सांगावेसे वाटते.

**गो. नी. दांडेकर**

मराठीत स्वतःचे वेगळेच पीठ निर्माण करणारे बहुहुन्नरी साहित्यिक गोपाल नीलकंठ दांडेकर यांनी ८ जुलै १९९० रोजी अमृत महोत्सवी वर्षात पदार्पण केले. शितू, पडघवली, माचीवरला बुधा, जैत रे जैत, मृण्मयी, कुणा एकाची भ्रमणगाथा वगैरे त्यांच्या गाजलेल्या कादंबऱ्या. प्रत्येक कादंबरीचा विषय वेगळा, पोत वेगळा, भाषेचा बाज वेगळा. मोगरा फुलला, दास डोंगरी राहतो यासारख्या संतजीवनावरील कादंबऱ्याही अध्यात्मिक, सात्त्विकतेचा प्रत्यय देऊन जातात. रामायण-महाभारताचेही आपल्या खास शैलीत अप्पांनी रसाळ पुनर्निवेदन केले आहे. शिवकाळाचाही वेध त्यांनी घेतला. शिवरायांच्या तीनशेवर किल्ल्यांची पायी भ्रमंती करणारा अप्पांशिवाय दुसरा कोणी सापडणे मुश्किलच. अनुभवांची समृद्धी, स्त्रियांच्या दुःखाची खोल जाणीव, भारतीय परंपरेची रोमारोमात मुरलेली आदरभावना, माणसाच्या सुखदुःखाबद्दलची अपार सहानुभूती यामुळे दांडेकरांचे लेखन अंतःकरणाचा ठाव घेते. साधे दोन ओळीचे कार्डही त्यांचे खास व्यक्तित्व प्रकट करणारे असते. गेली दोन वर्षे अप्पांना प्रकृती

तेवढीशी साथ देत नाही. 'तुकाराम-ज्ञानेश्वरांची मराठी समजणारे वाचक झपाट्याने कमी होत चालले आहेत. इंग्रजीत शिक्षण घेणारी मुले मारुतीला मंकी गॉड आणि गणपतीला एलिफंट गॉड म्हणतात. माझ्या मायबोलीचे काय होणार ही खंत आहे. मायबोली मराठीला वाचवा.' असे मनोगत त्यांनी अमृतमहोत्सवप्रसंगी प्रकट केले. अप्पांना उर्वरित आयुष्य प्रकृतिस्वास्थ्याचे आणि सुखासमाधानाचे जावो अशीच प्रत्येक मराठी वाचकाची भावना आहे.

**शंवाकि**

महाराष्ट्रातील सामाजिक आणि सांस्कृतिक प्रबोधनाची ध्वजा समर्थपणे दोन तपांवर वाहून, मराठीतील नव्या लेखक-कवींची आणि विचारवंतांची अगत्याने पाठराखण करणारे शंकरराव किर्लोस्कर हे एक द्रष्टे संपादक होते. किर्लोस्कर, स्त्री व मनोहर या नियतकालिकांनी नव्या आधुनिक विचारप्रणालींचे स्वागत महाराष्ट्रात सुलभपणे व्हावे असे वातावरण निर्माण केले. अनेक पिढ्यांची वैचारिक व सांस्कृतिक जडणघडण केली. शंकरराव किर्लोस्करांची ही परंपरा पुढे मुकुंदराव किर्लोस्कर आणि सौ. शांताबाई किर्लोस्कर यांनीही तितक्याच निष्ठेने आणि उत्साहाने चालवली. आज या मासिकांचे प्रकाशन वेगळ्या स्वतंत्र संस्थेतर्फे होत असले तरी ही पूर्वपुण्याई पाठीशी आहेच. शंकरराव किर्लोस्कर यांच्या जन्मशताब्दीचे हे वर्ष. त्यानिमित्त गेले वर्षभर वेगवेगळ्या शहरांमध्ये कार्यक्रम चालू आहेत. १९२० ते १९८५ या ६५ वर्षांतील या नियतकालिकांच्या कामगिरीची ओळख घडवून देणारा 'गोष्ट पासष्टीची' हा ग्रंथ शांताबाईंनी परिश्रमपूर्वक लिहिला आहे. त्याचे प्रकाशन शंकरराव किर्लोस्कर स्मारक समितीतर्फे होणार आहे. शंकरराव किर्लोस्कर यांच्या द्रष्टेपणाचे आणि कर्तृत्वाचे विविध पैलू त्यामुळे नव्या प्रकाशझोतात झगमगून निघतील. शताब्दीच्या निमित्ताने त्यांच्या कार्याची ओळखही आजच्या पिढ्यांना होईल. जन्मशताब्दीनिमित्त त्यांना अभिवादन.

**पंडिता क्षमा राव**

संस्कृतच्या एक थोर साहित्यिक व अभ्यासक पंडिता क्षमा राव यांच्याही जन्मशताब्दीचे हे वर्ष आहे. त्यांनाही अभिवादन.

**मराठी साहित्य इंग्रजीत जाण्याची गरज**

डॉ. विलास सारंग यांच्या 'फेअर ट्री ऑफ व्हाइड' या निवडक कथांचा संग्रह पेंग्विन (इंडिया) ने प्रसिद्ध केला. ही एक उल्लेखनीय घटना म्हणावी लागेल. दिलीप चित्रे यांनी संत तुकारामाच्या शंभरेक अभंगांचेही इंग्रजीत भाषांतर केले आहे, त्याचेही पुस्तक पेंग्विनतर्फे येणार आहे. मराठीतील निवडक साहित्य हे इंग्रजीत भाषांतरित झाले तर त्याचा जगभरच्या वाचकांना परिचय होईल. लॅटिन अमेरिकन व अरब देशांतील वाङ्मयाचे इंग्रजीत भाषांतर होण्याची प्रक्रिया जोरात सुरू असल्यामुळे त्या देशांतील काही लेखकांना नोबेल पारितोषिकासारखे पुरस्कारही मिळून गेले. आणि एकूणच लॅटिन अमेरिकन लेखकांचे इंग्लंड-अमेरिकेतील महत्त्व वाढले. मराठीतील बरेच साहित्य हे दर्जाच्या दृष्टीने या



अनुक्रमणिका

साहित्याशी सहज बरोबरी साधणारे आहे. परंतु चांगले भाषांतरकार नसल्यामुळे परदेशी वाचकांना त्याची ओळखच होत नाही. जी. ए. कुलकर्णी यांच्या कथांची भाषांतरे इंग्रजीत लगोलग होत गेली असती तर जागतिक कथावाङ्‌मयाच्या मानकऱ्यांमध्ये त्यांची गणना होणे अवघड नव्हते. परंतु या दृष्टीने आपल्याकडे अजून जागृतीच नाही.

महाराष्ट्र शासनाने मराठीतील उत्तमोत्तम कलाकृतींचा इंग्रजीत अनुवाद करण्यासाठी भरघोस आर्थिक साहाय्य उपलब्ध करून द्यायला हवे. मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषांवर प्रभुत्व असणाऱ्यांच्या सहकार्याने हे काम होऊ शकेल. डॉ. विलास सारंग हे मुंबई विद्यापीठात इंग्रजी विभागाचे प्रमुख आहेत. त्यांनी स्वतःच स्वतःच्या कथांची भाषांतरे केली परंतु आपल्या अमेरिकन प्राध्यापक मित्राची मदत घेऊन ती भाषांतरे नेमकी व सफाईदार व्हावीत अशी दक्षता घेतली. इंग्रजीत आत्मविश्वासाने अनुवादलेखन करणाऱ्यांची एक नवी पिढीच आता अवतीर्ण व्हायला हवी. इतर भारतीय भाषांमध्येही मराठीतील साहित्य लगेच जात राहील यासाठीही काही यंत्रणेची गरज आहे. मराठी साहित्य हे विश्वसाहित्यातही चमकू शकेल असे सामर्थ्यवान आहे. परंतु आधुनिक प्रसिद्धियंत्रणांचे साहाय्य घेतल्याविना आपल्या साहित्याचे अस्तित्वच परदेशी वाचकांच्या लेखी प्रस्थापित होणार कसे ? हे काम वैयक्तिक पातळीवर करणे कठीण आहे. महाराष्ट्र शासनाने मराठी भाषेच्या व साहित्याच्या अभिवृद्धीसाठी, आंतरराष्ट्रीय प्रसारासाठी अनुवाद प्रक्रियेला चालना द्यावी, त्यासाठी लागणारे आर्थिक बळ उपलब्ध करावे असाच आग्रह धरणे क्रमप्राप्त आहे. मराठी साहित्यातील काही कलाकृती जर इंग्रजीद्वारे जगभर गाजल्या तर मराठी भाषेच्या विकासाला व प्रभावाला चालना मिळेल. आपल्या मराठीच्या अस्मितेलाही नवा आशय लाभेल. इंग्रजीतून मराठीत भाषांतर करण्याची एकेकाळची लाट ओसरून, मराठीतून इंग्रजीत भाषांतरे करण्याची नवी लाट आता यायला हवी.

म.सा. परिषदेने मराठी वाङ्‌मयाचा इतिहास इंग्रजीत प्रसिद्ध करण्याची एक महत्त्वाकांक्षी योजना हाती घेतली आहे. ती या प्रयत्नांना पूरक ठरेल.

**रत्नागिरी साहित्य संमेलन**

आगामी साहित्य संमेलन नोव्हेंबर-डिसेंबरमध्ये रत्नागिरी येथे भरण्याचे निश्चित झाले आहे. अध्यक्षीय निवडणुकीची प्रक्रियाही सुरू झाली आहे.

**अभिनंदन**

एम.टी. आयवा मारू (अनंत सामंत) या कादंबरीला वा.म. जोशी पारितोषिक मिळालेले होतेच. श्री. सामंत यांनी बक्षिसाची रक्कम (रु. १००) साहित्य परिषदेला साहित्यिक साहाय्य निधीला देऊन आपल्या औदार्याची साक्ष पटवली. याच कादंबरीला दि. बा. मोकाशी पुरस्कारही जाहीर झाला आहे.

ग. ल. ठोकळ ह्यांच्या स्मृतिदाखल देण्यात येणाऱ्या ग्रामीण साहित्यविषयक पुरस्कारासाठी पाचर (लेखक-- रामचंद्र पाठारे, थेऊर) या कादंबरीची निवड झाली आहे.



अनुक्रमणिका






शंकर पाटील पुरस्कार जगबुडी (वामन पात्रीकर) या कादंबरीला देण्यात आला.

नागपूरच्या प्रास या प्राध्यापक संघटनेने जी. ए. कुलकर्णी यांच्यावरील समीक्षात्मक पुस्तकाला ५०० रु. चा पुरस्कार देण्याचे जाहीर केले होते. श्री. रा. ग. जाधव यांच्या 'डोहकाळिम्यात डोकावताना' या पुस्तकाला यंदाचा हा पुरस्कार प्रदान करण्यात आला आहे.

या सर्वांचे अभिनंदन.

**शंकर सारडा**
**संपादक**

---

# श्रद्धांजली

---

**श्री. सुमंत जोशी**

व्यासंगी नाट्यसमीक्षक आणि अत्रे उवाच, गडकरी स्मृतिमंजुषा, गडकऱ्यांचे वाग्वैभव वगैरे पुस्तकांचे लेखक श्री. सुमंत जोशी (जन्म १६ डिसेंबर १८९९) यांचे दीर्घ आजारानंतर दि. २१ जून १९९० रोजी निधन झाले. मौज, इंदुप्रकाश, हिंदू मिशनरी, ज्ञानोदय, तारका वगैरे नियतकालिकांत ते सातत्याने लिहीत. 'नमन नटवरा' हे त्यांचे पुस्तक उत्कृष्ट संदर्भग्रंथ म्हणून गौरविले जाते. 'जुन्या रंगभूमीच्या शोधात' हे द्विखंडात्मक पुस्तक लिहून त्यांनी पूर्ण केले आहे. परंतु ते अजून अप्रकाशित आहे. मराठी रंगभूमी आणि मराठी चित्रपट या विषयांशी संबंधित दुर्मिळ संदर्भसाहित्याचा त्यांचा संग्रहही प्रचंड आहे.

**डॉ. चिं. श्री. कर्वे**

मराठीत विज्ञानविषयक लेखन सातत्याने करणारे फार थोडे लेखक आहेत. डॉ. चिं. श्री. कर्वे यांचे नाव त्यात आदराने घ्यावे लागते. मुंबईच्या खालसा कॉलेजचे ते प्राचार्य होते. भौतिकशास्त्राचे ख्यातनाम प्राध्यापक म्हणून त्यांचा लौकिक होता. भौतिकशास्त्राची अनेक पाठ्यपुस्तके त्यांनी लिहिली, तशीच विज्ञानविषयक सुलभ लेखही विपुल लिहिले. मराठी विज्ञान परिषदेच्या स्थापनेत त्यांचा पुढाकार होता. दिनांक १९ जून १९९० रोजी पुणे येथे त्यांचे वयाच्या ७६ व्या वर्षी अल्पकालीन आजाराने देहावसान झाले.

**प्रा. भालचंद्र खांडेकर**

मराठीतले एक नामवंत कवी व अध्यापक प्रा. भालचंद्र खांडेकर यांचे दिनांक २८ जून १९९० रोजी पुणे येथे निधन झाले. २८ जून १९२२ हा त्यांचा जन्मदिवस. जन्मतारीख व मृत्युतारीख एकच असण्याचा हा लक्षवेधक योगायोग होय. नव्याजुन्याच्या सीमेवरील भावकविता खांडेकरांनी लिहिली, तसेच प्राध्यापक म्हणून निवृत्त झाल्यावर महाविद्यालयीन



अनुक्रमणिका

विद्यार्थ्यांसाठी समीक्षात्मक लेखनही विपुल केले. सेवानिवृत्तीनंतर पाश्चात्य साहित्यविचार, भारतीय साहित्यविचार, अभिनव साहित्यशास्त्र, ज्ञानेश्वरीचे अध्याय वगैरे ग्रंथ इतरांच्या साहाय्याने लिहिले. पवनाकाठचा धोंडी, शबरी, मृण्मयी, गबाळ, रंग माझा वेगळा वगैरे पुस्तकांच्या मार्गदर्शिकाही लिहिल्या. एक सौम्य प्रकृतीचे सौजन्यशील व्यक्तिमत्त्व हरपले.

**श्रीकृष्ण साक्रीकर**

नटसम्राट बालगंधर्व यांचे निकटचे स्नेही आणि चला आळंदीला, क्रांतिवीर भगत सिंग, क्रांतिकमळ, तैमूरलंग, चंगीजखान इ. शंभराहून अधिक नाटकांचे कर्ते श्रीकृष्ण साक्रीकर यांचे मोटार अपघातात बोरिवली येथे नुकतेच निधन झाले. ते ७२ वर्षांचे होते.

चला आळंदीला या नाटकाला महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार मिळाला होता. नाट्य परिषदेने मा. भाः कामत स्मृती पुरस्कार देऊन १९८६ मध्ये त्यांचा गौरव केला होता. अत्रे थिएटर्सच्या अनेक नाटकांत त्यांचा सहभाग होता. बिरबल माय ब्रदर हा इंग्रजी चित्रपट त्यांच्या कथेवरच निघाला होता.

**वि. द. कुलकर्णी**

केसरीचे मुख्य उपसंपादक आणि पुणे श्रमिक पत्रकार संघाचे माजी उपाध्यक्ष विलास दत्तात्रय कुलकर्णी यांचे दि. १९ जून १९९० रोजी प्रदीर्घ आजारानंतर निधन झाले. त्यांचे वय अवघे ४३ होते. गेल्या वर्षी मूत्रपिंड रोपणाची शस्त्रक्रिया त्यांच्यावर करण्यात आली होती. त्यांच्या कविता अनेक मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या होत्या. मृत्यूच्या दोनच दिवस आधी लिहिलेली पुढील कविता त्यांना मृत्यूची चाहूल लागली होती याची खात्री पटवते.

मन उदास उदास । वाटा उदास उदास  
*नभ उदास उदास । लाटा उदास उदास ॥*  
*डोह तुडंबले पाणी उदास उदास । दूर डोंगरात गाणी उदास उदास ॥*  
*हिर्वे हिर्वे झाले रान उदास उदास । झाले कमळाचे पान उदास उदास ॥*  
*कसे झाले सारे सूर उदास उदास । प्राण झाले सैरभैर उदास उदास ॥*

**दामूअण्णा कोकजे**

ज्ञानप्रकाश व मराठा या वृत्तपत्रांचे प्रतिनिधी व ज्येष्ठ पत्रकार दामोदर सीताराम ऊर्फ दामूअण्णा कोकजे यांचे वयाच्या ८५ व्या वर्षी दिनांक ९ जुलै १९९० रोजी पुणे येथे प्राणोत्क्रमण झाले. गोगटे हॉटसन खटला, चिरतरे गोळीबार खटला, महात्माजींचे उपोषण, पानशेत खटला वगैरे प्रकरणी त्यांनी केलेल्या विस्तृत वार्तासंकलनामुळे त्यांचे वेगळेपण चटकन लक्षात येई. आचार्य अत्रे प्रभृतींची भाषणे जवळजवळ शब्दशः हशाटाळ्यांसह ते देत. तेव्हा वाचकांना आपण प्रत्यक्ष भाषणाला हजर आहोत असा प्रत्यय येई.

या सर्वांना आमची विनम्र श्रद्धांजली.

**संपादक**



अनुक्रमणिका

# अमर्याद मित्रा तुझी थोरवी आम्हां

## कुसुमाग्रजं सत्कार-समारंभाच्या वेळी व्यक्त केलेले विचार

प्रा. वसंत कानेटकर

सन्माननीय अध्यक्ष, महाराष्ट्राचे श्रेष्ठ ऋषितुल्य आणि आपल्या नाशिककरांचे अत्यंत आदरणीय असे कविवर्य महर्षी कुसुमाग्रज, व्यासपीठावरील इतर मान्यवर मंडळी आणि रसिक बंधु-भगिनींनो, आज या ठिकाणी एक अपूर्व सोहळा साजरा होतोय. नाशिकच्या इतिहासामध्ये सुवर्णाक्षरांनी नोंदला जावा असा हा अपूर्व सोहळा आहे. या सोहळ्याची अपूर्वता कितीतरी दृष्टींनी सांगण्यासारखी आहे. सत्कार ही तशी काही आता नवीन गोष्ट राहिलेली नाही. हल्ली गावगन्ना सत्कार-समारंभ होतात. कित्येक माणसे आपला स्वतःचा सत्कार कसा होईल याच खटपटीत सदैव असतात. जिवंतपणी स्वतःचे पुतळे उभे करून घेणारी माणसे ही आजच्या काळाची एक खास लक्षणीय पैदास आहे. हा सगळा छोट्या माणसांचा कारभार आहे. आणि अशा प्रकारची छोटी माणसे समाजाला कोणत्या प्रकारची अवकळा आणतात हे मी आपल्याला नव्याने सांगावे असे नाही.

प्रसिद्ध इंग्लिश लेखक कार्लाईल एके ठिकाणी म्हणतो, "ज्या वेळी छोटी छोटी माणसे लांबलांब सावल्या टाकायला लागतात तेव्हा सूर्यास्ताची वेळ आली आहे हे ओळखले पाहिजे." ("When small men cast long shadows, it is the time for sun to set.") या उद्‌गारातून आजच्या सबंध समाजस्थितीचे निदान होऊ शकते. अशा या काळामध्ये तात्यासाहेबांच्या सत्काराचा, गौरवाचा हा जो आनंदसोहळा साजरा होतोय, तो आगळावेगळा तर आहेच, पण तो प्रेरकही आहे. आणि त्याचे मोठेपण काय आहे हे मला तुम्हाला सांगायचे आहे.

तात्यासाहेब आपल्याला रोज भेटतात. नेहमी जातायेताना दिसतात. प्रेमानं बोलतात. या शहरातील प्रत्येक मांणसाला वाटतं की, तात्यासाहेब आपले जिव्हाळ्याचे आणि जवळचे मित्र आहेत. आणि खरंच आहे ते. पण म्हणूनच त्यांची थोरवी आपल्या जाणिवेच्या कवेतून निसटण्याची शक्यता जास्त असते. त्यांची थोरवी ही सहजासहजी मोजता येण्यासारखी नाही. मला तर असे दिसते की, तात्यासाहेबांचे पाय या भूमीत घट्ट रुतलेले आहेत, पण त्यांचे मस्तक मात्र आकाशात हरवलेले आहे. या दोन्ही गोष्टी एकाच वेळी एकाच माणसाला साधत नाहीत. ज्या माणसांचे पाय जमिनीत रुतत नाहीत ती माणसे बघताबघता आकाशात विरून जातात आणि एखाद्या हस्तिदंती मनोऱ्यात राहायला लागतात. ज्यांचे पाय जमिनीत रुततात ती माणसे जमिनीवर सरपटू लागतात, जंतुवादी होतात. ही दोन्ही केंद्रे एकाच वेळी एकत्र हातात आणणे आणि हयातभर तशीच ठेवणे ही किती अवघड गोष्ट आहे हे आपल्याला कळू शकेल. म्हणून










लौकिक, अलौकिक किंवा पारलौकिक असे अनुभवविश्व समर्थपणाने पेलणारे तात्यासाहेब हे आजच्या काळातले एक श्रेष्ठ महर्षी आहेत, असे मला म्हणावेसे वाटते.

आपल्या लक्षात आले असेल की, मघापासून मी दोन वेळा महर्षी शब्द वापरला आहे; आणि मला असे वाटते की, तात्यासाहेबांना पद्मभूषण किंवा पद्मश्री अशा पदव्या देण्यात काहीही अर्थ नाही. त्यांना द्यायला पाहिजे अशी पदवी एकच आहे आणि ती जनमानसाने त्यांना केव्हाचं बहाल केली आहे. ती म्हणजे महर्षी. महर्षी टॉलस्टॉय, महर्षी रवींद्रनाथ तसे आमचे हे महर्षी कुसुमाग्रज. हे केवळ मी गौरवाच्या दृष्टीने बोलत नाही. पुढे मी जे सांगणार आहे त्यातून त्यांचे महर्षिपण त्यांच्या साहित्यातून कसे प्रकट होत गेलेय ते आपल्या लक्षात येईल. पण एवढा मोठा सोहळा साजरा करण्याचे औचित्य, इतका जिव्हाळा तुम्ही नाशिककरांनी दाखवला याबद्दल तुमचे करावे तेवढे कौतुक थोडेच होईल. नाशिककरांनी फार मोठी भरारी मारलेली आहे.

तात्यासाहेबांच्या नावाने आज इथे प्रतिष्ठान स्थापन होत आहे. तात्यासाहेबांना राहण्यासाठी आणि त्यांच्या नावाने स्थापन झालेल्या या प्रतिष्ठानासाठी एक छोटे, सुंदर, सुबक असे घरकुल आपण उभे करून दिलेले आहे. एका गावाने आपल्या लाडक्या कवीचे कौतुक करण्यासाठी त्याला घर देणे हे अन्यत्र कुठेही घडलेले नाही. महाराष्ट्रात नाही, भारतात नाही किंवा जगात कुठे घडलेले नाही. जे कवी मोठे झाले किंवा समाजाला आदरणीय राहिले, त्यांच्या हयातीनंतर त्यांच्या वास्तू कशा मिळवाव्यात हा प्रश्न समाजाला भेडसावतो. किंवा त्यांच्या वास्तू त्यांच्या हयातीनंतर समाजाने मिळवलेल्या आहेत. पण हे सगळे नंतर. आपल्यातल्या एका मोठ्या माणसाचे मोठेपण हेरून, तो कलंदर वृत्तीचा श्रेष्ठ कवी हा गृहस्थी व्हावा, आपल्या गावामध्ये एका घरात राहावा अशी आशा धरून त्याला घर करून देण्याची ही जी काही एक जाण, एक कृतज्ञता बुद्धी आपल्या गावाने दाखवलेली आहे, तिला खरोखर दुनियेत तोड नाही. म्हणूनच मित्रहो, मी तुमचे अभिनंदन करतो. तसेच या अतिशय सुंदर आणि भव्य सोहळयात सबंध नाशिककरांच्या वतीने त्यांचे मनोगत व्यक्त करण्यासाठी आपण जी माझी निवड केली, हा माझा सगळ्यात मोठा बहुमान आहे असे मी मानतो. अनेक सन्मान मला प्राप्त झाले. पण मला जर मनापासून विचारा तर या नाशिकमध्ये तात्यासाहेबांबद्दल किती आणि कसे बोलू असे प्रत्येकाला वाटत असताना आणि तशी समर्थ माणसे बरीच असताना आपण मला बोलण्याची संधी दिलीत हा माझा फार मोठा सन्मान मी मानतो. आणि याबद्दल मी कृतज्ञता व्यक्त करतो.

तात्यासाहेबांबद्दल बोलताना आताच इथे सांगितले गेले की त्यांनी या प्रकारचा सत्कार घ्यायला नकार दिला होता. तात्यासाहेबांचा होकार मिळवणे ही सुद्धा एक कर्तबगारी आहे इतके त्यांचे नकार प्रसिद्ध झालेले आहेत. हा एकच माणूस असा आहे की इतरांना हवेहवेसे वाटणारे जे सन्मान आहेत ते हा सहजपणे नाकारून टाकतो. इथे मला पुन्हा कार्लाईलच्या एका वाक्याची आठवण होते. कार्लाईल म्हणतो, "He is the hero who says 'no'." नाही

म्हणून पाय रोवून उभा राहणारा जो मनुष्य असतो तो 'नाही' असे केवळ गमतीखातर म्हणत नाही. त्याच्या पाठीमागे विचारधारा, अनुभव, चिंतन असते आणि काही मूल्यामूल्यविवेक असतो. शासनाने दिलेले अनुदान तात्यासाहेबांनी नाकारले. पण शासनाने दिलेला पुरस्कार नाकारला नाही. अशा वेळी शासनानेसुद्धा शब्द वापरताना जरा जपून वापरला पाहिजे. श्रेष्ठ कवी दान घेत नाही. तो पुरस्कार स्वीकारतो. तसेच तात्यासाहेबांनी पुणे विद्यापीठाची पदवी स्वीकारली; पण मुंबई विद्यापीठाची पदवी नाकारली. ती का नाकारली याचा विचार समाजाने केला पाहिजे. तात्यासाहेब जेव्हा नाही म्हणतात तेव्हा समाजाने अंतर्मुख होण्याची वेळ आलेली असते.

या काही दिवसांत तात्यासाहेबांना विविध प्रकारचे पुष्कळसे सन्मान प्राप्त झाले आहेत. त्यांचे सत्कारही झालेले आहेत. मला असे वाटते की, एक नोबेल पुरस्कार सोडला तर दुसरे कोणतेही मोठे पुरस्कार बाकी राहिलेले नाहीत. त्यांच्या कवितांचे जर सुंदर इंग्रजीमध्ये भाषांतर झाले तर नोबेल प्राइझदेखील त्यांच्याकडे आपणहून वाटचाल करत येईल. अशा या थोर, महान पुरुषाचा सत्कार करावा असे अनेक संस्थांना वाटावे यात अस्वाभाविक काही नाही. गैर काही नाही. आणि तरीही तात्यासाहेब 'होय' का आणि केव्हा म्हणतात, आणि 'नाही' का म्हणतात आणि 'नाही' शब्दाला चिकटून का राहतात याबद्दल आपण अधिक खोलवर जाऊन विचार केला पाहिजे. मला असे वाटते की 'होय' आणि 'नाही' हा तात्यासाहेबांच्या व्यक्तिमत्त्वाचा एक परवलीचा शब्द आहे. म्हणून तो आपण समजून घ्यायला पाहिजे. तात्यासाहेब पुण्यामुंबईसारख्या मोठ्या शहरांमधले मोठमोठे सन्मान नाकारतात किंवा तिथे जायचे निरनिराळ्या मार्गाने टाळतात. परंतु जंगलातल्या एखाद्या खेड्यामध्ये आदिवासींचा सामुदायिक विवाहसोहळा होणार असतो, त्या वेळी मात्र ते अनेक अडचणींवर मात करून त्या सोहळ्याला उपस्थित राहतात. त्यावरूनच लक्षात येते की तात्यासाहेबांच्या होकारामागे आणि नकारामागे एक सामाजिक दृष्टी आहे. एक सामाजिक बांधिलकी आहे. कर्तव्यतत्परता आहे. आणि ती अनुभवातून आणि खोल चिंतनातून निर्माण झालेली आहे.

तात्यासाहेब नाशिक शहरामध्ये जेव्हा कायमच्या वास्तव्यासाठी आले, त्या वेळेस मीही नाशिकमध्ये नोकरीच्या निमित्ताने पहिल्यांदा आलो होतो. याही घटनेला चाळीसापेक्षा जास्त वर्षे उलटून गेली आहेत. तेव्हापासून मी तात्यासाहेबांच्या सहवासात आहे. आणि त्यांची जीवनप्रणाली ही सतत माझ्या निरीक्षणाचा आणि चिंतनाचा विषय आहे. भाऊसाहेब खांडेकर हे तर माझे साक्षात गुरू होते. त्यांनी मला खूप काही शिकवले. तात्यासाहेबांकडून शिकण्याची वेळ जरी आलेली नसली तरी खांडेकरांपेक्षा मी तात्यासाहेबांकडून खूप काही मिळवले आहे. तात्यासाहेबांच्या सहवासात राहणे हा सुद्धा एक उदार शिक्षणाचा भाग आहे, असे मला वाटते.

तात्यासाहेबांची जीवनकहाणी न्याहाळली तर स्थूलमानाने त्यात दोन किंवा तीन पर्वे पाहायला मिळतात. पहिले पर्व हे त्यांच्या धडपडीचे पर्व. या पर्वात त्यांना ऐन उमेदीच्या काळात खूप हालअपेष्टा सोसाव्या लागल्या. दारिद्र्याच्या झळा सोसाव्या लागल्या. या

सगळ्यापेक्षा त्यांना फार मोठ्या वैफल्याला सामोरे जावे लागले. त्या वेळी त्यांच्या मनाला ग्रासून राहाणारे हे वैफल्य आजही त्यांच्या मनावरून पूर्णपणे पुसून गेले आहे, असे मला वाटत नाही. चित्रपटसृष्टीमध्ये नट, दिग्दर्शक, लेखक होण्यासाठी तात्यासाहेबांनी आपल्या ऐन उमेदीत खूप वेळा चित्रपटसृष्टीच्या दारावर धडका घेतल्या. पण त्यांच्यासाठी दार किलकिलेसुद्धा झाले नाही. त्यांना पत्रकार व्हायचे होते. पत्रकारासाठी लागणारे गुणही त्यांच्यापाशी होते. तसे ते थोडेफार पत्रकार झालेही. पण तो काही त्यांचा पूर्णांशाने यशाचा भाग होऊ शकला नाही. या धडपडीच्या काळामध्ये तात्यासाहेबांचे कवित्व हळूहळू उमलायला लागले होते. या कवित्वाची त्या काळी फारशी मातब्बरी त्यांना वाटली असेल असे दिसत नाही. अलीकडच्या काळात तात्यासाहेबांनी म्हटलेय की, 'कवितेने माझी साथसोबत केली.' कविता ही त्यांच्या मागून जात होती. त्यांच्या जीवनाबरोबर ती विकसित होत होती. इथेच आपल्याला तात्यासाहेबांचा कवितेकडे पाहण्याचा दृष्टिकोण दिसतो. पण असे म्हणायला काही हरकत नाही की, तात्यासाहेबांचं हे हालअपेष्टांचं पर्व ही त्यांची एक प्रकारची साधनाच होती. या काळात त्यांना विविध प्रकारची दुःखे पाहायला मिळाली. विशेषतः चित्रपटसृष्टीमध्ये माणसे एकमेकांना कशी लुबाडतात, श्रेय कसे आपल्या नावावर खेचून घेतात, दुसऱ्याची आयुष्ये कशी बरबाद करतात, त्यांची कशी दारुण दैना करतात याची हृदयस्पर्शी आणि हृदयद्रावक उदाहरणे त्यांना पाहायला मिळाली. हे त्यांचे एक प्रकारचे शिक्षणच होते. ज्ञानेश्वरांनी खूप दुःख आपल्या बालपणामधे सोसले. पण त्याचा यत्किंचितही परिणाम त्यांनी ज्ञानेश्वरीमध्ये किंवा अभंगामध्ये उमटू दिला नाही. एक उदाहरणच द्यायचे झाले तर 'मजवरी दया करा, ताटी उघडा ज्ञानेश्वरा' एवढाच एक प्रसंग. पण बाकी सर्व ज्ञानेश्वरी ही जीवनातल्या अनुभवाच्या भव्यतेने भरलेली आहे. सौजन्याने आणि साहित्यविषयक जाणिवेने भरलेली आहे. तात्यासाहेबांच्या बाबतीत हेच म्हणता येईल. हे सगळे दुःख, कटू अनुभव त्यांच्या वृत्तीने बदलून टाकले. जेवायला बसले असताना एका खानावळवाल्यांनी त्यांना पानावरून उठवलं. खिशामध्ये पैसे नाहीत म्हणून गिरगावपासून दादरपर्यंत रात्री चालत यावं लागलं. त्याबद्दल त्यांनी कधी तक्रार केली नाही. हे अनुभव सांगितले ते विनोदाच्या आवरणातून ! तात्यासाहेबांनी विनोदी भूमिकेतून जे चित्र उभे केले आहे, त्यामध्ये त्यांच्या वृत्तीचा गोडवा आणि समंजसपणा दिसून येतो. या प्रकारच्या अनुभवांनी त्यांच्या कवितेचा एक वेगळ्या प्रकारचा पायाच घातला असे म्हणता येईल.

सामाजिकता ही त्यांच्या जीवनामध्ये एक गाढ निष्ठा म्हणून निर्माण झाली. तात्यासाहेब १९४५-४६च्या सुमाराला नाशिकला आले. प्रथम काही दिवसांसाठी म्हणून आणि पुढे कायमच्या वास्तव्यासाठी. नाशिकमध्ये त्यांनी एक साप्ताहिक काढून पाहिले. पण फारसे चालले नाही.

येथून तात्यासाहेबांच्या जीवनकहाणीचा दुसरा भाग सुरू होतो. या पर्वात तात्यासाहेबांची सामाजिकता आणि साहित्यसेवा या दोहोंचा संगम झालेला पाहायला मिळतो.

तसे तात्यासाहेब हे अत्यंत मनस्वी लेखक आहेत. प्रत्येक लेखक हा मनस्वी असतोच. आत्मरतही असतो. तात्यासाहेब कदाचित जास्त आत्मरत असतील. तसे ते एकलकोंडेही होते. पण तुसडे नव्हते, माणूसघाणे नव्हते. माणसांना ते प्रेमळपणाने वागवीत पण तरीही ते अलिप्त होते. हा अलिप्तपणा फार तर वर्ष-सहा महिने टिकला असेल. त्यानंतर तात्यासाहेब एका नव्या झळाळीने, नव्या उमेदीने समाजाशी समरस व्हायला लागले. त्यांची समाजाभिमुखता ही काही, त्यांनी एक दिवस ठरवलं आणि ताबडतोब निर्माण झाली अशातला प्रकार नाही. त्यासाठी त्यांना स्वतःच्या आत्मरत वृत्तीशी खूप झुंज घ्यावी लागली असेल. त्यांचा स्वभाव हा आमूलाग्र बदलून गेला. आणि जे तात्यासाहेब कुणामध्ये कधी मिसळत नसत ते विविध प्रकारच्या सामाजिक चळवळींचे केंद्र बनले. या चळवळी निर्माण करण्यासाठीच त्यांनी लोकहितवादी मंडळ निर्माण करायचे ठरवले. नाशिकमध्ये पूर्वापार चालत आलेल्या सार्वजनिक वाचनालय या संस्थेचा कायापालट करायचे ठरवले. त्यासाठी तरुण पिढीचे सहकार्य मिळवले. लोकहितवादी मंडळ आणि सार्वजनिक वाचनालय या संस्था नाशिकला भूषणभूत आहेत. पण या संस्थांना प्राप्त झालेली प्रतिष्ठा ही काही एकदम आकाशातून खाली पडलेली नाही. या संस्था प्रतिष्ठित व्हाव्यात आणि त्यांच्या हातून काही दर्जेदार कार्य घडावे, इतर गावांनाही त्या आदर्शभूत व्हाव्यात, यासाठी तात्यासाहेबांनी प्रारंभापासून खूप कष्ट घेतलेले आहेत.

लोकहितवादी मंडळाच्या स्थापनेच्या वेळी घडलेली एक गोष्ट मी मुद्दाम सांगतो. त्यावरून तात्यासाहेबांनी या संस्थांसाठी किती कष्ट घेतले असतील त्याची कल्पना येईल. तसेच नाशिक शहरातील या संस्था स्थापन होण्यापूर्वीची सांस्कृतिक परिस्थिती लक्षात येईल. लोकहितवादी मंडळापूर्वी सांस्कृतिक कार्य करणारी एकही संस्था नव्हती. लोकहितवादी मंडळाची स्थापना करण्यासाठी ते हं. प्रा. ठा. कॉलेजच्या प्राचार्यांना म्हणजे प्रि. पाटणकरांना भेटण्यासाठी आले. मी त्या वेळी कॉलेजवरच राहात होतो. प्राचार्यांना त्यांनी विनंती केली, "तुम्ही लोकहितवादी मंडळाचे अध्यक्ष व्हा !" त्यांच्याबरोबर बाळासाहेब सहस्रबुद्धे आणि गोपाळराव हेही असावेत. तात्यासाहेबांची योजना ऐकून पाटणकरांनी त्यांना काय सांगावं ? अर्थात पाटणकरांचा काही दोष नाही. कारण ते वस्तुस्थितीच सांगत होते. ते म्हणाले, "हे पाहा, असली मंडळंबिंडळं काढण्याच्या भानगडीत पडू नका. किती पैसे खर्च केलेत तुम्ही ? पावतीपुस्तकासाठी आणि माहितीपत्रकासाठी जे काही पैसे खर्च झाले असतील तो खर्च तुम्ही आपसात वाटून घ्या आणि घरी जाऊन गप्प बसा. या गावात असली मंडळं वगैरे चालत नाहीत. इथली संस्कृती चमत्कारिक आहे. विशेषतः पांढरपेशांची पद्धत अशी आहे की, ते शनिवारी रात्री एखाद्या क्लबमध्ये पत्ते खेळायला बसतात आणि सोमवारी सकाळी उठतात. बाकीचा वेळ फक्त पैसे मिळवण्यात खर्च करतात. याच्यापलीकडे त्यांना कशाची गोडी नाही. कशात काही रस नाही."

तात्यासाहेब ते ऐकून मुकाट्याने घरी गेले. पण ते गप्प मात्र बसले नाहीत. त्यांनी लोकहितवादी मंडळाला चालना दिली. नाशिक हे भिक्षुकीचं गाव. परंतु नाशिकचे हे चित्र पार



अनुक्रमणिका

बदलून टाकायचे त्यांनी ठरविले. लोकहितवादी मंडळ स्थापन करून त्यांनी त्यामार्फत व्याख्यानमाला, निरनिराळे महोत्सव, सांस्कृतिक कार्यक्रम, नाटकांचे कार्यक्रम अशा अनेक गोष्टींना चालना दिली. नव्या पिढीला नव्या दिशेने जाण्यासाठी नेतृत्व दिले. जी गोष्ट लोकहितवादी मंडळाची तीच सार्वजनिक वाचनालयाची ! हे वाचनालय म्हणजे केवळ पुस्तकांचं गुदाम होऊ नये, पुस्तकांची देवाणघेवाण करणारी संस्था होऊ नये. या मध्यवर्ती संस्थेला एक सांस्कृतिक केंद्र म्हणून प्रतिष्ठा प्राप्त झाली पाहिजे असे त्यांनी ठरवले. मी गेली कित्येक वर्षे निरनिराळ्या कार्यक्रमांच्या निमित्ताने महाराष्ट्रातील अनेक प्रमुख शहरांमध्ये गेलेलो आहे. तिथल्या सार्वजनिक वाचनालयात एक गोष्ट आवर्जून सांगत आलो आहे की, "तुम्ही एकदा नाशिकला या आणि आमच्या सार्वजनिक वाचनालयाचे काम पाहा." ज्या चळवळी, जे महोत्सव सबंध गावाचे प्रातिनिधिक म्हणून व्हायला हवे असतात त्याचे पुढारीपण सार्वजनिक वाचनालयाने घेतले पाहिजे असे तात्यासाहेबांनी मानले. नुसते मानले नाही, तर प्रत्यक्षात आणून दाखवले. डॉ. वर्टीच्या साहाय्याने त्यांनी आपल्या शहरामध्ये साहित्यिक मेळावा भरवण्याचा प्रकल्प गेली कित्येक वर्षे यशस्वीपणे चालवलेला आहे. गावातल्या हुशार आणि कर्तबगार शिक्षकांचा सत्कार करण्याची पद्धत त्यांनी घालून दिली. ती तात्यासाहेबांच्या समाजसेवेचे बोलके उदाहरण म्हणून सांगता येईल. या चळवळीद्वारे गेल्या पंचवीस वर्षांत कितीतरी धडाडीचे कार्यकर्ते नाशिकमध्ये निर्माण झालेले आहेत. सार्वजनिक वाचनालय ही संस्था कार्यकर्त्यांचे मोहोळ बनली आहे. आणि याचे श्रेय निश्चितपणे तात्यासाहेबांकडे आहे.

समाजसेवेची तात्यासाहेबांची कल्पना ही पुस्तकी नाही किंवा चार लोक ज्याप्रमाणे समाजसेवेचा विचार करतात त्याप्रमाणे पारंपरिकही नाही. ती विविधरंगी आहे. एक दिवस तात्यासाहेब येतात आणि सांगतात की आज ईदचा सण आहे. गावात वातावरण तंग झालेलं आहे. कदाचित जातीय दंगल होण्याची शक्यता आहे. तरीसुद्धा आपण गावातल्या मशिदीसमोर जायचं आणि तिथल्या लोकांना 'ईद मुबारक' करायचं. हे म्हटल्यावर ते उठून चालू लागतात आणि त्यांचे मित्र त्यांच्याबरोबर जातात. ही 'ईद मुबारक' दिल्यावर तात्यासाहेबांना प्रश्न विचारला गेला की, तुम्हाला तिथं काय दिसलं ? काय अनुभव आला ? या प्रश्नाला तात्यासाहेबांनी जे उत्तर दिले ते खरोखरीच त्यांच्यातल्या श्रेष्ठ संत कवीची साक्ष पटवते. ते म्हणाले की, "बाकीच्या लोकांना काय जाणवलं ते मला ठाऊक नाही. पण मला भीती मुळीच वाटली नाही. उलट त्या माणसांच्या डोळ्यांमध्ये भीती आणि अपरंपार करुणा दिसली. आणि माझं अंतःकरण कळवळलं." स्वतःचा जीव धोक्यात घालून तिथल्या प्रार्थना करणाऱ्या मुसलमानांच्या डोळ्यांत अपरंपार करुणा पाहाणारे तात्यासाहेब हे एकमेव मराठी संत कवी आहेत.

तात्यासाहेबांच्या सामाजिक दृष्टिकोणाचे आणखीही कांही विशेष सांगण्यासारखे आहेत. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत ते असेच सामील झाले. मुलांच्या क्रीडांगणावर अतिक्रमण होतेय असे दिसताच ते क्रीडांगण मुक्त करण्यासाठी तात्यासाहेबांनी जाहीर केले

की, मुलांना घेऊन मी या क्रीडांगणावर जाईन, खेळेन आणि सत्याग्रह करीन. शासनाला अर्थातच त्यांच्या या निर्धाराचा धाक वाटला आणि ती योजना बारगळली. एखाद्या कवीच्या लेखनात, वाणीत आणि कर्तृत्वात ज्या वेळेला शासनालासुद्धा धाक घालण्याइतकी ताकद येते, त्या वेळी तो लेखक सभोवतालच्या सामान्य चिखलाच्या गर्तेतून एखाद्या सुळक्यासारखा उभा राहतो. आमचे तात्यासाहेब या सुळक्यासारखे, एखाद्या पहाडाप्रमाणे आजच्या समाजजीवनात उभे राहिलेले आहेत याचा आम्हाला अभिमान वाटतो.

तात्यासाहेबांच्या सामाजिक चळवळीतील कार्याच्या पुष्कळ आठवणी सांगता येतील. गेल्या चाळीस वर्षांमध्ये त्यांचे कर्तृत्व विविध अंगांनी आणि रंगांनी नटलेले आहे. पण त्याचा पाया विचारविवेक-वाद हाच आहे. बुद्धिवाद हा आहे. या गावाबद्दल त्यांच्या मनात जे अपरंपार प्रेम आहे त्याचा हा देदीप्यमान आविष्कार आहे.

तात्यासाहेबांच्या जीवनातले हे अखेरचे पर्व सुरू झालेले आहे. पण या पर्वातही ते स्वस्थ बसलेले नाहीत. कुठल्याही चळवळीच्या अग्रभागी ते दिसत नसले तरी त्यांची प्रेरणा त्याच्या मागे असतेच असते. एकदा, गावकरीच्या पोतनीसांनी असं सांगितलं होतं की, ज्या गावामध्ये कवी, लेखक असतात, त्या गावामध्ये त्यांच्यामधली भांडणे संपादकांना आणि राजकारण्यांना सोडवावी लागतात. आमचे हे गाव इतके भाग्यशाली आहे की इथे राजकारण्यांची आणि संपादकांची भांडणे तात्यासाहेबांनी सोडवलेली आहेत आणि एकोपा निर्माण केलेला आहे. 'गोष्टी सांगेन युक्तीच्या चार' अशा प्रकारची धारणा त्यांची आजच्या काळात झालेली आहे. तुकाराम 'आता उरलो उपकारापुरता' अशा अर्थाचे उद्‌गार काढतो. तशाच एका संपन्न, समर्थ आणि कृतार्थ भूमिकेत आज तात्यासाहेब उभे राहिलेले आहेत. त्यांची नजर चतुरस्र असते. आणि विविध प्रकारच्या कामांना त्यांची प्रेरणा मोलाची ठरत असते.

तात्यासाहेबांच्या कवितेबद्दल आणि साहित्याबद्दल बोलले पाहिजेच. पण काय बोलणार? कसे बोलणार? तात्यासाहेब हे एक श्रेष्ठ संतकवी आहेत, एवढे म्हटल्याने त्यांच्या प्रतिभेचेच नव्हे, तर त्यांनी एकूण जी वाङ्मयीन कामगिरी केलेली आहे तिचे पुरेसे मूल्यमापन होऊ शकत नाही. यासाठी त्यांच्या लेखनाच्या अंतरंगात शिरले पाहिजे. त्यांच्या पाठीमागच्या विचारधारा आणि तात्यासाहेबांनी त्यामध्ये घातलेली विविध प्रकारची भर यांचे स्वरूप न्याहाळले पाहिजे. सामाजिकता हा तर त्यांच्या कवित्वाचा मोठा विशेष. अन्यायाबद्दलची चीड किंवा स्वातंत्र्याबद्दलची उर्मी आणि पददलितांबद्दलचा कळवळा हे तिचे अगदी प्रथमदर्शनी दिसणारे विशेष ! पण त्याचबरोबर तात्यासाहेब जीवनातल्या नाजूक सौंदर्याला पारखे झाले आहेत असे मानायचे कारण नाही. त्यांची कविता म्हणजे नुसता दणदणाट नव्हे किंवा शस्त्रांचा खणखणाट नव्हे; तर 'गर्जा जयजयकार' ही कविता लिहिणारे तात्यासाहेब 'काढ सखे गळ्यातील तुझे चांदण्याचे हात' यासारखी कवितादेखील लिहू शकतात. हा प्रवास त्यांच्या 'विशाखा' या पहिल्या काव्यसंग्रहामध्ये प्रकट झाला आहे. तिथून त्यांच्या कवितेने वेगवेगळ्या प्रकारची वळणे घेतलेली आहेत. ती

मनोज्ञ आहेत. तात्यासाहेबांमधे सामाजिकता, सौंदर्यासक्ती आणि व्यक्तिगत जीवन या सगळ्या गोष्टी अभिन्न आहेत. मला तर असे वाटते की त्यांच्या प्रतिभेने सामाजिकता आणि सौंदर्यशीलता यांचे जोड रूळ मराठी साहित्यात घातलेले आहेत. आणि त्यावरून त्यांच्या कवित्वाचा प्रवास मोठ्या डौलाने चाललेला आहे. ते कधी या बाजूला झुकतात तर कधी त्या बाजूला झुकतात. परंतु त्यांच्या कवितेमधली नाट्यपूर्णता, वक्तृत्व, सूक्ष्मता, तरल कल्पनाविलास– या सगळ्याच गोष्टींनी सर्वसामान्य रसिक गेली चाळीस-पन्नास वर्षे भारून गेलेला आहे. दिवसेंदिवस त्यांच्या काव्याला विलक्षण प्रकारची झळाळी यायला लागली आहे. शब्दसामर्थ्य, शब्दकळा हा तर त्यांचा खास विशेष ! वृत्तबंध रचना, जातींची रचना आणि काव्यातले विविध प्रकार त्यांनी सहजेतेने आणि सफाईने हाताळले आहेत. चंद्रशेखरांचा एक अपवाद सोडला तर रचनेचे कौशल्य आणि शैलीतला गोडवा क्वचितच पाहायला मिळतो. विशाखापासून आजच्या काळापर्यंतचे तात्यासाहेबांचे संग्रह पाहिले, तर कवी आणि नाटककार म्हणून त्यांनी जी कामगिरी केलेली आहे ती असाधारण आहे हे कबूल करावेच लागते.

ते सर्वश्रेष्ठ नाटककार आहेत. 'नटसम्राट'सारखे त्यांचे सर्वांत लोकप्रिय नाटक घेतले तरी या क्षेत्रातली त्यांची कामगिरी लक्षात येईल. हे एकच नाटक असे आहे की जे 'एकच प्याला'च्या तोडीला येऊ शकेल. 'एकच प्याला'प्रमाणे या नाटकाने चिरंतन काळपर्यंत रसिकांच्या मनाला मोहिनी घालू शकतील अशा प्रकारचे गुणविशेष प्रकट केलेले आहेत. 'नटसम्राट' हे नाटक मोठे आहे यात शंकाच नाही. पण त्याहीपेक्षा 'ययाती आणि देवयानी' हे नाटक मला अधिक श्रेष्ठ वाटते. तात्यासाहेबांच्या नाटकांची जर एकमेकांशी तुलना करून पाहिली तर ही तुलना फक्त शिखरांचीच आहे याची जाण आपल्याला येईल. व्यावहारिक यश काहींना मिळाले असेल, काहींना मिळाले नसेल; पण म्हणून त्यांचे मोल कमी नाही. संस्कृतमध्ये एक वचन आहे, 'काव्येषु नाटकं रम्यम्।' म्हणजे काव्यात रमणीय काय तर नाटक. तात्यासाहेबांच्या बाबतीत उलट झालेय. त्यांच्या बाबतीत नाटकामध्ये रमणीय काय ? तर त्यांचे कवित्व ! हे कवित्व त्यांच्या भरजरी संवादांमधून तर प्रकट होतेच, पण त्यांचा कवित्वाचा खरा उन्मेष पाहायचा असेल तर त्यांची नाटकातली स्वगते बघावीत. त्यांची स्वगते ही रसिकप्रिय आहेत. त्यांच्या प्रत्येक नाटकाचा प्राण जर कशात असेल तर तो त्यांच्या स्वगत भाषणात आहे, असे मला वाटते. मूलतः ही स्वगत भाषणे त्यांच्या कविमनाची द्योतक आहेत. तात्यासाहेबांचे नाट्यलेखन पाहण्यासारखे असते. तात्यासाहेबांकडे गेले की, ते म्हणतात– "मी तुम्हाला एक स्वगत म्हणून दाखवतो." अतिशय अप्रतिम अशी सॉलीलोक्वी असते ती. मी विचारतो, "कुठल्या नाटकात घालणार आहात ?" ते म्हणतात, "अजून ठरायचंय." "कुणाच्या तोंडी घालणार ?" "तेही अजून ठरायचंय." आपल्या लक्षात येईल की ते नाटकाकडून काव्याकडे जात नाहीत, तर काव्यातून नाटकाकडे जातात. हा प्रवास खरोखरीच फार चमत्कारिक आहे. आणि समीक्षकांनी याची नुसती नोंद घेऊन चालणार नाही, तर त्याच्या



अनुक्रमणिका







पाठीमागे जाऊन काव्य आणि नाट्य यांचे संबंधदेखील तपासून पाहिले पाहिजेत. तात्यासाहेबांना चार्ली चॅप्लिन या नटाबद्दल तर प्रेम आहेच; पण त्याच्या मूकचित्रपटांच्या निर्मितीबद्दलही त्यांना असाधारण जिव्हाळा आहे. मला असं वाटतं की या नटश्रेष्ठाला गौरवांजली अर्पण करण्यासाठीच त्यांनी हे नाटक लिहिले. सांगण्याचा मुद्दा हा की, चार्ली चॅप्लिनमध्ये जे जे विशेष आहेत, ते ते तात्यासाहेबांच्या नाट्यकलेचे विशेष आहेत. चार्ली चॅप्लिनमध्ये जसा विनोद आहे तसा तो तात्यासाहेबांच्या लेखनात आहे. त्यातलं काव्य, त्यातलं कारुण्य आणि त्याची सामाजिक दृष्टी, त्यांचा पददलितांबद्दलचा कळवळा आणि नियतीबद्दलची त्याची जाण हे चार्ली चॅप्लिनच्या नाट्यकलेचे विशेष आहेत, तसेच ते तात्यासाहेबांच्या नाट्यकलेचेही विशेष आहेत.

कवित्वाबद्दल बोलताना त्यांनी एका ठिकाणी म्हटलेले आहे की, "सौंदर्य, न्यायबुद्धी, स्वातंत्र्य आणि प्रेम ही कवित्वाची भूषणे आहेतच. कवित्वाची अंगे आहेत. जो कवी स्वतःला कलाकार म्हणवतो, त्याने सतत अन्यायाबद्दल, दास्यवृत्तीबद्दल आवाज उठवलाच पाहिजे. सत्य, साधुत्व आणि स्वाभिमान हे तात्यासाहेबांच्या वृत्तीचे अत्यंत प्रखर पैलू आहेत. ते त्यांच्या नाट्यकलेने आणि त्यांच्या कवित्वाने नेमके टिपून घेतलेले आहेत. या बाबतीत ते कुठलीही तडजोड मान्य करीत नाहीत. न्यायाच्या बाजूने ते सतत उभे राहातात. ही भूमिका जर कवीने घ्यायची नसेल तर दुसरा कोण घेणार ? असा प्रश्न सतत त्यांच्या मनामध्ये असतो. कवीने कसे वागावे, औचित्य कसे पाळावे, स्वाभिमान कसा जपावा या बाबतीत तात्यासाहेबांचे आग्रह पक्के आहेत. त्यांच्या मनामध्ये कडवटपणा नाही. चीड नाही, सूडबुद्धी नाही, आकस नाही, कुणाबद्दल कधी वाईट बोलताना मी ऐकलं नाही. आणि असे असूनही ते आपल्या मतांच्याबद्दल फार पक्के आहेत, फार पीळदार आहेत. वर्तनातील हे बारकावे स्पष्ट व्हावेत म्हणून एक किस्सा सांगतो. किस्सा आहे घरगुती. एकदा आमच्या घरातून त्यांच्याकडे पुरणपोळया गेल्या होत्या. तेव्हा सौ. कानेटकरांना बाई– म्हणजे सौ. शिरवाडकर म्हणाल्या की, "तुमच्या पोळया यांना फार आवडल्या." सौ. कानेटकर म्हणाल्या, "अहो, ते कशालाही चांगलं म्हणतात. तात्यासाहेब कधी कुणाला वाईट म्हणतात का ?" त्यावर बाईंनी उत्तर दिलं, की, "तसं म्हणू नका. ते चांगल्याला चांगलं जरूर म्हणतात. पण वाईटाला चांगलं कधी म्हणत नाहीत. वाईटाचा विषय निघाला तर ते गप्प बसतात." हा स्वैपाकातला, घरातला जो अनुभव आहे तोच साहित्यातलाही, आमचा अनुभव आहे.

त्यांची साहित्यनिर्मिती विविधरूपी आहे. त्यात कथा आहे, काव्य आहे, नाट्य आहे, समीक्षा आहे. तात्यासाहेब स्वतःला समीक्षक मानत नाहीत. पण ते चांगल्या कलाकृतीचे उत्तम रसग्रहण करू शकतात. आणि रसग्रहणाला आवश्यक असलेले श्रेष्ठतेचे सगळे मानदंड त्यांना पुरेपूर माहीत असतात. काही वर्षांपूर्वी मुंबईकरांनी एका व्याख्यानासाठी त्यांना निमंत्रण दिले होते. विषय असाच टीकेचा काहीतरी असावा. त्या वेळी तात्यासाहेबांनी सांगितलं की, "तुम्ही बोलवणारे लोक भले बहाद्दर आहात. तुम्ही लोहाराला सोनाराचं काम करायला सांगता



अनुक्रमणिका







काय ?" तात्यासाहेबांची जाण आणि त्यांचं ज्ञान या बाबतीत पक्के आहे. शेक्सपिअरवर त्यांनी निबंध लिहिले आहेत. सामाजिक बांधिलकीच्या बाजूने त्यांनी तडफदार अशी कैफियत मुंबईच्याच एका भाषणामध्ये मांडलेली होती, तिला खरोखर तोड नाही. या संदर्भातच तात्यासाहेब कवितेकडे कुठल्या दृष्टीने बघतात त्याची आपण माहिती करून घेतली पाहिजे. त्यांनी स्पष्ट म्हटलेले आहे की, केवळ कवितेसाठीच जगणे ही गोष्ट मला मान्य नाही. मराठी काव्यक्षेत्रात दोन संप्रदाय आहेत. एक सौंदर्यवादी आणि दुसरा शक्तिवादी संप्रदाय. काव्य म्हणजे सौंदर्याची पूजा असे मानणारे तांबे किंवा गडकरी आपल्यात होते. काव्य ही ए... आहे आणि त्या शक्तीचा पुरेपूर वापर जीवन जगण्यासाठी, जीवनाला विविध प्र... आणि सामर्थ्य देण्यासाठी केला पाहिजे असे मानणाऱ्या लोकांचा दुसरा संप्र... केशवसुतांचा आणि तात्यासाहेबांचा हा संप्रदाय आहे. तात्यासाहेबांना कवित्वाबद्दल प्रेम आहे. कवितेबद्दलही प्रेम आहे. पण कवित्व ही एक मिरासदारी आहे किंवा मिरवण्याची चीज आहे असे त्यांना वाटत नाही. कवितेची साथसोबतही त्यांना प्रेरक होते, त्यांना आधारदायी होते. पण एरव्हीच्या समाजजीवनात आपण कवी आहोत याचे भान ठेवणे त्यांना नामंजूर आहे. ते असेही म्हणतात की, समाजजीवनामध्ये वावरताना कवित्वाचे भान हे गळून पडले पाहिजे. असे भान गळून पडण्याची शक्यता फक्त संतवृत्तीलाच झेपणारी आहे. आणि त्यामुळेच तात्यासाहेबांची कवित्वाची भूमिका ही तुकारामाच्या जवळ जाते. तुकाराम हा असा एक कवी आहे की, ज्याचे कवित्वाचे भान गळून गेलेले होते. तो अनुभव व्यक्त करण्यासाठी लिहीत होता. आपल्या लेखनाचे पुढे काय होणार याची कोणत्याही प्रकारची चिंता त्याला नव्हती. म्हणूनच तुकारामाचे काव्य हा त्याच्या जीवनाचा आलेख आहे असे मला वाटते. तात्यासाहेबांची कविता हा त्यांच्या जीवनाचा, त्यांच्या मनातील घालमेलीचा आलेख आहे. कवी आपल्या मनाच्या कोषातून बाहेर पडतो आणि खऱ्या अर्थाने समाजाभिमुख होतो, त्याच वेळी त्याच्या वृत्तीत खरी अलिप्तता, खरी निःस्पृहता पाहायला मिळते. त्याच्या वाणीला सुभाषिताचे तेज प्राप्त होते.

तात्यासाहेबांच्या अलीकडच्या कविता वाचल्या तर त्यांतली सुभाषितवजा वचने लक्ष वेधून घेतात. ही सुभाषितं म्हणजे केवळ कल्पनाचमत्कृती नव्हे. हा गाढ अनुभूतीतून निर्माण झालेला एका कविमनाचा तो हुंकार आहे. कवी नेहमीच दोन लेखण्या हातात घेऊन लिहीत असतो. आरंभी मी सांगितले की, तात्यासाहेबांचे पाय जमिनीत घट्ट रुतलेले आहेत आणि मस्तक आकाशात हरवलेय. तसे इथेही सांगता येईल की, त्यांची एक लेखणी ही ऐहिकाबद्दल लिहीत असते आणि दुसरी लेखणी आकाशामधील पारलौकिकाचा विचार करत असते. ॲरिस्टॉटल म्हणतो की, "प्रत्येक मोठा कवी हा आयुष्यभर निरनिराळ्या प्रकारच्या साहित्यरचनेतून एकाच प्रश्नाचे उत्तर देत असतो ! 'व्हाय शुड मॅन सफर ?' "माणसाच्या वाट्याला दुःख का यावं या प्रश्नाचा तत्त्वज्ञानी आणि कवी या नात्याने घेतलेला शोध म्हणजे त्याची साहित्यसृष्टी." तात्यासाहेबांची साहित्यनिर्मिती ही याच भक्कम पायावर उभी

राहिलेली आहे. साहित्याच्या थोरवीबद्दल ज्ञानेश्वरांनी एक फार सुंदर विचार सांगितलेला आहे. 'वाचे बरवे कवित्व, कवित्वी रसिकत्व, रसिकत्वी परतत्त्व स्पर्शु जैसा.' म्हणजे वाणीमध्ये श्रेष्ठ काय ? तर काव्य. कोणते काव्य श्रेष्ठ ? ज्या काव्यामध्ये रसाळपणा आहे असे काव्य ! कोणता रस श्रेष्ठ ? तर ज्या रसाला परतत्त्व स्पर्श झाला आहे तो श्रेष्ठ. तात्यासाहेबांच्या अवघ्या व्यक्तिमत्त्वाला आणि त्यांच्या अवघ्या निर्मितीला हा परतत्त्व स्पर्श झालेला आहे. परतत्त्व हा फार सुंदर शब्द आहे. आणि साहित्याच्या संदर्भात मूल्यांचा विचार निर्माण होतो तेव्हा साहित्याच्या थोरवीच्या गाभ्याला हात घालणारा हा शब्द आहे. ज्ञानेश्वरांना अर्थातच परतत्त्व स्पर्श या शब्दाने आध्यात्मिक असा काही अर्थ सुचवायचा असावा. मलाही 'अध्यात्म' हा शब्द सुचतो. पण ते अध्यात्म असे आहे, "ज्या अध्यात्मामध्ये मनुष्य आणि नियती यांचा विचार येतो. या जीवनाला काही अर्थ आहे का ? की हे जीवन निरर्थक आहे ? हे जीवन सुंदर आहे का कुरूप आहे ? आणि सुंदर करायचे असेल तर कोणत्या मार्गाने सुंदर करता येईल ? माणसाची थोरवी कशात आहे ? इत्यादी विचार जीवनाला व्यापून राहाणारे आहेत. त्या विचाराचा लेखनामध्ये, चिंतनामध्ये पडसाद उमटतो. तो स्पर्श हा ऐहिक जीवनापेक्षा फार वेगळा असतो. त्या स्पर्शाला मी परतत्त्व स्पर्श मानतो. या परतत्त्व स्पर्शामध्ये देवाबद्दल कवीची भूमिका काय आहे याचाही विचार येतो; पण तो भाविकाच्या भूमिकेतून येत नाही, तर चिंतनाच्या, चिकित्सेच्या आणि अनुभवविश्लेषणातून येतो. देवाच्या शोधाबद्दल आणि अस्तित्वाबद्दल तात्यासाहेबांनी अलीकडे खूप कविता लिहिल्या आहेत. त्यांतली एक कविता मोठी लक्षवेधक आहे. कवितेचं नाव आहे 'तो'.

*दिवाणखान्यात बसून चारचौघांच्या संगतीत*
*मी जेव्हा तुझं अस्तित्व नाकारतो,*
*तेव्हा आकाशाचं एक दार किलकिलं करून*
*पाहातोस तू माझ्याकडे कौतुकाने, कुतूहलानेही.*
*आणि सगळे निघून गेल्यावर ताऱ्यांच्या अंधुक*
*प्रकाशात तू उतरतोस माझ्या एकांतात.*
*आणि समोरच्या खुर्चीवर बसून म्हणतोस*
*'अभिनंदन ! तुझं विवेचन छानच होतं.*
*इतकं की मलाही शंका आली माझ्या अस्तित्वाबद्दल*
*पण तरीही मला माहीत आहे मला मानणाऱ्यामध्ये*
*तू अग्रेसर आहेस. फक्त तुझा दिवाणखाना*
*तुझ्या काळजापासून फार दूर आहे : इतकंच.'*

अगदी साध्या शब्दात आणि सुंदर रूपात हा अनुभव प्रकटलेला आहे. या कवितेत या जगात देव आहे की नाही याबद्दलचे चित्र तात्यासाहेबांनी संवादरूपाने किती सुंदर रीतीने



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



व्यक्त केले आहे ते पाहण्यासारखे आहे. अलीकडच्या काळात तात्यासाहेबांच्या काव्यात तत्त्वज्ञानावर विशेष भर दिसतो.

या तत्त्वज्ञानाबद्दल बोलताना आणखीन एक विचार मला सुचतो की, त्यांच्या कवितेला एक सोपेपणा प्राप्त झालेला आहे. त्यांच्या कवितेत एखादी कथा असते, एखादे रूपक असते, एखादा नाट्यात्मक प्रसंग असतो. इतके सहज आणि इतक्या सुंदर रीतीने ते व्यक्त होत असते की, ते वाचल्यावर आपण थक्क होतो. आणि पुस्तक मिटून विचार करू लागतो. त्यांची 'रद्दी' कविता पाहा :

*एकदा रेशन संपल्यावर घरातली रद्दी विकायला काढली*
*तेव्हा तू हसत म्हणालीस,*
*'तुमच्या कवितांचे कागद यात घालू कां ?*
*तेव्हढंच वजन वाढेल.'*
*मी उत्तरलो, 'जे काम काळ उद्या करणार आहे,*
*ते तू आज करू नकोस.'*
*तुझ्या डोळ्यात अनपेक्षित आसवं तरारली.*
*आणि तू म्हणालीस, 'मी तर नाहीच,*
*पण काळही ते करणार नाही.'*

या कवितेतले कथारूप आणि त्यातले नाट्य किती मोहक आहे ! आणि किती साधे आहे ! पण केवढा मोठा विचार त्यात सांगितलेला आहे ! तात्यासाहेबांची अशीच एक चार ओळींची कविता आहे. भारताच्या एकात्मतेबद्दल आपण खूप लंबीचौडी भाषणे ऐकतो, देतो, वाचतो. पण हाच एक विचार किती हृदयस्पर्शी रीतीनं हा श्रेष्ठ कवी व्यक्त करून जातो ते पाहा:

*प्रांत मला दिसत नाही देशाशिवाय*
*देश मला दिसत नाही पृथ्वीशिवाय*
*पृथ्वी मला दिसत नाही विश्वाशिवाय*
*आणि विश्व मला दिसत नाही माझ्याशिवाय*
*तस्मात् शिवाय नमः ।*

केवढा मोठा आशय यामध्ये व्यक्त झालेला आहे ! यासारख्या कविता वाचताना माझ्या लक्षात आले की जातक कथांची ही जात आहे. किंवा बायबलमधे ज्याप्रमाणे पॅरॅबल्स (छोट्या रूपक कथा) आहेत तशी ही कविता आहे. तात्यासाहेबांची कविता किती बदलली आहे, त्याचं समीक्षकांना भान आहे की नाही तेच मला कळत नाही. अजून त्यांच्यावर विशाखाचीच लेबल्स मारली जातात. 'वादळवेल' या संग्रहापासून तात्यासाहेब झरझर बदलत गेलेत आणि त्यांच्या लहानलहान कवितांना देखील एक प्रकारची वैश्विक बैठक प्राप्त झाली आहे.

इथे मला आणखी एक विचार सांगावासा वाटतो. तात्यासाहेबांची अलीकडची कविता

वाचताना मला एका सत्याची विशेषत्वाने जाणीव झालेली आहे. तात्यासाहेब आणि तुकाराम यांच्यात विलक्षण साम्य आहे. हा दुसरा तुकारामच पुन्हा मराठी भाषेत अवतरलेला आहे. तात्यासाहेबांच्या सगळ्या वृत्ती, कवित्वाबद्दलची त्यांची कल्पना, कवित्वाचे त्यांचे सामर्थ्य, त्यांची शब्दकळा, त्यांचा उपरोध, त्यांचा विनोद, त्यांचे कारुण्य, उच्च मूल्यांचा आग्रह हे सगळे विशेष तुकारामामध्ये पाहायला मिळतात. किंबहुना तुकारामामध्ये जे पाहायला मिळते ते तात्यासाहेबांमध्ये पाहायला मिळते. दोघांच्या शब्दकळाही तशाच आणि दोघांचे फटकारेही तसेच. हे माझ्या लक्षात आल्यानंतर तुकारामाच्या शब्दामधून तात्यासाहेबांच्या सत्काराच्या वेळी मी अभंगरचना केली. तात्यासाहेबांच्या आणि तुकारामाच्या वृत्तीमधले साम्य आणि वैशिष्ट्य सांगताना मी असे म्हटले होते :

*गोदेला मिळाले इंद्रायणीचे पाणी*
*गोदातीरी उमटली पुन्हा तुकयाची वाणी*
*जे का रंजले गांजले तयासी म्हणे जो आपुले*
*ते साधुत्व देवरूप झाले इये गंगेच्या काठी*
*मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास कठिण वज्रासी भेदू*
*ऐसी पुन्हा गर्जना ऐकीली इये गंगेच्या काठी*
*भले तरी देऊ कासेची लंगोटी, नाठाळाच्या माथी देऊ काठी*
*ऐसी ऐकीली दमदाटी इये काव्यगंगेच्या काठी*
*वेद अनंत बोलिला, अर्थ इतुकाची साधला*
*पराविया सुखे सुखी व्हावे*
*पीडितांच्यासाठी शब्दब्रह्म व्हावे*
*एरवी वृक्षवल्ली आम्हा सोयरी वनचरे*
*पक्षीही सुस्वरे आळवीती*
*येणे रुचे एकांताचा वास, आपला संवाद आपणासी*
*अहो बीज भाजून केली लाही*

काय तुकाराम लिहितो बघा. त्याला सांगायचेय की, आम्हाला आता जन्ममरण उरलेले नाही. कारण आम्ही बीजाची म्हणजे जोंधळ्याची लाही करून टाकली आहे आणि लाही पेरून पुन्हा काही अंकुर निर्माण होत नाही. जन्ममरणाच्या फेऱ्यातून आम्ही मुक्त झालेलो आहोत. तुकाराम म्हणतो,

*अहो बीज भाजून केली लाही म्हणून जया हर्षखेद नुरले काही*
*तो अणूरेणुया थोकडा, कवि झाला आकाशाएव्हढा*
*त्याचा आनंद केवढा ? आनंदाचे डोही आनंद तरंग*
*केले हे कवित्व म्हणाल हे कोणी*

*नव्हे माझ्या पदरीची वाणी*
*मी तो निमित्त मापासी बैसलो*
*बोलविता धनी देहूचा वाणी*

तात्यासाहेबांच्या संदर्भातला शेवटचा विचार. अशा या कविश्रेष्ठाचे अभिनंदन आपण काय करणार? आपण गौरव सोहळा मांडला खरा. पण खरे म्हणजे अशा कविश्रेष्ठाच्या पायाशी नतमस्तक होणे आणि त्याला अभिवादन करणे हेच त्याचे खरे अभिनंदन आहे. पु. ल. देशपांडे यांनी हा विचार फार उत्तम प्रकारे सांगितला आहे. तोच माझ्या मनामध्ये भरून राहिला आहे. व्यक्तिशः तात्यासाहेबांचे माझ्यावरचे ऋण अमाप आहे. ते इथे आहेत आणि त्यांचा सहवास मला मिळतो हा मला एक मोठा आधार आहे. त्यांचे अभिनंदन मी करू शकत नाही. मी अभिवादन करतो. पण या कविश्रेष्ठाचं अभिवादन तरी कोणत्या शब्दात करायचे? त्यासाठी त्यांच्याच शब्दाची भीक मागितली पाहिजे. तात्यासाहेब आमचे ज्येष्ठ मित्र आहेत. मित्र दोन्ही अर्थांनी म्हणतो– सूर्य या अर्थाने आणि सुहृद या अर्थानेदेखील.

*अमर्याद मित्रा तुझी थोरवी आम्हां*
*मला ज्ञात मी एक धूलिकण*
*अलंकारण्याला परी पाय तुझे*
*धुळीचेच आहे मला भूषण*

(नाशिककरांच्या वतीने कुसुमाग्रजांचा सत्कार झाला त्या वेळी केलेले भाषण)

(प्रा. वसंत कानेटकर, शिवाई, शरणपूर रस्ता, नाशिक)

---

## साभार स्वीकार

### धर्म

***सहजमार्ग प्रकाशित राजयोगाचा प्रभाव–** श्री. रामचंद्र, सहज साहित्य प्रकाशन, १६६ पर्वती गाव, पुणे ९, १-१९९०, किं. ४० रु. पृष्ठे ८०.

### कथासंग्रह

***तृष्णा–** मुकुंद बापट, साठे प्रकाशन, ७६५, सदाशिव पेठ, फडतरे चौक, पुणे ३०, १-१९९०, ६० रुपये. पृष्ठे– २७४.

### काव्य

***दोन पिढ्यांच्या कविता–** वि. त्र्यं. गर्दे, सौ. प्रतिभा जवळेकर, वि. त्र्यं. गर्दे प्रकाशन, ६०१ पुलाची वाडी, शिवाजीनगर पुणे ४, १० रुपये, पृष्ठे २०.

***साहित्य–** काव्य विशेषांक जून १९९०, मुंबई मराठी साहित्य संघ, गिरगाव, मुंबई ४, संपा– मल्हार ढगे, पद्मा घारपुरे, दहा रुपये.

***आनंददीप–** वसंतराव घासकडवी, चेतश्री प्रकाशन, अमळनेर, १-१९९०, ३० रुपये, पृष्ठे ५२.











# गो. नी. दांडेकर

## अशाश्वतातील शाश्वताचा शोध घेणारा साहित्यिक

प्रा. वसंत दीक्षित

गो. नी. दांडेकर यांच्या व्यक्तिमत्त्वातील जादूने मला नेहमीच मोहिनी घातली आहे. त्यांच्या साधेपणाने मी आनंदून जातो. मध्यम बांधा, गोरा गोरा रंग, धारदार नाक, उत्साह, रोखून पाहणारे मधाळ-करुण-रसाळ डोळे आणि त्यांच्या समाधात, प्रसन्न चित्त चेहऱ्यावर शोभून दिसणाऱ्या रेखीव दाढीने एक ऋषितुल्य व्यक्ती आपण पाहतो आहे या जाणिवेने मन प्रसन्न होते. त्यांचे वक्तृत्व, त्यांचे लेखन, त्यांची भटकंती, त्यांचे निसर्गाशी जडलेले मैत्र, इतिहासाशी जुळलेले नाते यांतून त्यांचे व्यक्तित्व निखरत असते.

गो. नी. दांडेकर फिरत असतात. भटकंतीत रमत असतात. गड-किल्ल्यावर पुन्हा पुन्हा चढत असतात. मराठ्यांच्या पराक्रमाचा इतिहास आठवत असतात. शिवरायाचे चालणे-बोलणे शब्दात साकार करत असतात. संतांचं आध्यात्मिक मन, संतांची अहिंसात्मक अपरिग्रह वृत्ती हीच शाश्वत असते. मग दांडेकरांचा मोगरा फुलतो. त्या मोगऱ्याची दरवळ आपल्या डोळ्यांना ओली करते. आपले मन दंवबिंदूसारखे तरल आणि निर्मळ बनते. श्रीधरशास्त्री पाठकांचे ऋषितुल्य जीवन, सोनोपंत दांडेकरांचे सदा हसतमुख अपरिग्रही मन, वारकऱ्यांच्या संगतीत अनुभवलेला टाळमृदंगाचा नाद, गाडगेबाबांची स्वच्छतेची चळवळ या साऱ्यांचा प्रभाव जाणवतो.

दांडेकरांची कादंबरी ही केवळ कोकणची आहे काय ? मुळीच नाही. त्यांच्या साहित्यात मराठीच्या पंधरा बोली आढळतात. त्यांनी कोकण सोडले, पण त्यांचे मन मात्र कोकणाला सोडू शकले नाही. कोकणच्या मातीवर त्यांनी मनापासून प्रेम केले. साहित्यात कोकणाला त्यांनी अजरामर केले. गो. नी. दांच्या नायिका कोकणचा किनारा सदासर्वकाळ व्यापून राहिलेल्या आहेत.

स्त्री जीवनाचे विविध पैलू त्यांनी समर्थपणे सादर केले. 'पडघवली'मधील शारदा, 'भ्रमणगाथे'तील यशोदा, 'जैत रे जैत'मधील चिंधी, 'अजून नाही जागे गोकुळ'मधली प्रेयसी कृष्णा, 'मृण्मयी'तील मनू इत्यादी कितीतरी नायिका मराठी साहित्यात मानाचं स्थान पटकावून आहेत. 'मृण्मयी'तील मनू. टपोरे डोळे एवढेच तिचे वेगळेपण. पण ज्ञानेश्वरीची सोबत तिला जडली आणि ती आध्यात्मिक बनली. पुरुषांच्या आकर्षणाला, वासनेला पळवून लावणारी विलक्षण ताकद तिच्या नवीन रूपात निर्माण झाली. ती अदृश्य ताकद अप्पांना दिसली आणि 'मृण्मयी' साकार झाली. मनूपेक्षा 'शितू' एकदम वेगळी. कशाचीही फिकीर न करता अमर्याद प्रेम करणे हा तिचा स्थायी धर्म. ती विसूवर प्रेम करते. बिनधास्त, उघड उघड. विसूही तिच्यावर










प्रेम करतो. पण विसूच्या प्रेमाला प्रतिसाद द्यायचा नाही हे तिने स्वतःवर लादून घेतलेले बंधन ती अखेरपर्यंत पाळते. त्यांचे नायकही सामर्थ्यवान आहेत. 'भ्रमणगाथे'तील नायक, त्यातलाच महाधिपती निश्चलपुरी, 'आम्ही भगीरथाचे पुत्र'मधील नायक, 'पडघवली'तील गुजाभाऊ आणि व्यंकूभावजी – त्यांच्या कादंबऱ्यातील नायक-नायिकांच्या स्वभावाला, एका अनोख्या चिरंतन वास्तवाची, शाश्वताची डूब असते, जी आपल्या मनात कोरली जाते.

स्मरणगाथेतील अनुभवांचा थरार, नर्मदा परिक्रमा, विकारवासनांचं वादळी मोहोळ– हे वाचताना अप्पांचं संयमी मन जसं दिसतं, तसं त्यांच्या जीवनातील व्रतस्थ शाश्वताचे साद-पडसाद आपल्याही मनावर उमटतात. हे अनंत विश्व व्रतस्थ आहे. सृष्टी व्रतस्थ आहे. सूर्यचंद्राचे, ग्रहताऱ्यांचे फिरणे व्रतस्थ आहे. आकाश आणि अवकाशाला व्यापून टाकणारी ॐकारातील लय व्रतस्थ आहे. त्या लयीत अप्पांचे मन विरघळलेले असते. त्या लयीतील शाश्वताने हे सृष्टिचक्र अनादी काळापासून अखंड फिरत आहे. अशाश्वताने तर विनाश अटळ असतो. अविनाशी आणि शाश्वत सत्याचा पाराच अप्पा कमालीच्या कलात्मकतेने, शब्दांच्या सामर्थ्याने आणि व्रतस्थ वृत्तीने धरून ठेवत असतात.

मानवी जीवनातील अशाश्वत तर शाश्वत आहेच पण त्यातील शाश्वत हे सत्य आहे. या शाश्वत सत्याचा सतत शोध त्यांनी घेतला आहे. निसर्गतत्त्व शाश्वत आहे. त्यातील रंग, गंध, रूपमत्त सौंदर्य शाश्वत आहेत. रंग दगडगोट्यात आहे, पाना-फुलांत आहे. ते दगड-गोटे अप्पांनी गोळा केले आहेत. त्यांनी काढलेले फोटो पाहताना, त्यातील रंगरूपाने आपण हरखून जातो. त्या फोटोंचा, प्रतिमांचा गंध आपल्याभोवती दरवळत असतो. त्या फोटोंना स्पर्श करावासा वाटतो. वेगवेगळ्या अँगलने ते फोटो न्याहाळताना त्यांच्यातील जिवंत थरथर आपल्या संवेदनांना तरल करत असते. त्यातील रंग ओले असतात, स्पर्श उष्ण आणि मुलायम असतो. त्या फोटोमधील भाववृत्ती ही त्यांची भाववृत्ती असते. ते 'मूड' अप्पांचे असतात. आणि अशाश्वतातील शाश्वताला त्यांनी पकडलेले असते.

त्यांच्या लेखन शैलीलाही शाश्वताचा गहिरा रंग आहे. ती खोल आदिम भावभावनांना भिडणारी आहे. ती मध्यरात्रीच्या अनाहत नादाच्या गूढ रम्यतेसारखी किणकिणणारी आहे. ती चित्रमयी आहे. नाट्यमय रूप घेणारी आणि काव्यात्मतेच्या अंगाने धावणारी आहे, शाश्वत झऱ्यातून खळाळणारी आहे.

त्यांचे वक्तृत्व त्यांच्या ऋषितुल्य व्यक्तिमत्त्वासह आपल्या कानांना, डोळ्यांना, मेंदूला, विवेक-विचाराला आवाहन करते, ज्ञान-तपश्चर्येच्या तेजोवलयातील चिंतनाला गुंफते, मनाला स्पर्श करते, साहसी अनुभवांना आपल्या डोळ्यांपुढे साकार करते. मंगल विचारांना उदात्ततेकडे घेऊन जाते, अल्पाक्षर रमणीयतेने आपल्यापुढे चुंबकीय आकर्षणाने उभे राहते.

अप्पा रसिक आहेत. उदार आहेत. पराक्रमाचे, सामर्थ्याचे पूजक आहेत. नगरमधील एका कॉलेजातील एका विद्यार्थ्याचे मल्लखांबावरील चापल्य पाहून त्यांनी त्या विद्यार्थ्याला शंभर रुपयाची नोट दिलेली मी पाहिली आहे. अप्पांचे चैतन्यदायी व्यक्तिमत्त्व मनाला भुरळ पाडते.

अकोला येथे भरलेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे १९८१ साली अध्यक्ष असताना त्यांची अनेक रूपे पाहायला मिळाली. रेल्वेच्या प्रवासातील हा अध्यक्ष गाडी स्टेशनवर थांबल्यावर आमच्यासारख्या साहित्यपंढरीच्या वारकऱ्यांची जातीने आर्जवी आणि प्रेमळ विचारपूस करत होता. त्यात मानवतेच्या भाववंधनाचेच दर्शन घडत होते.

अमृत महोत्सवी वर्षात पदार्पण करीत असलेल्या अप्पांनी शतायू व्हावे !

वसंत दीक्षित, अहमदनगर.

---

**काव्य**

***गझलवंती–** दिवाकर दुनाखे, ३०३ दुर्वांकुर, लक्ष्मी पेठ, दमाणी नगर, सोलापूर– १, १५ रुपये, पृष्ठे ५६.

***सुरवंटाचं फुलपाखरू–** डॉ. शशिकांत देशपांडे, तोरणा प्रकाशन, २०५, शुक्रवार पेठ, पुणे २, १-१९९०, १५ रुपये, पृष्ठे ५४.

***मेघरजनी (हिंदी) –** मुकुंद बापट, किरण प्रकाशन ५ ।२ ।६७४ रिसाला अब्दुल्ला हैद्रावाद, १-१९९०, ३० रुपये, पृष्ठे– ११४.

***निरूकुकुरळ–** अनु. मु.गो. वेंकटकृष्णन्, शक्ती फेनान्स लिमि. २९/३० डॉ. राधाकृष्णन् रोड, मैलापूर, मद्रास– २-१९८८, ७५ रुपये, पृष्ठे ४३४.

**चरित्र**

***कर्मयोगी अण्णा हजारे–** सुरेशचंद्र वारघडे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे ३०, १-१९९०, ६० रुपये पृष्ठे– ७५

***कशाला उद्याची वात–** हुवळीकर शांता, श्रीविद्या प्रका. २५० शनि. पेठ, पुणे ३०, १-१९९०, ६० रुपये. पृष्ठे-१३४.

**कादंबरी**

***जातीला जात वैरी–** शिंदे ना.म., पॉप्युलर प्रकाशन. ताडदेव, मुंवई– ३४, १-१९९०, ७५ रुपये. पाने– १८२.

***मी एक अश्वत्थामा–** शशिकांत देशपांडे, तोरणा प्रकाशन, २०५ शुक्रवार पेठ, पुणे २, १-१९९०, ३५ रुपये. पृष्ठे– ११४.

*

# वैदर्भीय मराठी साहित्यिक

## विदर्भातील साहित्यिक परंपरेचा धावता आलेख

राजेन्द्र डोळके, चंद्रपूर.

'सारस्वती जन्मभूः' म्हणून राजशेखरने गौरविलेल्या व 'वीरपुरुषं महाराष्ट्रं' म्हणून त्रिविक्रमाने वाखाणिलेल्या विदर्भाची व्याप्ती प्राचीन काळी फार विस्तृत असली तरी, आज मात्र तिचा कमालीचा संकोच झालेला आहे. उत्तरेस नर्मदेपर्यंत, दक्षिणेस गोदावरीपर्यंत, पूर्वेस वैनगंगेपर्यंत आणि पश्चिमेस खानदेशापर्यंत प्राचीन विदर्भाची व्याप्ती असली तरी आज मात्र बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ, वर्धा, नागपूर, भंडारा, चंद्रपूर व गडचिरोली या ९ जिल्ह्यांनी व्याप्त असलेल्या प्रदेशालाच विदर्भ म्हटले जाते. यांतील पहिले चार जिल्हे वऱ्हाड या नावाने ओळखले जातात. अर्थात 'विदर्भातील साहित्यिकां'त उपरोक्त जिल्ह्यांतील भूभागात समाविष्ट होणाऱ्याच साहित्यिकांचा अंतर्भाव करणे भाग आहे.

प्राचीन विदर्भाची शकले पडून निरनिराळ्या कारणांनी आज मराठी भाषेचं सांस्कृतिक केंद्र पुण्या-मुंबईकडे दिसत असलं तरीही, सुरुवातीपासून आजपर्यंत मराठी भाषेतील ग्रंथनिर्मितीत विदर्भाचा जेवढा महत्त्वाचा वाटा आहे तेवढा महाराष्ट्रातील इतर प्रांतांचा नाही, असे खात्रीलायक म्हणता येते. विदर्भ हीच मराठी भाषेची जन्मभूमी असून, तिचे संगोपन पूर्वकाळी वऱ्हाडातच झाले हे मान्य करण्यावाचून गत्यंतर नाही. एखाद्या सुंदर स्त्रीने धारण केलेले अनेक अलंकार ओढून घेतले; तरीही दागिन्यांशिवाय दिसणारं तिचं सौंदर्य मात्र ज्याप्रमाणे कोणाला हिरावून घेता येत नाही, त्याप्रमाणेच प्राचीन विदर्भाच्या अंगावर असलेले वाङ्मयरूपी दागिने आज इतर अनेक प्रांतांनी ओढून घेतले असले तरी, वाङ्मयीनदृष्ट्या मूळच्याच सुंदर असलेल्या या अस्सल विदर्भाजवळ त्याचं वाङ्मयीन सौंदर्य मात्र कायमच आहे व ते मात्र कुणालाही हिरावून घेता यायचे नाही. अर्थात, आजचा संकोच पावलेला विदर्भ— व त्यातही वऱ्हाड हेच मराठी भाषेचे माहेर होय.

**प्राचीन मराठी कवी**

'विदर्भविषयः सारस्वती जन्मभूः' (बालरामायण, १०-७४) हे राजशेखराने केलेले विदर्भाचे वर्णन मराठी साहित्याला अगदी पूर्णपणे लागू पडते. मराठी शारदेने आपल्या वीणेची पहिली तार झंकारली ती विदर्भातच. विदर्भानेच महाराष्ट्राला आद्य मराठी ग्रंथकार दिला. 'ज्योतिषरत्नमाला' ह्या मराठीतल्या आद्य ग्रंथाचे कर्ते श्रीपतिभट्ट हे बुलढाणा जिल्ह्यातील रोहिणखेड येथे राहणारे. मराठीचे आद्य कवी मुकुंदराज हेही आंभोऱ्याचे, म्हणजे विदर्भाचेच. महानुभावीय मराठीतील आद्य गद्यग्रंथाचे अपरूप अलंकार विदर्भानेच घडविले आणि आद्य मराठी कवयित्री महदंबा हिने आपले साधेच पण हृदयंगम धवळे गायिले तेही विदर्भातच.

मराठीतले उत्कृष्ट ललितकाव्य 'शिशुपाळवध'कर्ते भास्करभट्ट बोरीकर हेही मेहकर जवळील बोरीचे म्हणजे विदर्भाचेच होय, असे डॉ. वि. भि. कोलते यांनी सिद्ध केले आहेच. सारांश, मराठीच्या प्रारंभ काळात केवळ विदर्भाचीच भाषा कानावर येते. सतराव्या शतकातील कवी अमृतराय (बुलढाणा जिल्ह्यातील साखरखेडा), देवनाथ-दयाळनाथ हे गुरुशिष्य व आणखी विदर्भातील बरेच ज्ञात-अज्ञात कवी यांनी मराठी भाषेचे संवर्धन केले.

**अर्वाचीन कवी**

अर्वाचीन विदर्भानेही अनेक जातिवंत कवी महाराष्ट्रशारदेस दिले आहेत. विदर्भातील साधारणतः पहिले महत्त्वाचे कवी म्हणून विष्णू मोरेश्वर महाजनी हे समजले जातात. 'गोल्डन ट्रेझरी'तील वर्डस्वर्थ, कॅम्पबेल, लाँगफेलो वगैरे कवींच्या भावमधुर गीतांची सुरस भाषांतरे त्यांनी आपल्या 'कुसुमांजली'त केली आहेत. यांच्याच समकालीन किंवा थोडे नंतरचे म्हणून श्री.कृ.कोल्हटकर, नी.ब. भवाळकर, कृष्णशास्त्री घुले, श्री. केतकर या हौशी कवींचाही उल्लेख करावा लागतो.

यानंतरचे विशेष उल्लेखनीय कवी म्हणजे 'बी' हेच होत. यांचे स्थान केवळ विदर्भाच्याच नव्हे, तर महाराष्ट्रातील कविमंडळामध्ये फार वरचे आहे. विदर्भातील राष्ट्रीय कवितेच्या युगाला प्रारंभ ना. के. बेहेरे व आनंदराव कृष्णाजी टेकाडे यांनी केला. त्यांच्यातच, थोड्या नंतरच्या काळातील ग. त्र्यं माडखोलकर यांचाही समावेश करावा लागेल. बेहऱ्यांच्या पत्नी कै. लक्ष्मीबाई बेहेरे याही नामांकित कवयित्री होत्या. श्री. जयदेव केशव उपाध्ये व श्रीनिवास रामचंद्र बोबडे या नागपूरच्या कविमित्रांची कविता संख्येने अल्प आहे, परंतु गुणाने महान आहे. अमरावतीचे श्री. बळवंत गणेश उपाख्य अण्णासाहेब खापर्डे हे त्यांच्या गूढगुंजनाकरिता प्रसिद्ध होते. मराठीत त्यांनी गद्यकाव्याची एक आगळी परंपरा सुरू केली. यानंतरचे महत्त्वाचे कवी म्हणजे गु.ह., आ.रा.(अनिल) व वा.ना.ही देशपांडेत्रयी होय. या तिघांनीही काही गूढगीते रचली आहेत. त्यांपैकी पहिल्या दोघांचे काव्य भावनाप्रधान असून तिसऱ्याचे बुद्धिप्रधान आहे. आ.रा. व वा.ना. हे मुक्तछंदाकरिता विशेष प्रसिद्ध आहेत. अनिलांच्या पत्नी सौ. कुसुमावती देशपांडे याही मधूनमधून काव्यरचना करीत होत्या. याच काळातील उल्लेखनीय कवी म्हणजे पांडुरंग श्रावण गोरे, ना.ना. हूड व नारायण माधव सरपटवार हे होत. पु.य. व सौ. विमलाबाई देशपांडे या पतिपत्नींची कविता 'निर्माल्यमाला' या नावाच्या संग्रहात प्रसिद्ध झाली आहे. या. मु.पाठक, भ.श्री. पंडित व वि.भि.कोलते हे तिघेही जवळजवळ समकालीन कवी. श्री. पाठक हे त्यांच्या 'शशिमोहन'करिता महाराष्ट्रात विख्यात आहेत. पंडितांच्या कवितेत तांबे यांचा प्रतिध्वनी काही वेळा ऐकू येतो. शिवाय ते शिशुगीताकरिता विशेष प्रसिद्ध आहेत. कोलते यांची रचना पांडित्यप्रचुर आहे. रानारानात शीळ फुंकणारे बुलढाण्याचे ना. घ. देशपांडे हे महाराष्ट्रातील एक महत्त्वाचे कवी. बुलढाण्याचेच ज. श्री. देशपांडे यांनी रवींद्र काव्याची आठवण करून देणारे 'मननकाव्य' मराठीला दिले. प्रा. शरच्चंद्र मुक्तिबोध हे मराठी साहित्यात एकूणच महत्त्वाचं व्यक्तिमत्त्व ! नवकवीत नागपूरच्या या कवीचं स्थान अतिशय महत्त्वाचं










आहे.

मुक्तिबोधानंतरच्या पिढीतील महत्त्वाचे कवी म्हणून सुरेश भट यांचाच उल्लेख करावा लागेल. आज महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात भटांची कविता-गजल गाजते आहे. भटांच्याच पिढीतील वणीचे प्रा. राम शेवाळकर (असोशी, रेघा) व अमरावतीचे प्रा. मधुकर केचे (दिंडी गेली पुढे, आसवांचा ठेवा, पुनवेचा थेंब वगैरे) यांचाही उल्लेख करावा लागेल. नागपूरचे कवी ग्रेस हे दुर्बोध कवी म्हणून महाराष्ट्रात विख्यात आहेत. त्यांच्याच बरोबरचे प्रा. श्रीधर शनवारे हेही नागपूरातील एक चांगले कवी आहेत. अलीकडेच त्यांचा 'थांग-अथांग' हा तिसरा काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला आहे. नागपुरातीलच आणखी कवी म्हणजे प्रा. सुरेश देशपांडे व कै. गु. ह. देशपांडे यांच्या कन्या सौ. विदुला देशपांडे हे होय. श्री. देशपांडेंचा 'आरती' हा कवितासंग्रह वाचून; देशभक्तिपर काव्याला वाईट दिवस आले आहेत असे कोणाला म्हणता यायचे नाही. सौ. देशपांडे यांचा 'मायबोली' हा वऱ्हाडी गीतांचा संग्रह काही महिन्यांपूर्वीच प्रसिद्ध झाला आहे.

याशिवाय बाबा मोहोड, ज्ञानेश्वर साधू, प्रा. विठ्ठल वाघ, श्रीपाद भालचंद्र जोशी, मृणाल चिंचाळकर, उ. रा. गिरी, भगवान ठग, सुलभा हेर्लेकर, वासंती जोशी, श्रीपाद गंगाधर कावळे इत्यादी काही नवेजुने कवी उल्लेखनीय आहेत.

गद्यवाङ्मय : अ) नाटके

विदर्भात नाट्यरचनेची सुरुवात बऱ्याच जुन्या काळी झाली असली तरीही, केवळ वैदर्भीय नाटककारांतच नव्हे, तर अखिल महाराष्ट्राच्या नाटककारांतही स्वतंत्र व नावीन्यपूर्ण नाटके लिहिण्याचा पहिला मान श्री. कोल्हटकर यांनाच देणे योग्य आहे. त्यांनी लिहिलेल्या नाटकांची नावे देण्याची काही आवश्यकता नाही. कोल्हटकरांनंतर नाणावलेले नाटककार म्हणजे वा. गो. ऊर्फ वीर वामनराव जोशी हे होत. यांची 'रणदुंदुभि', 'धर्मसिंहासन' व 'राक्षसी महत्त्वाकांक्षा' ही तीन वीरश्रीयुक्त नाटके प्रसिद्ध आहेत. यांच्याच पिढीतील श्री. धामणगावकर (धनुर्भंग), श्री. वा. वा. भोळे (अरुणोदय, सरलादेवी), भवाळकर (राजा श्रियाळ), श्री. विनायक हम्बर्डे (दखखनची जननी), कविर्य टेकाडे (मथुरा, मधुरमीलन) इ. नाटककार उल्लेखनीय आहेत. श्री. बेडेकरांचे 'ब्रह्मकुमारी' हे नाटक विशेष उल्लेखनीय आहे. नाना जोग हे एक महत्त्वाचे नाटककार होत. 'चित्रशाळा', 'सोन्याचे देव' व 'भारती' ही त्यांची महत्त्वाची नाटके आहेत.

यानंतरच्या पिढीतील श्रेष्ठ नाटककार म्हणून श्री. पुरुषोत्तम दारव्हेकर यांचेच नाव घ्यावे लागते. त्यांचे 'चंद्र नभीचा ढळला', 'वऱ्हाडी मानसं', 'कट्यार काळजात घुसली' वगैरे फार प्रसिद्ध नाटके आहेत. मधुकर आष्टीकर, वरोड्याचे मो. दा. देशमुख व डॉ. मनोहर रोकडे हेही विदर्भातील उल्लेखनीय नाटककार होत. महेश एलकुंचवार हे महाराष्ट्रातील एक सुविख्यात नाटककार आहेत. त्यांच्या 'सुलतान', 'झुंबर', 'होळी', 'गार्बो', 'पार्टी', 'वाडा चिरेबंदी' इत्यादी नाट्यकृती आहेत.



अनुक्रमणिका

आ) कादंबरी

ना. के वेहेरे (सीतावनवास, जीवनरहस्य, युद्धसंसार, अहिल्योद्धार), बा. सं. गडकरी (सुधारणेचा मध्यकाळ, पुष्पमाला), नी. ब. भवाळकर (वेहेन पिरोज), डॉ केतकर (गोंडवनातील प्रियंवदा, आशावादी), कोल्हटकर (दुटप्पी की दुहेरी, श्यामसुंदर), य. खु. देशपांडे (माझी शांती) इत्यादी सुरुवातीच्या काळातील विदर्भातील काही कादंवरीकार आहेत. नंतरच्या पिढीतील आख्ख्या विदर्भाला अभिमान वाटावा व ज्यांनी फडके-खांडेकर लाटेला समर्थपणे तोंड दिले अशा दोन कादंबरीकारांचा उल्लेख करावा लागतो. श्री. ग. त्र्यं. माडखोलकर व पु. य. देशपांडे हे ते दोन कादंवरीकार होत. विश्राम बेडेकर यांची 'रणांगण' ही फार गाजलेली कादंवरी आहे. पु. भा. भावे यांनीही कादंबरीलेखन केले आहे. शं. बा. शास्त्री यांची 'अडेलतट्टू' ही उल्लेखनीय कादंवरी आहे. नंतरच्या पिढीतील गीता साने ('निखळलेली हिरकणी', वठलेला वृक्ष, हिरवळीखाली, लतिका, फेरीवाला, आविष्कार, माळरानात वगैरे), प्रा. शरच्चंद्र मुक्तबोध (क्षिप्रा, सरहद्द, जन हे वोळतु जेथे), प्रा. शरच्चंद्र टोंगो (प्रलय, लकेरी, स्वीकार) वगैरे प्रमुख नावे आहेत. अमरावतीचे श्री. उद्धव ज. शेळके यांच्या 'धग'ला फार बहुमान मिळाला आहे. रशियन भाषेतही 'धग' आता भाषांतरित होत आहे. त्याशिवाय 'साहेब', 'बाई विना बुवा' ह्या कादंबऱ्याही गाजल्या आहेत. अमरावतीचेच प्रा. मधुकर केचे (मोती ज्याच्या पोटी), प्रा. भा. श्री. परांजपे (युगावेगळा), डॉ. वसंत वऱ्हाडपांडे (चित्रशाळा), डॉ. भाऊ मांडवकर (माझी चाळीस भावंडे) ह्यांनीही कादंबरीलेखन केलेले आहे. अमरावतीचेच मनोहर तल्हार यांच्या 'माणूस' या कादंबरीचा व श्री. मधुकर वाकोडे यांच्या 'झैलझपाट' ह्या कादंबऱ्यांचा स्वतंत्र उल्लेख करावा लागतो. 'अप्रिया', 'अफलातून', 'शुक्रथेंब', 'अशरीरी' वगैरे कादंबऱ्याही श्री. तल्हार यांनी लिहिल्या आहेत. चंद्रपूरचे प्रा. सुरेश द्वादशीवार हे आजचे एक महत्त्वाचे कादंवरीकार आहेत. 'तांदळा', 'अलकनंदा', 'हाकुमी' वगैरे एकापेक्षा एक सरस कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या आहेत. त्यांच्याकडून मोठ्या अपेक्षा करायला हरकत नाही. चंद्रपूरचेच श्री. दादा देशकर व खामगावचे प्रा. सहस्रबुद्धे (युगावतार) हेही कादंबरीकार निश्चितच उल्लेखनीय आहेत.

इ) कथा

वा. सं. गडकरी, कोल्हटकर, अ. तु वाळके, शं. बा. शास्त्री, प्र. शां. मांजरेकर, व्य. शं. वकील, गो. रा. दोडके, श्री. के. बोवडे, सौ. बंबेवाले, सौ. कुसुमावती देशपांडे इ. काही जुने कथाकार आहेत. पण, विदर्भातील कथाकारांमध्ये सर्वांत ठळकपणे नांव दिसते ते श्री. पु. भा. भावे व श्री. वामनराव चोरघडे यांचेच. एकंदर मराठी कथालेखकांमध्ये यांचे स्थान अतिशय महत्त्वाचे आहे. श्री. ग. त्र्यं. माडखोलकर (रातराणीची फुले), भा. श्री. परांजपे (वसंताच्या खुणा), उद्धव शेळके (शिळान वगैरे), डॉ. वसंत वऱ्हाडपांडे (वास्तु, उत्सव), डॉ. द. भि. कुलकर्णी (रेक्वियम) ह्या जेष्ठ साहित्यिकांनीही कथालेखन केले आहे. श्रीमती आशा बगे (मारवा, अत्तर) ह्या नागपूरच्या एक अतिशय आघाडीच्या कथालेखिका आहेत. डॉ. सौ. शकुंतला खोत ह्याही कथालेखन करीत असतात.

**संशोधन**

ललितवाङ्मयाच्या विवेचनानंतर आता गंभीर वाङ्मयाकडे वळू. विदर्भात संशोधनपर वाङ्मय पुष्कळच निर्माण झाले आहे. वैदर्भीय संशोधकांची एक प्रदीर्घ परंपरा आपल्याला आढळते. ह्या संशोधनपर वाङ्मयाचे निरनिराळे पोटभेद पाडून परामर्श घ्यावा लागतो.

**अ) इतिहासविषयक**

विदर्भातीलच नव्हे; तर महाराष्ट्रातील आद्य संशोधकाचा मान श्री. नीळकंठ लक्ष्मण ढुमे ऊर्फ सरमुकद्दम यांच्याकडे जातो. त्यांनी सन १८६२ मध्ये 'वणीचा इतिहास', गोंडाच्या बखरी, छंद, पोवाडे, जमीनदारांच्या सनदा, भोसल्यांचा इतिहास, यांच्या आधाराने लिहिला आहे. इ. स. १८८९ मध्ये, वा. दा. ओक यांनी सान्यांच्या सहकार्याने 'नागपूरकर भोसल्यांच्या संबंधाचे कागदपत्र' प्रसिद्ध केले. विदर्भ इतिहास संशोधन क्षेत्रात श्री. यादव माधव काळे यांची कामगिरी फार मोलाची आहे. त्यांनी लिहिलेला 'वऱ्हाडचा इतिहास' फार महत्त्वाचा आहे. नागपूर प्रांताचा इतिहासही त्यांनी लिहिला आहे. डॉ. यं. खु. देशपांडे हे विदर्भातील एक अग्रगण्य संशोधक. त्यांनी मार्कंड, उनकेश्वर, जैनद, नंदगाव- खंडेश्वर येथील शिलालेख प्रसिद्ध केले आहेत. 'वत्सगुल्म महात्म्य' या ग्रंथाची छापील शंभर पानांची प्रस्तावना विशेष उल्लेखनीय आहे. वत्सगुल्माशी संबंधित असलेल्या शिलालेख, ताम्रपट, काव्ये, पुराणे इत्यादींविषयीची माहिती, त्यांनी या प्रस्तावनेत दिली आहे. अलीकडे त्यांनी व प्रा. म. शं. वाबगावकर यांनी खेरला येथील शिलालेखाचे वाचन केले होते. डॉ. वा. वि. मिराशी हे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे शिलालेखशास्त्रज्ञ! त्यांचे 'कलचुरी नृपती आणि त्यांचा काळ' 'वाकाटक नृपती आणि त्यांचा काळ', 'सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास आणि कोरीव लेख', 'शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख' व अनेक लेखसंग्रह, इ. प्राचीन इतिहासविषयक ग्रंथ प्रसिद्ध आहेत. शं. गो. चट्टे हे भोसल्यांच्या इतिहासाविषयी व दे. गो. लांडगे हे 'नागपूर' विषयी, विशेष प्रसिद्ध आहेत. डॉ. कोलते यांनीही सातवाहन, वाकाटक, चालुक्य वगैरे घराण्यांशी संबंधित असलेले अनेक ताम्रपट व शिलालेख संपादिले आहेत. श्री. अ. ज. राजुरकर यांनी इ. स. १९५६ मध्ये लिहिलेला 'चंद्रपूरचा इतिहास' हाही ग्रंथ इतिहासविषयक लिखाणात महत्त्वाची भर टाकणारा आहे.

याशिवाय द. वा. महाजन, गो. रा. दळवी, आ. रा. देशपांडे (कुंडिनपूरविषयक संशोधन) इ. जुने व मु. बा. देवपुजारी, प्रा. ह. चं. घोंगे, डॉ. अजयमित्र शास्त्री, प्रा. शरद कोलारकर, श्री. श्रीपाद केशव चितळे, डॉ. चंद्रशेखर श्रीकृष्ण गुप्त इ. नवीन नावे महत्त्वाची आहेत.

**आ) धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान, ज्योतिषशास्त्र इ.**

धर्मशास्त्रविषयक संशोधनात विद्वत्‌रत्न डॉ. के. ल. उपाख्य भाऊजी दप्तरी यांच्या कामगिरीला उभ्या महाराष्ट्रात तोड नाही. भाऊजी दप्तरींचे लिखाण वाचून बुद्धी अक्षरशः कुंठित होते. त्यांचे प्रायः सर्वच ग्रंथ त्यांच्या अपूर्व व सूक्ष्म बुद्धिमत्तेतून साकारलेले आहेत. त्यांचे 'करणकल्पलता', 'धर्मरहस्य', 'धर्मविवादस्वरूप', 'जैमित्यर्थदीपिका,' 'तात्त्विक

मीमांसापद्धती', 'औपनिषदक जीवनसौख्य', 'उपनिषदर्थव्याख्या', 'पंचांगचंद्रिका', 'भारतीय ज्योतिःशास्त्र निरीक्षण' वगैरे त्यांचे ग्रंथ म्हणजे, त्यांच्या अचाट बुद्धिमत्तेची मूर्त स्मारकेच होत. त्यांची बुद्धिमत्ता पाहून लोकमान्य टिळकही चकित झाले होते, एवढे सांगितले म्हणजे पुरे.

धर्मशास्त्रविषयक संशोधनात भाऊजींच्या खालोखाल महत्त्वाचे असलेले म्हणजे विद्याभूषण कृष्णशास्त्री घुले हेच होत. हे विदर्भातील एक प्रगाढ विद्वान होऊन गेले. यांनी पाणिनीसारख्या पंडिताच्या व्याकरणातील दोष दाखविण्याचे धाडस केले आहे. त्यांचे 'दाशराज्ञ युद्ध', 'महादेवाचे मूळ स्वरूप', 'भातृव्य व सपत्न', 'मित्र व अमित्र', 'दिती आणि आदिती', 'वेदातील सरस्वती नदी', 'वेदातील रोगजंतुशास्त्र', 'श्रीगजाननाचा काळ', 'पाणिनीच्या व्याकरणातील काही दोष' वगैरे निबंध अतिशय विद्वत्तापूर्ण आहेत.

दप्तरी व धुले या दोघांव्यतिरिक्त श्री. अप्रबुद्ध व श्री. वाळशास्त्री हरदास हे आणखी दोन गाढे विद्वान नागपूरला होऊन गेले. श्री. अप्रबुद्धांचे 'Massege of R'gveda' हे पुस्तक अतिशय विद्वत्तापूर्ण आहे. अप्रबुद्धांचेच शिष्य नागपूरचे श्री. ब. स. येरकुंटवार हे धर्मशास्त्राचे व तत्त्वज्ञानाचे गाढे व्यासंगी आहेत.

डॉ. शं. दां. पेंडसे यांचे 'ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान', डॉ. कोलते यांचे 'महानुभाव तत्त्वज्ञान'; वा. ना. देशपांडे यांचा 'महानुभावांचा वेद' हा लेख, डॉ. रा. बो. मेश्राम यांचा महानुभाव तत्त्वज्ञानावरील ग्रंथ इत्यादी तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात व डॉ. सुरेश डोळके यांचा 'डॉ. दप्तरी यांची धर्ममीमांसा' हा ग्रंथ, प्रा. श्री. ल. पांढरीपांडे यांचे अगदी अलीकडील 'ऋग्वेदा' वरचे पुस्तक धर्मशास्त्रविषयक संशोधनात महत्त्वाची भर टाकणारे आहेत. डॉ. नी. र. वऱ्हाडपांडे यांची 'नवभारत' मासिकातील 'आर्या'वरची लेखमाला विद्वत्तापूर्ण आहे.

**इ) प्राचीन कवी व त्यांची काव्ये**

जुन्या काळातील वा. दा. ओक व त्यांचे पुतणे दा. के. ओक यांनी अनेक जुने ग्रंथ प्रकाशात आणले आहेत. अ. सी. साठे व त्यांचे सहकारी यांनी देवनाथ-दयाळनाथ यांचे काव्यसंग्रह, या. मा. काळे यांनी 'शशिसेना', व श्रीधरबुवा परांजप्यांनी 'केकावली' प्रसिद्ध केली आहे.

प्रा. श्री. ना. बनहट्टी यांनी 'ज्ञानेश्वरां'च्या अनेक पोथ्या मिळवून तीन अध्यायांची एक उत्कृष्ट पाठशुद्ध प्रत महाराष्ट्रीय रसिकांसमोर ठेवली आहे. शिवाय 'ज्ञानेश्वरीचे अनेक अध्याय', 'मयुरकाव्यविवेचन', 'आज्ञापत्रांचे संपादन' वगैरे ग्रंथ त्यांच्या नावावर आहेत. डॉ. कोलते ह्यांनी 'रघुनाथपंडिताचा कालनिर्णय', 'राजनीती अमात्यांची कशी' वगैरे लेख लिहिले आहेत. डॉ. ग. त्र्यं. देशपांडे यांनी विठ्ठलकृत 'रुक्मिणीस्वयंवर', डॉ. मा. गो. देशमुख यांनी नागेश कवीचे रुक्मिणीस्वयंवर; प्रा. श्री. मा. कुळकर्णी यांनी 'ज्ञानेश्वरी'चे अनेक अध्याय, मोरोपंतांचा 'कृष्णविजय', विठ्ठलाचे रुक्मिणीस्वयंवर, भा. श्री. परांजपे यांनी मुक्तेश्वराचे काही पर्व; डॉ. वसंत वऱ्हाडपांडे यांनी सामराजाचे 'रुक्मिणीहरण', मुक्तेश्वराचे 'हरिश्चंद्राख्यान'; डॉ. अ. ना. देशपांडे यांनी 'ज्ञानेश्वरींचे काही अध्याय'; गुरुवर्य डॉ. वि. बा. प्रभुदेसाई यांनी कृष्णदास

शामाविरचित 'श्रीकृष्णचरित्र', चोंभा कवीचे 'उखाहरण' संपादित केले आहे.

प्राचीन कवींविषयीच्या संशोधनात डॉ. सुरेश डोळके यांचे नाव फार महत्त्वाचे आहे. मराठीचे आद्यकवी मुकुंदराज यांच्या स्थळाविषयी व 'विवेकसिंधू'च्या काळाविषयी त्यांनी एक विस्तृत लेखमाला लिहून मुकुंदराज हे विदर्भातील आंभोऱ्याचेच व 'वि. सिं.' चा कालनिर्णय शके ११११० हाच होय हे त्यांनी सिद्ध केले असून, त्यांचे हे संशोधन महाराष्ट्रात मान्यता पावले आहे. याशिवाय 'विदर्भातील गेल्या दीडशे वर्षांतील संतकवी व काव्य' ही लेखमाला त्यांनी इ.स.१९५० च्या सुमारास लिहिली. प्रा. श्री. मा. कुळकर्णी यांचे 'ज्ञानेश्वरीतील शिकवण' व डॉ. म. रा. जोशी यांचे 'नाथसंप्रदाया'वरचे पुस्तक महत्त्वाचे आहे.

**ई) महानुभाव संशोधन**

महानुभाव संशोधन हा विदर्भाचा एक विशेष असल्यामुळे, याचा स्वतंत्र पोटभेद कल्पिला आहे. हा पंथ विदर्भात प्रसारास पावला असून, या पंथाचे अधिकतर मूलगामी संशोधनही विदर्भातील साहित्यिकांनीच केले आहे. महानुभाव संशोधकांची एक लांबच-लांब रांग आपल्याला विदर्भात दिसते. डॉ. य. खु. देशपांडे, वा. ना. देशपांडे, ह. ना. नेने, डॉ. वि. भि. कोलते व डॉ. सुरेश डोळके हे पाच बिनीचे महानुभाव संशोधक होत.

डॉ. य. खु. देशपांडे यांचा 'महानुभावीय मराठी वाङ्मय' हा ग्रंथ फारच महत्त्वाचा आहे याशिवाय त्यांनी 'श्रीचक्रपाणीचरित्र', 'ऋद्धिपूरवर्णन'हे ग्रंथ व 'यक्षदेववृद्धान्वय', 'महानुभावांचे चरित्रग्रंथ' इ. निबंध प्रसिद्ध केले आहेत. वा. ना. देशपांडे यांनी महदंबेचे 'धवळे' व 'स्मृतिस्थळ' हे दोन मोलाचे ग्रंथ संपादिले आहेत. ह. ना. नेने यांनी 'लीळाचरित्र', 'सूत्रपाठ', 'दृष्टान्तपाठ' हे फारच महत्त्वाचे ग्रंथ संपादिले असून, याशिवाय महानुभावीय वाङ्मय व काव्ये यासंबंधी अनेक महत्त्वाचे व उपयुक्त लेख लिहिले आहेत. डॉ. कोलते यांचे महानुभाव संशोधनकार्य सर्वश्रुतच आहे. यांनी 'सातीग्रंथा'तील 'ऋद्धिपूरवर्णन' हे काव्य वगळून इतर सहा काव्ये, 'मूर्तिप्रकाश' हे काव्य, 'स्थानपोथी', 'श्रीगोविंदप्रभुचरित्र', 'पंचोपाख्यान' इ. गद्यग्रंथ व 'लक्षणबंद', 'आचारबंद' व 'विचारबंद' हे 'बंद' ग्रंथ संपादिले आहेत. याशिवाय 'महानुभाव तत्त्वज्ञान', 'महानुभावांचा आचारधर्म', श्रीचक्रधरचरित्र', 'भास्करभट्ट बोरीकर' इ. पुस्तकेही त्यांनी लिहिली आहेत. डॉ. डोळके यांनी नरींद्राचे 'संपूर्ण' रुक्मिणीस्वयंवर व श्रीचक्रधरनिरूपित (?) 'संपूर्ण' श्रीकृष्णचरित्र हे महानुभाव वाङ्मयात आढळणारे अतिशय अपवादात्मक व 'संपूर्ण' ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. शिवाय महानुभाव वाङ्मयावर त्यांनी अनेक संशोधनपर व वैचारिक लेख लिहिले आहेत. नुकताच चक्रधराच्या 'वधा' संबंधीचा त्यांच्यात व डॉ. कोलते यांच्यात 'युगवाणी'तून झालेला वाद प्रसिद्धच आहे. या पाच संशोधकांशिवाय कृष्णशास्त्री घुले, नी. व. भवाळकर, बाळकृष्णशास्त्री महानुभाव इ. सुरुवातीच्या काळातील काही महत्त्वाचे संशोधक होत. नागपुरातील डॉ. रा. बो. मेश्राम हे महानुभाव तत्त्वज्ञानाचे एक गाढे अभ्यासक आहेत.

३) भाषा व व्याकरण

या. मा. काळे यांचा 'वऱ्हाडातील मराठी भाषेचे स्वरूप' ('ग्रंथमाला १९०४), वा. ना. देशपांडे यांचा 'वऱ्हाडी लोकभाषा' (वि.ज्ञा.वि.मार्च १९२७),ह.ना.नेने यांचा 'ज्ञानेश्वरकालीन मराठी व ज्ञानेश्वरीचे व्याकरण !' (ज्ञानेश्वरदर्शन १९३४, भाग १), डॉ. सुरेश डोळके यांचे 'वऱ्हाडी बोली' (देविदास सोटे यांच्या शब्दकोशाला लिहिलेला उपोद्घात),'नागपुरी बोली' (पेंडसे गौरव ग्रंथ),हळवी बोली (पांढरीपांडे गौरव ग्रंथ) इत्यादी लेख व डॉ.वसंत वऱ्हाडपांडे यांचा 'नागपुरी बोली' व डॉ.प्रभुदेसाई यांचा 'सतराव्या शतकातील गोमंतकी बोली' इत्यादी प्रबंध विदर्भातील भाषाशास्त्र व व्याकरण यांच्याविषयीच्या लिखाणात अतिशय महत्त्वाची व मूलगामी भर टाकणारे आहेत.

समीक्षा व साहित्यशास्त्र : अ) समालोचनात्मक वाङ्मय

समालोचनात्मक वाङ्मयाच्या इतिहासात डॉ. य. खु. देशपांडे यांचे नाव प्रथम घ्यावे लागते. इ. स. १९२५ मध्ये लिहिलेला 'महानुभावीय मराठी वाङ्मय' हा महानुभाव वाङ्मयेतिहासपर ग्रंथ फारच महत्त्वाचा व विद्वन्मान्य आहे. य. खु. नंतर वाङ्मयाच्या व सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाचे असलेले डॉ. शं. दा. पेंडसे यांनी लिहिलेले 'महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास' हे पुस्तक होय. यात ऋग्वेदकालापासून तो समर्थ रामदासांपर्यंतच्या कालखंडाचा सांस्कृतिक व वाङ्मयीन परामर्श घेण्यात आला आहे. नारायण नागोराव हूड यांनी इ.स.१९५३ मध्ये 'विदर्भ संशोधनाचा इतिहास' हे पुस्तक प्रसिद्ध केले.ह्या पुस्तकात त्या वेळेपर्यंत विदर्भात झालेल्या संशोधनाचा इतिहास उत्तम रीतीने आला आहे.प्रा. भ.श्री. पंडित यांचा 'आधुनिक मराठी कविता' हा आधुनिक कवितेवरचा, प्रा. श्री. ना. बनहट्टी यांचा 'रंगभूमीचा इतिहास' हा नाटकावरचा व प्रा. कुसुमावतीबाई देशपांडेंचा 'मराठी कादंबरी' हा कादंबरीवर लिहिलेला ग्रंथ,इत्यादी ग्रंथ समालोचनात्मक वाङ्मयामध्ये मोलाची भर टाकणारे आहेत.

पण, या सर्वांपेक्षा कठीण व प्रचंड कार्य डॉ. अ. ना. देशपांडे यांनी केले आहे. त्यांनी संपूर्ण मराठी वाङ्मयाचा इतिहास– मराठीच्या जन्मकाळापासून तो इ.स.१९५० पर्यंत– ९ खंडांत लिहिला आहे. डॉ. देशपांडे यांनी हा इतिहास लिहून मराठी वाङ्मयाची फार मोठी सेवा केली आहे.

आ) समीक्षणात्मक

वैदर्भीय संशोधकांप्रमाणेच विदर्भात अनेक बीनीचे समीक्षक आहेत.श्री.कृ.कोल्हटकर, ग.त्र्यं.माडखोलकर,वा.ना.देशपांडे,भ.श्री.पंडित हे जुन्या पिढीतील अग्रगण्य समीक्षक होत. यांची समीक्षा अतिशय मार्मिक व उच्च दर्जाची आहे.प्रा.कुसुमावती देशपांडे (पासंग),पु.य. देशपांडे (नवी मूल्ये), शरच्चंद्र मुक्तिबोध (सृष्टी, सौंदर्य आणि साहित्यमूल्य), प्रा. श्री. मा. कुळकर्णी (कादंबरीची रचना व कादंबरीसमीक्षा), प्रा. भा. श्री. परांजपे (मराठी समीक्षेचे आदिपर्व),प्रा. म. गं. उपाख्य मनूताई नातू (विवेकाची गोठी),डॉ. मा. गो. देशमुख (भावगंध),

डॉ. व. कृ. वऱ्हाडपांडे (भाव्यांवरचे पुस्तक) वगैरे काही प्रमुख समीक्षक होत.

यानंतरच्या पिढीतील ठळकपणे नाव घ्यायचे झाले तर डॉ. द. भि. कुळकर्णी यांचेच घ्यावे लागते. ह्यांचे काव्य, नाट्य, कथा इ. वाङ्मयप्रकारांची समीक्षा करणारे अनेक ग्रंथ प्रसिद्ध आहेत. महाराष्ट्रात विद्यमान असलेल्या समीक्षकांमध्ये यांचे स्थान अतिशय उच्च दर्जाचे आहे. डॉ. उषा मा. देशमुख, डॉ. वि. स. जोग (मार्क्सवादी साहित्य), या. वा. वडस्कर (जनसाहित्य), डॉ. सौ. आशा सावदेकर (काव्य, कादंबरी), डॉ. अक्षयकुमार काळे (आधुनिक कविता) वगैरेंची नावेही महत्त्वाची आहेत.

याशिवाय प्रा. म. शं. वाबगावकर, प्रा. जयंत परांजपे, नीला जोशीराव, श्री. चंद्रकांत कुळकर्णी, सदा कऱ्हाडे, भी. रा. जहागीरदार, विमल पवनीकर, विमल भालेराव, श्या. वा. स्वान, मदन धनकर, शंकर कऱ्हाडे, सदाशिव कुल्ली, प्रमोद मुनघाटे इत्यादी नावेही लक्षणीय आहेत.

**साहित्यशास्त्रीय**

कै. श्री. कृ. कोल्हटकर यांनी 'मराठी वाङ्मयातील विशेष व त्यांचे उगम' (वि. ज्ञा. वि. १९०९) या लेखात व 'विदर्भवीणे'च्या प्रस्तावनेत केलेल्या रसचर्चा, अतिशय मौलिक आहेत. अनिलांनी 'प्रक्षोभ' रसाबद्दल साहित्यशास्त्रीय विवेचन केलेले प्रसिद्धच आहे. साहित्यशास्त्रीय ग्रंथांमध्ये डॉ. ग. त्र्यं देशपांडे यांचा 'भारतीय साहित्यशास्त्र' हा ग्रंथ संपूर्ण भारतभर प्रसिद्ध आहे. मा. गो. देशमुख यांचे 'मराठीचे साहित्यशास्त्र', उषा मा. देशमुख यांचा, 'मराठीचे साहित्यशास्त्र– रामदास ते रामजोशी', भा. श्री. परांजपे यांचा 'रामदासांचे साहित्यशास्त्र', डॉ. ग. त्र्यं देशपांडे यांचा 'अलंकार-प्रदीप', प्रा. पां. कृ. सावळापूरकर यांचा 'काव्यप्रकाश' व डॉ. द. भि. कुळकर्णी यांचा 'मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र' इ. ग्रंथ साहित्यशास्त्रीय ग्रंथामध्ये महत्त्वाची भर घालणारे आहेत.

**दलित साहित्यिक**

दलित रंगभूमीचे पहिले शिल्पकार किसन फागूजी बनसोडे हे विदर्भातीलच होत. त्यांनी १९०७ साली चोखामेळा मुलींची शाळा काढली. शिवाय त्यांचे 'श्री संतचोखामेळाचरित्र 'प्रदीप' हा काव्यसंग्रह वगैरे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. ना. वा. शेंडे हे एक श्रेष्ठ दलित साहित्यिक आहेत. डॉ. गंगाधर पानतावणे हे आता मराठवाड्यात असले तरी ते मूळचे विदर्भाचेच आहेत नागपूरचे डॉ. यशवंत मनोहर वामन निंबाळकर, ताराचंद्र खांडेकर इत्यादींची नावे दलित साहित्यिकांत विख्यात आहेत. डॉ. मनोहर हे उच्च दर्जाचे कवी आहेत. वामन निंबाळकरांच्या 'गावकुसाबाहेरील कविते' नंतरचा 'महायुद्ध' हा दुसरा कवितासंग्रह नुकताच प्रकाशित झाला आहे. ताराचंद्र खांडेकर हे आंबेडकर तत्त्वज्ञानाचे व विचारांचे एक प्रगाढ विद्वान आहेत. नागपूरचेच डॉ. योगेंद्र मेश्राम यांचा 'दलित साहित्य जेव्हा चळवळ बनते' हा ग्रंथ दीडदोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाला आहे. डॉ. प्रकाश खरात, डॉ. ज्योती लांजेवार व सुगंधा शेंडे हेही महत्त्वाचे दलित साहित्यिक होत.

याशिवाय बवन चहांदे, मीना गजभिये, शशी मुनेश्वर, प्रसेनजीत टाकसांडे, भाऊ पंचभाई, धर्मराज निमसरकर, नारायण थोरात, अशोक थोरात, अमर रामटेके, नामदेव च. कांबळे, राहुल वानखेडे, प्रतिभा गेडाम, जयदेव मेश्राम, अनिल कांबळे, गोविंद वाघमारे, आनंद गायकवाड, के. व्ही. नगराळे, संदेश ढोले वगैरे साहित्यिक उल्लेखनीय वाटतात.

**इतर**

सुविख्यात 'ज्ञानकोशा'ची कल्पना विदर्भातच जन्माला येऊन डॉ. केतकर यांच्या संपादकत्वाखाली त्याचा 'महाराष्ट्रीय वाङ्मयसूची' हा प्रथमखंड नागपुरातच निर्माण झाला. श्री. शिवाजीराव भावे यांचा 'ज्ञानेश्वरी शब्दार्थकोश' व देविदास सोटे यांचा 'वैदर्भी बोलीचा शब्दकोश' हे ग्रंथ कोशवाङ्मयामध्ये महत्त्वाचे आहेत. चरित्रामध्ये 'केशव शिवराम भवाळकर यांचे आत्मवृत्त' (संपा. प्रा. भ. श्री. पंडित), अप्रबुद्धांनी लिहिलेले अण्णासाहेब पटवर्धन यांचे चरित्र, ज. रा. जोशी यांनी लिहिलेली केदार खरे व पुराणिक यांची चरित्रे, पु. बा. काळे यांनी लिहिलेले अनसूयाबाई काळे यांचे चरित्र (संपा. सुरेश डोळके), भाऊ मांडवकरांनी लिहिलेले तुकडोजी महाराज यांचे चरित्र, डॉ. वाळ परवाड यांनी लिहिलेले शिवाजीराव पटवर्धन यांचे चरित्र व खामगावचे प्रा. प्र. ग. सहस्रबुद्धे ह्यांनी लिहिलेली अनेक छोटी-मोठी चरित्रे यांचा उल्लेख करता येईल. निबंधवाङ्मयात आचार्य विनोबा भावे, आचार्य दादा धर्माधिकारी, मा. श्री. ऊर्फ बापूजी अणे व श्री. बाबा आमटे हे चार दिग्गज आहेत. संत गुलाबराव महाराज व संत तुकडोजी महाराज हे विदर्भातील आधुनिक संतकवी होत. विनोदी परंपरेत श्रीपाद कृष्णानंतर बेहेरे, श्री. रा. वोवडे, राम डोके वगैरे फार कमी नावे आहेत.

**समारोप**

येथपर्यंतच्या जंत्रीवजा विवेचनावरून विदर्भातील साहित्यसेवेचे जे विहंगावलोकन झाले असेल, त्यातून एक गोष्ट स्पष्ट होते, ती ही की, विदर्भ हा मराठीच्या जन्मकाळापासून मराठी साहित्यनिर्मितीत अग्रेसर आहे. वैदर्भीय साहित्यगंगेचे हे अथांग स्वरूप पाहून मन अभिमानाने भरून आल्याशिवाय राहत नाही.

शेवटी एका गोष्टीचा उल्लेख केल्यावाचून हा लेख पूर्ण होऊ शकत नाही. अशा प्रकारच्या लेखात आपल्याला जेवढे काही साहित्यिक आठवतात त्या सर्वांनाच आपल्या लेखात स्थान देण्याचा प्रयत्न लेखकाचा असतो. तथापि काही ठळक साहित्यिकही नजरेतून सुटून जाण्याची शक्यता बऱ्याच अंशी असते. त्यामुळे प्रस्तुत लेखात जर कोण्या प्रमुख साहित्यिकाचा उल्लेख करावयाचा राहून गेला असेल तर, तो 'पुरुपाचा धर्मभ्रम' समजून कुणीही या उणिवेबद्दल राग मानू नये अशी नम्र विनंती करावीशी वाटते.

**राजेंद्र डोळके,**
बँक ऑफ महाराष्ट्र, लाहोर शाखा, एमइएल, चंद्रपूर ४४२४०१

*











# वैदर्भीय समीक्षेची वाटचाल (१९६०-८५)

## सूत्रबद्ध पण व्यक्तिविशिष्ट लेखन

डॉ. आशा सावदेकर

समीक्षा आणि संशोधन यात नाते असते, तें निर्माण होणे आवश्यक असते, पण संशोधन म्हणजे समीक्षा नव्हे. वाङ्मयेतिहास हा एका परीने समीक्षामूल्य असलेलाच साहित्यव्यापार होय. पण त्याला समीक्षा म्हणता येणार नाही. समीक्षेत आस्वाद असतो आणि तो आस्वाद सर्जनशील असतो. आस्वादाची ही सर्जनशील अवस्थाच समीक्षेचे रूप ठरवीत असते. समीक्षकापाशी असलेली वैशिष्ट्यपूर्ण अशी दृष्टी त्याला नवनिर्मिती करण्यास उद्युक्त करीत असते. ज्या कलातंत्रीत कलावंताने कलानिर्मिती केलेली असते त्या कलातंत्रीशी एकरूप होण्याचा प्रयत्न समीक्षक करीत असतो. त्याच्याजवळ स्थिर वाङ्मयनिकष असतात आणि त्याहीपेक्षा मोलाची अशी वाङ्मयनिष्ठा असते. स्थिर निकष म्हणजे शास्त्र नव्हे, कारण ज्या कलेबद्दल बोलायचे ती कला किंवा ज्यावर तिचा संस्कार व्हायचा ते आस्वादकाचे मन या गोष्टी विज्ञानाप्रमाणे स्थिर नाहीत. तेव्हा टीकेचा वापर हा मुळात तरल आणि अलौकिक अशा क्षेत्रातच होत असतो. श्री. के. क्षीरसागरांनी याच कारणामुळे टीकेला 'कला' म्हटले आहे. अशी समीक्षा गृहीत धरूनच या लेखाची व्याप्ती निश्चित केली आहे.

संशोधनाच्या क्षेत्रात विदर्भात फार मोठी परंपरा दृष्टीला पडते. य. खु. देशपांडे, वा. ना. देशपांडे, डॉ. वि. भि. कोलते, शं. दा. पेंडसे, डॉ. अ. ना. देशपांडे, डॉ. वि. बा. प्रभुदेसाई, प्रा. म. शं. वाबगावकर, डॉ. सुरेश डोळके, डॉ. म. रा. जोशी यांची नावे त्यात अग्रक्रमाने आढळतात. डॉ. वि. भि. कोलते, य. खु. देशपांडे यांचे महानुभाव साहित्यविषयक संशोधन, डॉ. सुरेश डोळके, डॉ. म. रा. जोशी यांचे प्राचीन साहित्यविषयक संशोधन, डॉ. शं. दा. पेंडसे यांचे संतवाङ्मय विषयक संशोधन, डॉ. अ. ना. देशपांडे यांनी पार पाडलेले वाङ्मयेतिहासाचे एकटाकी प्रचंड कार्य, अग्निहोत्रींचे कोश-वाङ्मयक्षेत्रातील कार्य, डॉ. वि. बा. प्रभुदेसाई, डॉ. वसंत वऱ्हाडपांडे यांचे भाषा व बोली यांचेविषयीचे संशोधन याला तोड नाही. परंतु समीक्षा ही वाङ्मयकृती व प्रकृतीचा विविधांगी शोध, सौंदर्यशोध म्हणून घेत असते. कलाकृतीचे आकलन व मूल्यमापन करीत असताना अनेक प्रश्नांना सामोरे जात समीक्षा पुन्हा पुन्हा कलाकृतीत त्या प्रश्नांची उत्तरे शोधीत असते आणि परिपूर्ण होत असते. एका दृष्टीने कलाकृतीच्या मूळ बीजाकडेच जाण्याचा हा प्रयत्न असतो.

समीक्षेत संशोधनमूल्य असू शकते आणि संशोधनात समीक्षामूल्य असू शकते. संशोधन ही शिस्त आहे, ती विचाराची शुद्धी आहे, तर समीक्षा ही सौंदर्यमूल्याची एक मूल्यमापक न्याहाळणी आहे. संशोधन प्रश्नापर्यंत जाते, समीक्षा त्या प्रश्नांची तारतम्याने सोडवणूक करते.

संशोधनाने समीक्षेतील मूल्यमापनाला निर्णायकता येते हे खरे ! पण समीक्षा ही कलातंद्रीशी संलग्न असते.

१९६० नंतर एकंदरच समीक्षेचा चेहरामोहरा बदललेला आहे. सौंदर्यविचार, शैलीविचार अशा अनेक नव्या दिशा दृष्टिपथात येऊ लागल्या आहेत. समीक्षा ही कधी प्राथमिक परिचयवजा, जुजबी अशी वृत्तपत्रीय परीक्षणवजा दिसते आहे; तर एकीकडे सैद्धान्तिक परिभाषेमुळे ती सर्वसामान्य वाचकांपासून दूर जाते आहे. १९६० हे वर्ष वैदर्भीय समीक्षेतही महत्त्वाचे ठरते. १९६१ पर्यंत पूर्ण तेजाने तळपणारी कुसुमावती देशपांडे यांची समीक्षा त्यांच्या मृत्यूने कायमची मूक झाली आणि त्यांच्या समीक्षेच्या प्रभावाचा विचार सुरू झाला. १९६१ साली ग्वाल्हेर साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून त्यांचे विचार साहित्यप्रेमींनी ऐकले ते अखेरचे ! कुसुमावतींची समीक्षा हा वैदर्भीय समकालीन समीक्षेचा आरंभ होता. त्यांचे समीक्षालेखन मोजके असले तरी सकस आणि विचारमंथनात्मक होते. खऱ्या कलात्मकतेची वाट शोधताना त्यांनी ललित लेखक म्हणून कृत्रिम तंत्रनिष्ठा दूर ठेवली, त्याचप्रमाणे 'सघन आशयाची थोरवी' मानून त्यांनी नवीन प्रवाहांचेही मूल्यमापन केले. निर्मिती आणि आस्वाद यातील व्यक्तिविशिष्टतेबरोबर समष्टिप्रधानताही त्यांनी आपल्या समीक्षेतून मांडली. कलावाद आणि जीवनवाद यांची टोकाला जाण्याची वृत्ती टाळून त्यांनी समीक्षेचे संयमी रूपच निर्मिले. 'वाङ्मयाचा आस्वाद' या त्यांच्या समीक्षालेखात त्या म्हणतात– "(कलावंत) जे आधीच जाणवले आहे, आकळले आहे, ते रम्य शब्दात सजवीत नसतो. तो त्या क्षणीही काही अनुभवीत असतो. त्याची भावना जसजशी व्यक्त होते तसतशी केंद्रीभूत होते. त्याला स्वतःलाच स्पष्ट होत जाते. हा त्याचा सर्व प्रयत्न मुख्यतः त्याचा स्वतःसाठीच असतो; स्वतःच्या जाणिवेंसाठीच असतो; परंतु तो त्याच्यापुरता मात्र नसतो. तसा तो राहात नाही. उलट तो जेव्हा खरोखरी त्याच्यासाठी असतो तेव्हाच तो सर्वांच्यासाठी होतो. त्याच्या मनावरील क्षणिक संस्काराचे पापुद्रे दूर सारले जाऊन जेव्हा त्याच्यामधल्या मनुष्यत्वाच्या गाभ्याला आवाहन पोचते, तेव्हाच त्याचे काव्य रसिकांनाही पटते; रसिकांच्या मनाला जाऊन भिडते, त्यांच्यातील मानवतेला आवाहन करते." (पासंग : आ. ३ री जुलै १९७१, मौज प्रकाशन, मुंबई, पृ. १०४)

कुसुमावतींनी सौंदर्याला जीवनमूल्यच मानले. आणि सौंदर्यापासून जीवनमूल्याची फारकत केली तर वैचारिक आपत्ती उद्भवतात हे स्पष्ट केले.

"साहित्यकृतीच्या गुणवत्तेचे विश्लेपण आणि मापन करताना सौंदर्य हे मूल्य आवश्यक असले तरी एकमेव आणि अंतिम मानून चालणार नाही. साहित्याची कलात्मकता कशामध्ये आहे, हे ठरल्यानंतर त्यांची गुणवत्ता, महानता कशामध्ये आहे याचाही विचार समीक्षेच्या कार्यात आवश्यक ठरतो. येथेच जीवनमूल्यांचा संबंध येतो. ("वाङ्मयीन समीक्षेचे निकष" : पासंग, तत्रैव पृ. ९६)

कुसुमावतींची समीक्षा ही अशी साहित्यनिष्ठा आणि मानदंडांचा समंजस स्वीकार यातून

जन्माला आलेली आहे. सामाजिक आस्था जपूनही ती कलाबाह्य निकषांकडे झुकत नाही. कुसुमावतींच्या नंतर अशी समीक्षा विदर्भातही फारशी उमलली नाही.

कुसुमावतींच्या कालखंडात जुन्या साहित्याचे पुनर्मूल्यमापन आणि नव्याचे स्वागत ही दृष्टी दृढ झाली. त्या संदर्भात भ. श्री. पंडित यांची समीक्षा लक्षणीय ठरते. १९७० नंतर 'संनिचय' भाग १ व २ (१९७५) आणि 'आधुनिक कवितेचे प्रणेते' भाग १ व २ (१९७१) या ग्रंथांमधून आणि 'तांबे आणि त्यांचे गीतिकाव्य' (१९७२) या पुस्तकातून त्यांची समीक्षा नोंदली गेलेली आहे. आधुनिक मराठी कवितेचे एक समग्र आकलन त्यातून मांडण्याचा प्रयत्न त्यांनी केलेला आहे. रामणीयक वादातील (रोमँटिसिझम) सौंदर्यलालसेवर भर देऊन त्यांनी त्या वादाचा मराठी कवितेतील साम्यभेदाच्या दृष्टीने अभ्यास मांडलेला आहे. भ. श्री. पंडित यांची समीक्षा एकीकडे वाङ्मयेतिहास तर दुसरीकडे संशोधन यांच्याशी नाते सांगते. दुर्मिळ माहिती, चिकित्सा व चिंतन हे त्यांचे गुण त्यातून प्रकट होतात. तत्त्वमीमांसा करण्याकडे त्यांचा फारसा कल नाही. त्यांची समीक्षा त्यांच्या व्यासंगाचा प्रत्यय देणारी आहे. तिचे रूप थोडे अघळपघळ आणि विवेचनाच्या ओघात माहिती देत जाणाऱ्या गोष्टीवेल्हाळ माणसासारखे आहे. त्यात विचाराच्या चमकदारपणापेक्षा भावनेचा ओलावा जास्त आहे.

प्रा. शरच्चंद्र मुक्तिबोध यांची समीक्षा 'काही निबंध' (१९६३), 'जीवन आणि साहित्य' (१९७२) आणि 'सृष्टी, सौंदर्य आणि साहित्यमूल्य' (१९७८) या ग्रंथांमधून प्रकटलेली आहे. मुक्तिबोधांच्या समीक्षेचे नाते कुसुमावतींशी एका विशिष्ट प्रमाणात जोडता येईल. विशाल दृष्टी आणि मानवी जीवनाविषयी खोल समज यांचे एकीकरण त्या दोघांच्याही समीक्षादृष्टीत आहे. अभिजात कला मानवी मनाच्या सर्व प्रवृत्तींना साकल्याने आवाहन करते आणि या जागविण्याच्या सामर्थ्यावरून तिचे मूल्य ठरविले जाते असे कुसुमावती म्हणतात; तर 'महान कलेने रसिकाच्या जाणिवेची क्षितिजे विस्तारतात' हे मुक्तिबोधांचे कलेच्या अंतिम मूल्याविषयीचे मत आहे. (काही निबंध, नागपूर प्रकाशन, नागपूर, १९६३ पृ. ७९) अर्थात मुक्तिबोधांच्या विचारामागे वर्गयुक्त समाजाची जाणीव उभी आहे. त्यामुळे माणसाच्या वाढण्यात वर्गीय, सामाजिक मूल्यव्यवस्थांचा आधार ते गृहीत धरतात. म्हणूनच व्यक्तीचा दृष्टिकोण वर्णन करीत असताना ते म्हणतात, "कलावंताच्या अनुभवसृष्टीत त्याच्या व्यक्तित्वाचे अनन्यसाधारण गुणधर्म जसे असतातच, तसे दुसऱ्या बाजूला या अनुभवसृष्टीतील भावनांची वा भावसंदर्भाची व्यवस्थिती त्याच्या वृत्तिव्यवस्थेद्वारे-जाणिवेद्वारे झालेली असते." (जीवन आणि साहित्य, अभिनव प्रकाशन, मुंबई, प्रथमावृत्ती १९७२, पृ. ९६) लेखकाची अनुभूती जितकी जिवंत असेल, जागृत असेल तेवढाच सखोल अर्थ त्याला गवसू शकेल या धारणेमुळेच, 'सृष्टी, सौंदर्य आणि साहित्यमूल्य' या ग्रंथात ते 'मानुपता' हे सामाजिक मानवाचे आंतरिक असणे (essence) आहे. बदलत्या सामाजिक मूल्यांचे तेच अधिष्ठान आहे" असे ठाम प्रतिपादन करतात. (सृष्टी, सौंदर्य आणि साहित्यमूल्य, लोकवाङ्मय गृह मुंबई, प्रकाशनवर्ष नाही, पृ. १४८) म्हणूनच मुक्तिबोधांच्या समीक्षेत निर्मिती व आस्वाद दोन्ही प्रक्रियेत

समाजसापेक्ष मूल्यांचे अस्तित्व ठळकपणे नोंदविलेले आहे. परंतु त्यांनी कलेचे स्वातंत्र्य व आशय अभिव्यक्तीचे अद्वैत मान्य केले आहे. त्यांनी सौंदर्य नाकारले नाही तरी 'मूल्यार्थगर्भ वृत्तिव्यंजक' प्रतिभेला ते महत्त्व देतात. मुक्तिबोधांच्या समीक्षेने कलाकृती व तिच्याबद्दल इतरांचा दृष्टिकोण यासंबंधी एक सखोल व शास्त्रीय चर्चा निर्माण झाली.

१९७० नंतर जुन्या साहित्याच्या पुनर्मूल्यमापनाचा कालखंड पुन्हा अवतरला. त्या काळात प्राचीन काव्याचा सूक्ष्म अभ्यास विशिष्ट दृष्टीने मांडणारे, भानुदास श्रीधर परांजपे हे महत्त्वाचे समीक्षक होत. 'रामदासांचे साहित्यशास्त्र' (१९७३) आणि 'रसज्ञांच्या खुणा' (१९७९) या ग्रंथांमधून त्यांनी प्राचीन व अर्वाचीन वाङ्मयाची समीक्षा केलेली आहे. समीक्षा आणि संशोधन यांच्या समन्वयावर त्यांनी दिलेला भरही महत्त्वपूर्ण आहे. 'मराठी समीक्षेचे आदिपर्व' (१९७१) मध्ये त्यांनी समीक्षा मूलभूत तत्त्वांचे अपूर्णत्व कसे सिद्ध करते तेच दाखवले आहे.

'भावगंध' (१९५६), 'मराठीचे साहित्यशास्त्र' (१९४०) अशी समीक्षा व संशोधनप्रबंध, डॉ. मा. गो. देशमुख यांनी १९६० पूर्वीच निर्माण केले होते. पण त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या पत्नी डॉ. उषा देशमुख यांनी 'वाङ्मयीन व्यक्ती' (१९६७) व 'साहित्यतोलन' (१९७४) अशी त्यांची समीक्षा ग्रंथरूपाने प्रकाशित केली. केशवसुत, बी, दत्त. यांची कविता, बोली व भाषा यांचा अभ्यास आणि संत नामदेव, रामदास, मुक्ताबाई यांच्या काव्याची चिकित्सा अशी समीक्षा 'साहित्यतोलन' मध्ये तर कथाकार वा. म. जोशी, शांताराम, प्रा. बनहट्टी व कुसुमावतींची टीका हे विषय 'वाङ्मयीन व्यक्ती'त हाताळलेले दिसतात.

डॉ. वि. भि. कोलते यांनीही 'साहित्य संचार' (१९६४) सारख्या समीक्षालेखसंग्रहातून समीक्षा केलेली आहे. पण त्याबरोबरच त्यांनी समकालीन लेखकांच्या अनेक प्रकारच्या पुस्तकांना ज्या प्रस्तावना लिहिल्या आहेत त्याही आजच्या मौलिक समीक्षेचे कार्य करीत आहेत. मग ती पांडुरंग श्रावण गोरे यांची कविता असो, डॉ. द. भि. कुळकर्णी यांचे 'चार शोधनिबंध' (१९७७) यांसारखे समीक्षात्मक पुस्तक असो, वा महानुभावपंथ व वाङ्मयावरील शं. गो. तुळपुळे यांचा ग्रंथ असो, डॉ. कोलते त्यातून नवीन दिशा, नवे विचार यांचे स्वागत करतात. तर कधी कधी स्वागतार्ह सूचनेतून आपली व्यासंगपूर्ण रसिकताही स्पष्ट करतात. डॉ. कोलते यांनी आजवर कितीतरी नव्या-जुन्या लेखकांना हात धरून साहित्यक्षेत्रात आणले आहे. 'साहित्यसंचार' मधून खाडिलकर आणि भवभूती यांच्यातील साम्य शोधून त्यांनी समीक्षेची मार्मिकता प्रकट केली आहे, तर 'देवल आणि शारदा' यासारख्या लेखातून कलाकृतीचे अंतर्गत सौंदर्य उलगडून दाखविले आहे. सुप्त सौंदर्याची उकल, सडेतोड विवेचन आणि साधार टीका ही कोलते यांच्या समीक्षेची वैशिष्ट्ये आहेत. 'उषःकाल आणि वज्राघात' सारख्या लेखातून तर त्यांच्या तौलनिक रसिक पण विवेकी टीकादृष्टीचा सूक्ष्म व आल्हाददायक प्रत्यय येतो.

१९६० नंतरच्या समीक्षेत महत्त्वाची भर घालणाऱ्या, प्राचीन व अर्वाचीन साहित्यक्षेत्रासारख्यांच सहजसंचारी टीकालेखणीने लेखन करणाऱ्या स्त्रीसमीक्षक म्हणून डॉ.

उषा देशमुख यांचे नाव समोर येते. 'मराठीचे साहित्यशास्त्र : रामदास ते रामजोशी' (१९७६) या त्यांच्या प्रबंधग्रंथापासून त्यांच्या वाटचालीला प्रारंभ झाला असला तरी अलीकडच्या काळात त्यांनी आपल्या समीक्षेतून समकालीन साहित्यालाही न्याय दिलेला दिसतो. 'साहित्यरंग' (१९७४), 'दीपमाळ' (१९८२), 'मराठी साहित्याचे आदिबंध' (१९८२), 'काव्यदिंडी' (१९८७) या संपूर्ण वाटचालीतून त्यांनी आपल्या व्यापक आणि सार्वकालिक समीक्षादृष्टीचा प्रत्यय दिलेला आहे. त्यांची समीक्षा ही भावुक नाही, तो एक डोळस व मूलग्राही आस्वाद असतो. शिरवाडकरांची नाटके, लोककथा ७८, वि. स. खांडेकरांची कादंबरी, बोरकर, गोविंदाग्रज, कुसुमाग्रज यांची कविता या आधुनिक विषयांबरोबरच मुक्तेश्वर, मोरोपंत, श्रीधर असा प्राचीन व मध्ययुगीन काव्यपटही त्यांनी अभ्यासलेला दिसतो. मूलतः वाङ्मयीन भूमिकेतून आणि आदिस्वरूप संशोधनाच्या दृष्टीतून त्यांनी तेराव्या-चौदाव्या शतकाचा वेध घेतलेला दिसतो. वाङ्मयीन रूपबंधांचे मूल्यमापन त्यांनी 'मराठी साहित्याचे आदिबंध' मध्ये केले तर आधुनिक काळात 'गर्जा जयजयकार : एक जागरण' मध्ये संपादक या नात्याने एकाच कवितेचा विविधांगी प्रवासही न्याहाळला. त्यांच्या समीक्षादृष्टीचे हे व्यापकपण व वेगळेपण वैशिष्ट्यपूर्ण आहे.

खऱ्या अर्थाने वाङ्मयीन परिशीलन, कलाकृतीचे स्वरूप, प्रयोजन व आस्वाद याबद्दलचा तात्त्विक तरीही रसिक आस्वादक विचार मांडणारे, समकाळाचा छेद घेऊन त्यासंबंधी आपली मते मांडण्यात अग्रेसर असणारे १९६० नंतरचे आस्वादक समीक्षक म्हणून डॉ. द. भि. कुलकर्णी यांचा उल्लेख करावा लागतो. 'महाकाव्या'सारख्या विषयावरील प्रबंध (१९७५), ज्ञानेश्वरांचे श्रोतृसंवाद (१९७५), चार शोधनिबंध (१९७७) यांसारखे संशोधनप्रधान ग्रंथ, पहिली परंपरा (१९७४), दुसरी परंपरा (१९७६), तिसऱ्यांदा रणांगण (१९७६), पार्थिवतेचे उदयास्त (१९७७), मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र . पुनःस्थापना (१९८२), नाट्यवेध (१९७८) अशी मार्मिक रसाळ समीक्षा हा त्यांच्या समीक्षेचा आलेख आहे. डॉ. द. भि. कुलकर्णी यांनी वसंत लुले, सुधाकर गायधनी, श्रीधर शनवारे, ज्योती लांजेवार यांचे काव्यसंग्रह, वि. स. जोग, अरुण वेलणकर यांचे प्रबंध, सुनीती आफळे, मधुकर देव यांच्या कथा यांना प्रस्तावना लिहून समकालीन साहित्याचे खरे मूल्यमापन केले. शास्त्रीय टीका तत्त्वतः मान्य करून त्यांनी आस्वादक टीकाही लिहिली. समीक्षेतही पांडित्याच्या जोडीला प्रतिभा आणि रसिकता हवी असे ते मानतात. त्यांच्या समीक्षेचे वैशिष्ट्य म्हणजे एका बाजूने ते वाङ्मयकृतीची अनन्यता, पृथगात्मता शोधत असतात तर दुसरीकडे संप्रदाय, परंपरा यांचाही शोध त्यांनी घेतलेला आहे. साहित्यकृतीचे मर्म सांगत असताना जीवनाचे रूप व कलावंताचे व्यक्तित्व याबद्दलही लिहीत राहतात. स्वतःचे आकलन मांडत असताना आस्वादाची पूर्तता ते अपेक्षित असतात. त्यांनी नाट्यसमीक्षा केली, चित्रपटसमीक्षा केली आणि मौखिक समीक्षाही वक्तृत्वरूपाने केली. निर्मिती, आस्वाद व वाङ्मयीन संस्कृती याबद्दलचे चिंतनसातत्य हा त्या समीक्षेचा मूलभूत गुणधर्म होता ! कलेच्या स्वायत्ततेचा आणि अलौकिकतेचा विचार ठळक करीत असतानाच त्यांनी तत्त्वदर्शी समीक्षा











केली, उदा. पार्थिवतेचे उदयास्त; आस्वादक समीक्षा केली, उदा. तिसऱ्यांदा रणांगण, प्रमेयदर्शी समीक्षा केली, उदा. पहिली परंपरा व दुसरी परंपरा. अशा समीक्षाप्रकारांना स्पर्श करीत असताना तत्त्वासाठी निखळ बौद्धिक पातळी स्वीकारण्यापेक्षा त्यांनी आस्वादातील सहजतेला महत्त्व दिले.

याच पिढीतील डॉ. सुरेश डोळके (संशोधनशलाका), डॉ. म. रा. जोशी, प्रा. म. शं. वावगावकर ('संशोधन व समीक्षा' आणि 'संशोधन व आस्वादन') (१९७७) यांचाही उल्लेख महत्त्वाचा ठरावा. या तिघांचीही समीक्षा संशोधननिष्ठ आहे. प्रा. वाबगावकरांनी आत्मचरित्र, अनिलांची श्रावणझड, कुंजविहारींची कविता असे आधुनिक विषय हाताळले तरी त्यात संशोधनाच्या शिस्तीला अधिक महत्त्व दिलेले दिसते. संशोधननिष्ठ व अभ्यासप्रचुर समीक्षालेखन करणाऱ्यांमध्ये प्रा. श्री. मा. कुळकर्णी यांचाही समावेश करावा लागेल. 'कादंवरीसमीक्षा' (१९७२) या समीक्षा-लेखसंग्रहात प्रा. कुळकर्णी यांची परंपराप्रिय दृष्टी दिसते. 'रुपेरी कडा', 'कठपुतळी' यांसारख्या आधुनिक व 'स्वामी'सारख्या समकालीन कादंबरीबद्दल विवेचन करतानाही ते प्रयोगशीलता, सौंदर्यवादी दृष्टी अशा मतांना स्पर्शही करीत नाहीत. प्रा. म. ना. लोही यांचे 'साहित्य आणि कला' (१९६६) हे पुस्तकही साधारणतः याच पठडीतील आहे. त्यातील नवकथा, नववाङ्मय, विनोद यांवरील विवेचन हे जुजबी आणि विद्यार्थीवर्गाला उपयुक्त एवढेच आहे.

प्रा. म. गं. नातू हे नावही वैदर्भीय समीक्षेत त्यातल्या त्यात स्त्री-समीक्षक या नात्याने महत्त्वाचे आहे. 'विवेकाची गोठी' (१९७७), 'वेदनेचा वेध' (१९७८) आणि समग्र आगरकर संपादन ही त्यांची समीक्षा-वाटचाल! विवेकवादाचे सूत्र धरून आगरकर, वा. म. जोशी, कोल्हटकर, महात्मा फुले यांच्या साहित्याचा अभ्यास 'विवेकाची गोठी'मध्ये मांडला गेलेला आहे. त्याचे स्वरूप अध्यापनातून स्फुरलेल्या विचारांचेच आहे. खानोलकरांच्या कादंबऱ्यांमध्ये समाजप्रवोधनाचा प्रत्यय येऊन त्याबाबत केलेली समीक्षा असे रूप 'वेदनेचा वेध'ला प्राप्त झालेले आहे. मात्र खानोलकरांच्या प्रतिभेला समीक्षेच्या कवेत घेण्याचा प्रयत्न मनुताई नातू यांना फारसा न साधल्यामुळे ही समीक्षा जुजवी पुस्तकपरीक्षणांच्या पातळीवर रेंगाळत राहिलेली आहे.

याच कालखंडात म्हणजे १९७८च्या सुमारास वैदर्भीय समीक्षेत दलित साहित्याबद्दल विवेचन करणारी, बांधिलकीच्या भूमिकेतून आणि विद्रोहाच्या पेटतेपणातून दलित साहित्यसिद्धान्त उलगडून दाखवणारी नव्या दमाची ताजी समीक्षा यशवन्त मनोहर यांच्या लेखनरूपाने जन्माला आली. वामन निंबाळकर यांनीही तिला हातभार लावला, प्रा. मनोहरांच्या 'दलित साहित्य : सिद्धान्त आणि स्वरूप' (१९७८), स्वाद आणि चिकित्सा (१९७८) या आरंभीच्या ग्रंथांतून त्यांनी आपल्या चिंतनाचे रूप तात्त्विक भूमिकेच्या आधारे स्पष्ट केलेले आहे. "जीवनाच्या गर्भातून समता ह्या श्रेष्ठ मूल्याद्वारा जीवनाशी अपूर्व बांधिलकी सांगून जन्मणाऱ्या साहित्याला दलित साहित्यकला म्हणून संबोधिते. आणि जीवनाचा व कलेचा

आधार आधेय रक्तसंबंध मांडून श्रेष्ठ मूल्यांची आंतरगाभाऱ्यात पूजा बांधणाऱ्या कलेसंबंधीच्या विचाराला दलित साहित्य कलावाद मानते. दलित साहित्याने मान्य केलेल्या, मांडलेल्या कलावादाचेही स्वरूप विद्रोही आहे. हा कलावाद मानणाऱ्या दलित साहित्याला पुन्हा वेगळे जीवनवादी असण्याची गरज भासत नाही. भासू नये." (दलित साहित्य : सिद्धान्त आणि स्वरूप, प्रबोध प्रकाशन, औरंगाबाद, प्रथमावृत्ती १९७८, पृ. ६९) याच विचारांपोटी कलावंताची व्याख्या करताना डॉ. मनोहर म्हणतात : "जीवनातील 'सौंदर्याची' ध्येयवत्ता ज्याला आहे, कुरूपतेने जो तगमगतो आणि सुरूपतेच्या जाणिवा अनुभवबद्ध करतो तो कलावंत होय." (तत्रैव : पृ. १२४)

'बाळ सीताराम मर्ढेकर' (१९८७), दलित साहित्य चिंतन (१९८८), डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा बुद्धधम्म (१९८८), आंबेडकरवाद आणि विद्यार्थी क्रांती (१९८८) ही डॉ. मनोहरांच्या समीक्षेची अलीकडची प्रस्फुरणे होत. डॉ. मनोहर यांची समीक्षा उघडच लौकिकवादी समीक्षा आहे. ते स्वतः तिला 'जीवननिष्ठ कलावादी' समीक्षा म्हणतात.

समकालीन समीक्षेत मार्क्सवादी प्रवाह अधोरेखित करणारे डॉ. वि. स. जोग हे नाव आहे. 'मार्क्सवाद आणि मराठी साहित्य' (१९८१) या त्यांच्या प्रबंधात मराठी वाङ्मयातील महत्त्वपूर्ण अशी संशोधनदृष्टी आहे. मार्क्सवादाचा त्यांनी मांडून दाखवलेला परिणाम हा सिद्धान्त स्पष्ट करणारा आहे. मार्क्सवादासारख्या आधुनिक अशा जीवनदर्शनाचा केवळ आढावा असे त्या प्रबंधाचे रूप नाही, त्यात सडेतोड चिकित्सा आहे. 'मार्क्सवाद आणि दलित साहित्य' (१९८५) या ग्रंथातून त्यांच्या समीक्षादृष्टीने पुढील पायरी गाठलेली आहे. आंबेडकर आणि मार्क्स यांच्या विचारांची परस्परपूरकता येथे दाखवली गेलेली आहे. विचारांचा कणा लाभलेल्या एका पिढीचेच हे दर्शन आहे आणि ते मुक्त चिंतनाच्या पातळीवर उभे आहे.

डॉ. जोग यांच्याबरोबरच प्रा. सु. श्री. पांढरीपांडे, डॉ. जयंत परांजपे, डॉ. अक्षयकुमार काळे, आशा सावदेकर ही नावे वैदर्भीय समीक्षेच्या दृष्टीने महत्त्वाची ठरावीत. त्याहीपेक्षा 'जनवादी' विचारधारा निर्माण करणारी समीक्षा लिहिणारे प्रा. वडस्कर, लोकजीवन अभ्यासणारे डॉ. मधुकर वाकोडे आणि आदिवासी जीवनातील लोकसाहित्याच्या स्थानाकडे सूक्ष्मपणे पाहणारे डॉ. भाऊ मांडवकर यांचे कार्य संशोधन, समीक्षा याबरोबरच सामाजिक दृष्टीनेही मोलाचे आहे.

'जनसाहित्याच्या दिशेने' (१९८८) हा या. वा. वडस्करांचा नवा ग्रंथ साहित्याची नवी दिशा दाखविणारा ठरतो. डॉ. सुभाष सावरकर, प्रा. जयंतकुमार बंड आदींनी या जनसाहित्याची बरीच चर्चा केली; पण जनसाहित्याचे सैद्धान्तिक रूप स्पष्ट झाले नव्हते. या नव्या ग्रंथाने ती उणीव बरीचशी भरून काढलेली आहे. "शोषणविरहित समाजातच श्रमिक बहुजनसमाजाला आपले स्वत्व प्राप्त होऊ शकते, अशी व्यापक भूमिका जनसाहित्यात घेतली जाते." (जनसाहित्याच्या दिशेने, या. वा. वडस्कर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, प्रथमावृत्ती १९८८, प्रस्तावना पृ. ५) हे तत्त्व या ग्रंथाने प्रथम प्रकाशात आणले.

"सच्चे व प्रामाणिक, श्रेष्ठ व प्रत्ययकारी जीवनदर्शन व रसनिष्पत्ती यांच्यात फारकत










करता येत नाही." (तत्रैव, पृ. ४०) अस्तित्ववाद व नियतीवाद यांच्या संदर्भात प्रा. वडस्कर यांनी मांडलेला जनसाहित्याचा अभ्यास विशेष लक्षणीय आहे. "चिद्वादाने जन्माला घातलेल्या परमेश्वर, नियम, प्रारब्ध इत्यादी कोणत्यांच गोष्टी जनसाहित्याला मान्य नाहीत. मनुष्याच्या वाट्याला येणारी असहाय्यता व त्याच्या स्वातंत्र्याचा संकोच यांना जन्म देणारी कारणे संपूर्ण ऐहिक असतात." (तत्रैव, पृ. ११८) जीवनाचे वास्तविक रूप जननिष्ठ जाणिवेतून ओळखता येते; कारण या जाणिवेचा आधार प्रा. वडस्करांच्या मते 'मानवप्रेम' हा असतो.

डॉ. जयंत परांजपे यांनी समीक्षेच्या अनवट वाटा चोखाळल्या आहेत. साहित्यनिर्मितीच्या व्यामिश्र आणि जटिल रूपावर प्रकाश टाकणारी दोन समीक्षेची पुस्तके त्यांनी लिहिली आहेत : 'श्री. ना. पेंडसे : हस्तलिखित आणि परिष्करणे' (१९८३) आणि 'ग्रेस आणि दुर्बोधता' (१९८६). पहिल्या ग्रंथाचे रूप हे वरवर संशोधनापुरते मर्यादित वाटले तरी त्यातून साहित्यनिर्मितीच्या अंगावर पडणारा प्रकाश, सूचित होणाऱ्या विविध वृत्तिप्रवृत्ती, कलाकृती व कलावंत यांच्या संबंधावर केंद्रित होणारी दृष्टी यामुळे तो एक महत्त्वपूर्ण समीक्षाग्रंथ ठरतो. 'ग्रेस आणि दुर्बोधता' या ग्रंथातही दुर्बोधतेच्या प्रश्नाला मध्यवर्ती स्थान देऊन विशिष्ट दृष्टिकोणातून कवी ग्रेस यांच्या कवितेचा आस्वादक असा अभ्यास मांडलेला दिसतो. त्या अभ्यासाचे प्रयोजन हे ग्रेसच्या कवितेकडे जाण्याच्या वाटा मोकळ्या करण्याचे आहे.

डॉ. अक्षयकुमार काळे यांनीही आधुनिक मराठी कवितेच्या अभ्यासाचे क्षेत्र आपल्या संशोधन व समीक्षेसाठी सीमित करून घेतले आहे. 'सूक्तसंदर्भ' (१९८५) या समीक्षालेखसंग्रहात त्यांच्या आधुनिक मराठी कवितेच्या अभ्यासाचे अस्पष्ट असे दर्शन घडते. मात्र त्यात एकसूत्रता प्रत्ययाला येत नाही. 'गोविंदाग्रज समीक्षा' (१९८५) या संपादनाच्या प्रस्तावनेत त्यांनी 'नवनवीन दृष्टीने' विषयाकडे पाहण्याची आवश्यकता प्रतिपादन केली पण ती अंतर्वेधी दृष्टी त्यात प्रकट झालेली नाही. 'कविता कुसुमाग्रजांची' (१९८६) या ग्रंथांत त्यांनी एकाच लेखकाचा अभ्यास संशोधननिष्ठ दृष्टीने मांडलेला आहे. उपयोजित समीक्षेच्या क्षेत्रात मात्र डॉ. अक्षयकुमार काळे नवे आकलन मांडताना दिसतात. त्यांच्या समीक्षेत संशोधन व व्यासंग यांचा प्रत्यय येत राहतो.

डॉ. आशा सावदेकर यांचा प्रबंध 'कविवर्य भा. रा. तांबे : एक चिकित्सक अभ्यास' (१९७९) आणि संपादन 'कवी जयकृष्ण केशव उपाध्ये यांची कविता' (१९८५) यापेक्षाही त्यांच्या आस्वादक समीक्षेच्या सूक्ष्मतेचा प्रत्यय त्यांच्या ग्रंथसमीक्षेतून येत राहतो. विविध समकालीन लेखनाचा रसवेध घेण्याचे कार्य आणि त्यातील वृत्ती-प्रवृत्तींचा शोध मांडण्याचे कार्य त्यांच्या समीक्षेने केलेले आहे.

संशोधनप्रबंधाच्या ग्रंथरूपाने शकुंतला खोत, विमल भालेराव, अरुण वेलणकर, मदन कुलकर्णी, कल्पना परांजपे अशी नावे पुढे आलेली असली तरी समीक्षाप्रवाहात त्यांचे वैशिष्ट्यपूर्ण योगदान अजून ठरलेले नाही.

विदर्भात समकालीन साहित्यात तात्त्विक पातळीवरून साहित्यविषयक मूलगामी

प्रश्नांची चिकित्सा करणारी समीक्षा प्रा. सु. श्री. पांढरीपांडे यांनी लिहिलेली आहे. त्यांचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांची मते आग्रह-अभिनिवेश-प्रचार यांपासून दूर आहेत. त्यांची समीक्षा एका बाजूने आधुनिक तत्त्वज्ञानाशी तर दुसरीकडे आधुनिक कलामीमांसेशी जवळीक साधताना दिसते. वाङ्मयीन बांधिलकी, आजचे साहित्य आणि परात्मभाव याविषयीचे त्यांचे चिंतन मूलगामी आहे आणि समीक्षा कलावादी भूमिकेतून बोधवाद-आणि प्रचार नाकारणारी आहे.

"लौकिक अनुभवाची जी अनिवार्य विशिष्टता आणि संदर्भ-सापेक्षता असते, त्यापासून कलाकृती मुक्त असते हे मान्य करणे भाग आहे– कलाकृतीमध्ये एक स्वयंपूर्णता आणि बाह्यसंदर्भनिरपेक्षता असते." ('साहित्य : स्वरूप संदर्भ आणि सौंदर्य,' सु. श्री. पांढरीपांडे, प्रतिमा प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती १९८५, पृ. ५९) परंतु त्याबरोबरच ती एकांगी किंवा आकृतिवादी समीक्षेकडेही 'बंदिस्त चौकटीतून मुक्त होण्याचा एक प्रभावी प्रयत्न' (तत्रैव : पृ. ८७) या दृष्टीने बघू शकते आणि दलित कविता "कलात्मकतेच्या कसोट्यांपासून पूर्णतः मोकळी राहू शकत नाही." हे स्पष्टपणे सांगू शकते. (तत्रैव पृ. ४८) प्रा. सु. श्री. पांढरीपांडे यांच्या समीक्षेचे वैशिष्ट्य हे असे अनाग्रही भूमिकेत आहे. त्याचप्रमाणे त्यांनी मानलेल्या कलेच्या लौकिक व अलौकिक अशा दुहेरीपणात आहे. त्यांची समीक्षा ही अशी कलेच्या अलौकिकत्वाशी आणि अक्षरसौंदर्याशी नाते सांगते, त्याचप्रमाणे भावगर्भ मूल्यात्मकतेच्या आस्वादातील सहजस्वीकाराशीही नाते सांगते. त्यांचा साहित्यास्वाद असा निकोप व उदार आहे.

असा या समग्र समीक्षेचा विचार करतानाही १९६० च्या आरंभीची कुसुमावतींची समीक्षा आठवत राहते आणि वैदर्भीय समीक्षेचे १९६० ते १९८८ असे ऐतिहासिक आढावा घेणाऱ्या अभ्याससूत्राचे वर्तुळाकारी रूप स्पष्ट होते. वैदर्भीय समीक्षेचे १९६० च्या आसपासचे रूपही निखळ कलावादी नव्हते आणि ते आजही नाही. मात्र कला आणि जीवन यासंबंधीचे विविधांगी चिंतन कुसुमावती देशपांडे, मुक्तिबोध, द. भि. कुळकर्णी, वि. सं. जोग, यशवन्त मनोहर, जयंत परांजपे, सु. श्री. पांढरीपांडे यांनी आपल्या समीक्षेतून ताकदीने घडविले आहे. या २८ वर्षांच्या समीक्षाप्रवाहात विदर्भाचे हे दर्शन असे एकीकडून सूत्रबद्ध आहे तर दुसरीकडे व्यक्तिवैशिष्ट्यांनी परिपूर्ण असेही आहे.

(डॉ. सौ. आशा सावदेकर C-२, हेमराज अपार्टमेन्टस्, १२२, शिवाजीनगर नागपूर-४४००१०)

*



अनुक्रमणिका






# वैदर्भीय कादंबरीची तीन दशके...

## माणूस व धग यांच्यानंतर महत्त्वपूर्ण काही नाही

प्रा. रवीन्द्र के. शोभणे

१९६० नंतर मराठी वाङ्मयात नवे संक्रमण घडून आले. या नव्या संक्रमणाच्या दिशा दलित साहित्य, मार्क्सवादी साहित्य, आधुनिक ग्रामीण साहित्य इत्यादींनी निश्चित केल्या. या संक्रमणाचा एक महत्त्वाचा विशेष म्हणजे मानवी जीवनाकडे पाहण्याची दिशाच या संक्रमणाने बदलवून टाकली, हा होय. त्याआधीच्या दशकात नववाङ्मयाने मराठीत रूढ केलेला शून्यवाद (आणि तदन्तर्गत अस्तित्वत्वाद) या संक्रमणाने मोडीत काढला. 'जीवनाकडे उदासीनतेनं पाहण्यापेक्षा उदात्ततेनं पाहण्याची दृष्टी' या संक्रमणाने दिली. आणि म्हणून हे संक्रमण मराठी वाङ्मयाच्या इतिहासातील एक महत्त्वाचा टप्पा ठरलेले आहे.

या संक्रमणाने मराठी साहित्यात जी नवदृष्टी रूढ केली, त्या संदर्भातील मोलाचे श्रेय वैदर्भीय साहित्यिकांना जाते. मराठी कादंबरीच्या संदर्भात तर हे श्रेय नाकारताच येत नाही. बा. सं. गडकरी, श्री. कृ. कोल्हटकर, श्री. व्यं. केतकर, पु. य. देशपांडे, ग. त्र्यं. माडखोलकर, शं. बा. शास्त्री, गीता साने, विश्राम बेडेकर, पु. भा. भावे, गो. नी. दांडेकर या आधीच्या पिढीने वैदर्भीय मराठी कादंबरीला एक मूल्यगर्भता प्राप्त करून दिली होती. हा वसा १९६० नंतरच्या पिढीने पुढे चालवला आणि मराठी कादंबरीला मोलाची देणगी दिली.

या तीन दशकांतील कादंबरीकारांचा विचार केला तर शरच्चंद्र मुक्तिबोध, उद्धव शेळके, मनोहर तल्हार, भाऊ मांडवकर, बाजीराव पाटील, वामन इंगळे, सुनीती आफळे, प्रभाकर सिरास, वसंत आवाजी डहाके, केशव मेश्राम, अरुण साधू, वसंत वरखेडकर, सुभाष सावरकर, बाबाराव मुसळे, मधुकर केचे, रवीन्द्र शोभणे, मधुकर वाकोडे, पुरुषोत्तम बोरकर, आशा बगे, दिनकर देशपांडे, योगेन्द्र मेश्राम इत्यादी कादंबरीकारांची नावे सहजपणे समोर येतात.

प्रकृतिधर्मानुसार या पिढीतील कादंबरीकारांचा पिंड जरी वेगळा असला तरीही एक महत्त्वाचे सूत्र हाती येते आणि ते म्हणजे ही पिढी फक्त सामाजिक कादंबरीशीच निगडित आहे. यापैकी वसंत वरखेडकरांचा अपवाद सोडला ('सत्तावनचा सेनानी' व 'आई याज्ञवल्काची'), तर संपूर्ण कादंबरीकारांचा पिंड हा सामाजिक कादंबरीकारांचा आहे हे स्पष्ट होते. स्वातंत्र्योत्तर मराठी कादंबरीचे मूल्यमापन करताना भालचंद्र नेमाडे कादंबरीची रीतिवादी आणि कृतिवादी (मराठी साहित्य : प्रेरणा व स्वरूप / संपा. गो. मा. पवार-हातकणंगलेकर) अशी प्रवृत्ती मांडताना दिसतात. वैदर्भीय कादंबरीचे मूल्यमापन त्यांनी याच निकषांद्वारे केले आहे; परंतु प्रस्तुत तीन दशकांतील कादंबरीचे मूल्यमापन केवळ या निकषांद्वारे करणे तेवढे सोयीचे ठरत नाही. वैदर्भीय कादंबरी ही त्या दृष्टीने अधिक कृतिप्रधान आहे, हे विसरता येत नाही.



अनुक्रमणिका







या संदर्भात या कादंबरीचे वर्गीकरण वैदर्भीय कादंबरी आणि वऱ्हाडी असे करता येईल. या वर्गीकरणात मूलतः एक महत्त्वाचा भेद जाणवतो. वैदर्भीय कादंबरी म्हणजे विदर्भाच्या लेखकाने लिहिलेली कादंबरी आणि वऱ्हाडी कादंबरी म्हणजे वऱ्हाडी जीवनाचे प्रादेशिक पातळीवर चित्रण करणारी कादंबरी या दृष्टीने वैदर्भीय कादंबरी ही प्रस्थापित कादंबरीशी नाते जोडणारी अशी ठरते. या कादंबरीचा उपप्रवाह हा.स्थित्यंतराचा वेध घेत पुरोगामी पद्धतीने समोर येणारा उपप्रवाह आहे; पण तोसुद्धा बराचसा क्षीण आहे. पुरोगामित्वाचा आव आणून हा प्रवाह एक तर नवीन खोट्या नवविचारांचा बळी ठरतो किंवा केवळ करमणूकप्रधान ठरतो. त्यापलीकडे या उपप्रवाहाचे प्रवाहीत्व मान्य करताच येत नाही. त्या तुलनेत वऱ्हाडी कादंबरी ही कितीतरी पुढचा पल्ला गाठते हे निर्विवाद सत्य आहे.

१९६० नंतरच्या या मराठी कादंबरीचा विचार केला तर प्रामुख्याने तीन-चार नावे भरघोसपणे समोर येतात ते म्हणजे शरच्चंद्र मुक्तिबोध, वसंत वरखेडकर, उद्धव शेळके व मनोहर तल्हार. या पर्वाचा मुळी प्रारंभच या पिढीच्या प्रतिभासंपन्न वाङ्मयकृतींनी होतो. दुसरे असे की या चारही कादंबरीकारांची प्रकृती आणि वाङ्मयीन विचारसरणी भिन्न स्वरूपाची आहे. मार्क्सवाद; निखळ जीवनदर्शन व राजकीय पार्श्वभूमीवरील ऐतिहासिक, राजकीय चित्रण आणि प्रादेशिक जीवनदर्शनाची आशयवादी बांधिलकी ह्या या कादंबरीकारांनी निर्माण केलेल्या परंपरांच्या पलीकडे वैदर्भीय कादंबरीचे स्वरूप फारसे जाणारे नाही.

मुक्तिबोध आणि वरखेडकर यांचा कालखंड एकच आहे. 'क्षिप्रा' या कादंबरीच्या निमित्ताने आपल्या कवितेतून व्यक्त होणारे मुक्तिबोध एका विस्तृत जीवनकालखंडाचा वेध घेताना दिसतात. 'क्षिप्रा' ही १९५४ साली प्रसिद्ध झाली. त्यानंतर विशूच्या भावजीवनाचा, विकसित होत जाणाऱ्या त्याच्या वैचारिक, समाजनिष्ठ पिंडाचा शोध मुक्तिबोध 'सरहद्' आणि 'जन हे वोळतु जेथे' या १९६० नंतरच्या दोन कादंबऱ्यांमध्ये घेतात. 'क्षिप्रा'च्या शेवटी भेटणारा विशू आणि 'जन हे वोळतु जेथे'च्या शेवटी भेटणारा विशू पहिला की मुक्तिबोधांचे कादंबरीकार म्हणून असलेले सामर्थ्य प्रतीत झाल्यावाचून राहत नाही; पण मार्क्सवादी दृष्टिकोणातून जीवनदर्शन घडविणारी ही कादंबरी मुक्तिबोधांपाशीच का थांबते ? मार्क्सवादी कादंबरीचा हा प्रवाह इथेच का खंडित होतो, हा महत्त्वाचा मुद्दा इथे उद्‌भवतो.

'वर्गविग्रह, अतिरिक्त मूल्याचा सिद्धांत, भौतिकवाद, विरोधविकासवाद ही मार्क्सच्या तत्त्वज्ञानातील मूल्ये प्रामुख्याने कामगारांना किंवा आर्थिक पातळीवरील जे शोषित आहे, त्यांना समोर ठेवून उभी राहिलेली मूल्ये आहेत. ज्या देशात उद्योगीकरणाचे जाळे विणले गेले आहे, त्या देशातील सामाजिक परिस्थितीला ही मूल्ये लागू होऊ शकतात. आणि भारतीय समाजव्यवस्थेचा पाया हाच मुळात धर्मविषयक आहे. भारतीय समाजव्यवस्थेच्या संदर्भात मार्क्सवादाची तोंडमिळवणी करताना अनेक मर्यादा पडतात. शिवाय ही ग्रामीण भागात राहणारी असून त्यांचा मुख्य व्यवसाय शेतीचा आहे या परिस्थितीत मार्क्सवाद जसाच्या तसा स्वीकारताच येत नाही; म्हणून मराठी साहित्यात आलेला मार्क्सवाद मध्यमवर्गीय पांढरपेशा

जीवनाच्या पलीकडेच जात नाही. मुक्तिबोधाच्या कादंबऱ्यांच्या संदर्भात देखील हीच मर्यादा प्रामुख्याने उभी राहते. आणि म्हणूनच मराठीत खऱ्या अर्थाने मुक्तिबोधांपासून सुरू झालेली मार्क्सवादी कादंबरी मुक्तिबोधांपाशीच थांबते.

मुक्तिबोधांना समकालीन असलेले वसंत वरखेडकर ह्यांची 'सत्तावनचा सेनानी' ही ऐतिहासिक कादंबरी. नवी ऐतिहासिक कादंबरी 'स्वामी' पासून जरी सुरू जरी होत असली तरी, 'स्वामी'च्या पूर्वखुणा गांडणारी ही कादंबरी आहे. 'झेप' किंवा 'स्वामी'ची पायवाट निर्माण करणारी स्वातंत्र्यसेनानी तात्या टोपे यांच्या जीवनावरील ही कादंबरी एक लक्षणीय कादंबरी.

वरखेडकरांची 'प्रतिनिधी' ही राजकीय कादंबरी. नवीन राजकीय स्थित्यंतराचा अन्वयार्थ लावून त्याचा सर्वसामान्यांच्या जीवनाशी असलेला संबंध, राजकीय प्रवृत्तीचे चित्रण यथार्थपणे ही कादंबरी करते. स्वातंत्र्योत्तर राजकीय कादंबरीची पहिली वाट ही कादंबरी निर्माण करते. ग. त्र्यं. माडखोलकर ते अरुण साधू या राजकीय कादंबरीकारांना जोडणारा दुवा म्हणजे वरखेडकर. मराठीत राजकीय कादंबरी केवळ वैदर्भीय कादंबरीकारांनीच समृद्ध केली आहे, असे ठोस विधान केले तर ते अतिशयोक्तीचे ठरू नये.

'आई याज्ञवल्काची' ही वरखेडकरांची तिसरी कादंबरी. वैदिक काळातील जीवनदर्शन घडविणारी; पण जी उंची 'प्रतिनिधी' किंवा 'सत्तावनचा सेनानी' गाठते, ती उंची मात्र ही कादंवरी गाठू शकत नाही. तात्पर्य : राजकीय, ऐतिहासिक व पौराणिक अशा त्रिविध प्रकारचे कादंबरीलेखन करणारे वरखेडकर हे महत्त्वाचे कादंबरीकार ठरतात.

मुक्तिबोध आणि वरखेडकरांच्या समकालीन लेखन करणारे दोन महत्त्वाचे कादंबरीकार म्हणजे उद्धव शेळके आणि मनोहर तल्हार. हे दोघेही कादंबरीकार वऱ्हाडी कादंबरीकार म्हणूनच प्रामुख्याने ओळखले जातात. किंबहुना वऱ्हाडी कादंबरीची मुहूर्तमेढच 'धग'ने रोवली. 'धग'पूर्वी वऱ्हाडी जीवनाचे वस्तुनिष्ठ चित्रण करणारी 'पूर्णामायची लेकरं' ही गो. नी. दांडेकरांची कादंबरी प्रसिद्ध झाली होती; पण दांडेकरांची ही कादंबरी एखाद्या 'फोकस'पलीकडे जाऊ शकली नाही. 'पूर्णामायची लेकरं'ला अस्सल कलाकृती म्हणून मराठी वाङ्मयात कोणते स्थान आहे, हा गौण मुद्दा आहे; तथापि या कादंबरीची निर्मितीप्रेरणा भ्रमंती आहे हे सुद्धा विसरता येत नाही. 'पूर्णामायची लेकरं'पेक्षा 'कात टाकलेली नागीन' ही पा. श्रा. गोरेंची कादंबरी या दृष्टीने अधिक मोलाची ठरते.

एकूण मराठी कादंबरीच्याच इतिहासात 'धग'ला अतिशय महत्त्वाचे स्थान आहे. 'धग'ला एका अर्थाने आत्मप्रत्ययी कादंबरीही म्हणता येईल. ही कादंबरी मानवी जीवनातील आदिम सत्याला स्पर्श करणारी, किंबहुना आदिम सत्यालाच हात घालणारी आहे. यातील कौतिकला आदिमातेचा आयाम प्राप्त होतो. ही आदिम माता आपल्या पतीला देखील पुत्राच्या भूमिकेतून सांभाळते. म्हणून तिच्या व्यक्तिमत्त्वाला प्राप्त होणारा आयाम आदिम स्वरूपाचा ठरतो.

'धग'ची उंची स्तिमित करणारी आहे; पण 'धग'नंतर पुढे काय असा प्रश्न मराठी वाचक

समीक्षकांकडून शेळकेंच्या बाबतीत विचारला जातो.प्रत्येक कलावंताची एखादीच कलाकृती स्तिमित करणारे वाङ्मयीन संचित प्राप्त करू शकते, हे विधान जरी खरे असले तरीही त्या कलाकृतीत आणि इतर कलाकृतीत जर वाङ्मयीन यशाच्या बाबतीत महदंतर निर्माण होत असेल, तर आपण सरळपणे 'हा कलावंत संपला आहे' असा शिक्का मारून मोकळे होतो; पण हा असा शिक्का मारून मोकळे होण्याइतपत हा प्रश्न सामान्य ठरत नाही.

एखाद्या कलावंताची वाङ्मयीन अधोगती आणि त्या अधोगतीचा संबंधित वाङ्मयाशी असलेला संबंध हा मुद्दा या ठिकाणी अतिशय महत्त्वाचा ठरतो. या संपलेपणाच्या नावाखाली साहित्यात कधीकधी अपप्रवृत्तींचाही जन्म होतो आणि या अपप्रवृत्तींच्या माध्यमातून पुढे वाङ्मयाच्या व्यापारीकरणाची दुर्दशा सुरू होते.

उद्धव शेळके यांच्या बाबतीत नेमके हेच घडते. 'डाळिंबाचे दाणे', 'अगतिका' वगैरे ठीक वाटतात; पण 'बाईविना बुवा'पासून नंतरचे लेखन करणारे शेळके पाहिले म्हणजे एक समर्थ कलावंत आपल्या स्वत्वालाच बेईमान झाला आहे, हे विधान मोठ्या दुःखाने करावे लागते. गेल्या तीस वर्षांत तीन डझनांच्या वर कादंबऱ्या लिहिणारा हा लेखक, लेखनाला केवळ उपजीविकेचे साधन न ठरवता तर मराठीच्या गळ्यातला ताईत ठरला असता.

'धग' ही आत्मप्रत्ययी कादंबरी आहे असे विधान यापूर्वी आलेले आहे. साधारणतः कुठल्याही कलावंताची पहिली कलाकृती आत्मप्रत्ययी स्वरूपाचीच असते. जीवनातील अस्सल अनुभवाचे लेणे तो कलावंत या ठिकाणी कोरतो; पण केवळ आत्मप्रत्ययी अनुभवविश्वावर आपले सबंध वाङ्मयीन विश्व उभे करणे ही केवळ तारेवरची कसरत ठरते. या ठिकाणी मग त्या कलावंताला आपल्याच अनुभवाकडे वेगवेगळ्या दृष्टिकोणातून पाहण्याची दृष्टी असायला हवी. नाहीतर त्याच्या लेखनात एक मर्यादित विश्वाचे व जीवनदर्शनाचे रिंगण तयार व्हायला उशीर लागत नाही. किंवा अशा कलावंताला मग वस्तुनिष्ठ पातळीवरील जीवनानुभव आत्मनिष्ठ पातळीवर चितारणे क्रमप्राप्त ठरते. याचाच अर्थ असा की स्वजीवनातील अनुभवांचे निर्मितीच्या संदर्भात जेव्हा आवर्त निर्माण होते तेव्हा त्या कलावंताला परात्म अनुभवाला सामोरे जावे लागते. इथे मग त्याची प्रतिभा कितपत अस्सल आहे, याचा सुद्धा अदमास आल्यावाचून राहत नाही.

नंतरचे शेळकेंचे लेखन अर्थात याच पद्धतीने झालेले आहे. आणि म्हणून 'धग'नंतरचे सगळे लेखन कमअस्सल स्वरूपाचे झाले आहे.

शेळकेंनी प्रामुख्याने सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. शेळकेंचा पिंड हा मुळात सामाजिक कादंबरीकाराचाच. पण त्यांनी 'साहेब'पासून चरित्रात्मक कादंबरीलेखनाकडेही आपला मोर्चा वळवला आहे. 'साहेब' आणि 'खंजरीचे बोल' ह्या त्यांच्या चरित्रात्मक कादंबऱ्या. चरित्रात्मक कादंबरी किंवा ऐतिहासिक-पौराणिक कादंबरी ही कलावंताच्या संदर्भात दुय्यम दर्जाची निर्मिती ठरते. आयता असलेला जीवनपट, व्यक्ती, व्यक्ति-व्यक्तींमधील संबंध याबाबतीत त्या कलावंताला केवळ कारागिरीची बाजू सांभाळावी लागते.



अनुक्रमणिका







एखाद्या कलावंताची जीवनाविषयीची आस्था कितपत आहे, जीवनावर तो कितपत प्रेम करू शकतो यातून त्याच्या कलाकृतीचे मूल्य ठरत असते. अर्थात जीवनावरील हे प्रेम आणि आस्था नकारात्मक किंवा होकारात्मक अशा कुठल्याही स्वरूपाची असू शकते. चरित्रात्मक किंवा ऐतिहासिक, पौराणिक कलाकृतीत या जीवनविषयक आस्था आणि प्रेमापेक्षा चरित्रनायक महत्त्वाचा असतो आणि कलावंत या चरित्रनायकाकडे विभूती म्हणून पाहत असतो. त्या नायकाच्या उत्तुंग व्यक्तिमत्त्वाने कलावंत झपाटला जातो आणि या अशा झपाटलेपणातून चरित्रनायकाचे उदात्त चित्रण करण्यापलीकडे त्या कलावंताला दुसरा कुठलाही पर्याय नसतो. तात्पर्य, चरित्रात्मक किंवा ऐतिहासिक-पौराणिक कलाकृतीमध्ये कलावंत कलात्मक तटस्थता पाळू शकत नाही.

उद्धव शेळकेंनंतर मनोहर तल्हार हे महत्त्वाचे कादंबरीकार. शेळकेंचे समकालीन. "धग'नंतर दोन वर्षांतच 'माणूस' ही कादंबरी प्रसिद्ध झाली आणि मनोहर तल्हार समर्थ कादंबरीकारांच्या रांगेत जाऊन बसले. रिक्षावाल्यासारख्या सामान्य माणसाला तल्हारांनी शोकात्म नायकाच्या जागेवर बसवलं. एका सामान्य रिक्षावाल्याची इथल्या विषम अर्थव्यवस्थेत झालेली शोकांतिका तल्हारांनी समर्थपणे उभी केली आहे. वरवर दोन सामान्य रिक्षावाल्या मित्रांची वाटणारी ही कथा सामाजिक-आर्थिक विषमतेचा केवढा जबरदस्त स्फोटक हादरा देऊन जाते ! तल्हार तत्त्वज्ञ किंवा समाजचिंतक नाहीत, तर प्रामाणिकपणे सृजनाच्या पातळीवर जीवनाकडे पाहणारे ते सच्चे कलावंत आहेत. आणि ही सृजनात्मक सच्ची दृष्टी कळत नकळत केवढे मोठे सामाजिक तत्त्वज्ञान मांडून जाते. कळत नकळत या कादंबरीद्वारे मार्क्सवादी तत्त्वज्ञान समोर येते. नेणिवेच्या प्रक्रियेतून उभे राहणारे जाणीवपूर्वक विचारमंथन हे त्या कलाकृतीची महत्ता अधिक स्पष्टपणे सांगणारे ठरते.

'माणूस'नंतर मनोहर तल्हारांनी 'अप्रिया', 'अफलातून', 'अशरीरी' आणि 'शुक्रथेंब' (अप्रकाशित) या कादंबऱ्या लिहिल्यात. 'माणूस'मध्ये आलेला जीवनपट आणि त्यानंतरच्या कादंबऱ्यांमध्ये आलेला जीवनपट पाहिला तर तल्हारांच्या कादंबरीविश्वातील जीवनदर्शनाची विविधता सहजपणे जाणवते. कष्टकरी दरिद्री ('माणूस'), निम्नस्तरीय मध्यमवर्गीय ('अफलातून'), पांढरपेशीय उच्चभ्रू ('अप्रिया' व 'अशरीरी') आणि पांढरपेशीय मध्यमवर्गीय ('शुक्रथेंब') असे विविध स्तरांतील जीवन त्यांनी आपल्या कादंबऱ्यांमधून चितारलेले आहे. जीवनदर्शनातील ही विविधता पाहिली की तल्हारांचे अनुभवविश्व किती व्यामिश्र आणि व्यापक आहे याची जाणीव झाल्यावाचून राहत नाही; पण जीवनातील ही व्यामिश्रता आणि व्यापकता 'माणूस'नंतर त्याच सामर्थ्यानिशी इतर कादंबऱ्यांमध्ये मात्र आली नाही. अप्रगल्भ अवस्थेत जीवनविषयक जी झेप तल्हार 'माणूस'मध्ये घेतात, ती झेप वयाची प्रगल्भता आल्यावरसुद्धा इतर कलाकृतींमध्ये का येऊ शकली नाही ? आणि यामागची कारणमीमांसा काय ? हा प्रश्न निर्मितीच्या संदर्भात खरोखरीच अस्वस्थ करणारा आहे.

'माणूस' ही बहुआयामी कलाकृती आहे. जीवनविषयक हे बहुविध आयाम 'माणूस'



अनुक्रमणिका

नंतरच्या कादंबऱ्यांच्या संदर्भात शोधताच येत नाहीत.'अफलातून','अप्रिया','अशरीरी' किंवा 'शुक्रथेंब' या एकआयामी कलाकृती ठरतात. एखादी श्रेष्ठ, सर्वश्रेष्ठ कलाकृती निर्माण झाल्यावर त्यानंतरच्या कलाकृती जणू लेखकाची त्या कलाकृतीपासून नाळच कापून टाकतात. हे असे का व्हावे ?

या संदर्भातील ही कारणमीमांसा शोधताना साधारणतः समीक्षक लेखकांना दोष देऊन मोकळे होतात. लेखकाला दोषी ठरवून या समस्येचे उत्तर शोधणे म्हणजे दोराला साप समजून 'आपण साप मारला' हा आव आणण्यापलीकडे काहीही निष्पन्न होत नाही. या संदर्भातील महत्त्वाची कारणमीमांसा वेगळीच आहे.

प्रत्येक कलावंताचा वाङ्मयीन पिंड जोपासणारा आणि समृद्ध करणारा असा त्याचा एक विशिष्ट समाज असतो. त्या समाजाशी जोडली गेलेली त्याची नाळ अतूट असते. त्याच्या सृजनशील व्यक्तिमत्त्वाशी तो समाज रक्तात भिनल्याप्रमाणे एकरूप झालेला असतो. कलावंत जेव्हा सृजनात्मक पातळीवर पार्श्वभूमी म्हणून या समाजाचा विचार करतो, तेव्हा अस्सलपणे तो फक्त एकदाच येऊ शकतो. कारण कलावंत म्हणून प्रत्येकाच्या आकलनाला एक मर्यादा असते. या मर्यादेपलीकडील त्याचे आकलन कुठेतरी फसते. मग पुनरुक्ती, अनुकरण आणि तकलादूपणा, या कलाकृतीला मारक ठरणाऱ्या गोष्टी येऊ लागतात आणि म्हणून एखाद्या कलावंताच्या व्यक्तित्वाशी अभिन्न नाते दर्शविणारा समाज जेव्हा पूर्णत्वाने एखाद्या कलाकृतीत येतो, तीच त्याची लक्ष्मणरेषाही ठरते. हा समाज कधीकधी पूर्णांशाने न येता टप्प्याटप्प्याने येतो तेव्हा त्या कलाकृती साधारणतः सारख्या तोलामोलाच्या ठरतात. (उदाहरणच घ्यायचे झाले तर श्री. ना. पेंडसे किंवा खानोलकर यांचे घेता येईल) आणि कलावंत जेव्हा या समाजातून दुसऱ्या समाजात जातो, तेव्हा कलाकृतीतील अस्सलपण टिकून राहीलच, हे सांगता येत नाही. अर्थात या प्रक्रियेत दुसऱ्या टप्प्यातील कलाकृती अस्सल नसेलच असे नाही; पण क्वचितच ती त्या कलावंताच्या भावविश्वाचा वेध घेणाऱ्या कलाकृतीची बरोबरी करू शकते. आणि म्हणूनच प्रत्येक कलावंताची श्रेष्ठ कलाकृती ही एखादीच असते. तल्हारांच्या कादंबऱ्यांच्या संदर्भातसुद्धा हेच विधान करावे लागते; तथापि कादंबरीकार म्हणून तल्हारांचे मराठी कादंबरीविश्वातील स्थान निश्चितच श्रेष्ठ आहे.

तल्हारांनी मनावर घेतलं तर अजूनही ते 'माणूस'सारखी समर्थ कलाकृती देऊ शकतील, हे त्यांच्यां अलीकडच्या दमदार कथा वाचून म्हणावेसे वाटते.

मुक्तिबोध, वरखेडकर, शेळके आणि तल्हार या वैदर्भीय कादंबरीकारांनी जे अभिजात कादंबरीवाङ्मय निर्माण केले, त्याच्यापुढे नंतरचा कुणीही वैदर्भीय कादंबरीकार गेला नाही. हे चार कादंवरीकार म्हणजे वैदर्भीय कादंबरीचे मापदंड ठरतात.

शेळके, तल्हार यांच्या पिढीचे काही कादंबरीकार श्रेष्ठ कादंवरीकार जरी नसले तरीही लक्षणीय मात्र नक्कीच आहेत. यामध्ये वामन इंगळे, प्रभाकर सिरास, भाऊ मांडवकर, अरुण साधू, दिनकर देशपांडे, बाजीराव पाटील, सुभाष सावरकर, इत्यादी नावे समोर येतात.











काहीसा मार्क्सवादाचा प्रभाव असलेला वामन इंगळे हा कादंबरीकार. सजग जीवनदृष्टी आणि सामाजिक भान असलेला. 'काळा समुद्र' ही वासनेचे तांडव चितारणारी समर्थ कादंबरी. या कादंबरीने वामन इंगळेंविषयीच्या खूप अपेक्षा निर्माण केल्या; पण नंतरची 'अजून येतो वास फुलांना' ही कादंबरी वाचली की वामन इंगळेंच्या प्रतिभेची दोन विरुद्ध टोकंच दृष्टीस पडतात आणि त्याहीपेक्षा विशेष म्हणजे काही कौटुंबिक कारणांमुळे हा कलावंत पूर्णपणे साहित्याच्या क्षेत्रातून हद्दपार झाला.

प्रभाकर सिरास यांची 'निळे कमळ' ही संज्ञाप्रवाही कादंबरी. यातील संज्ञाप्रवाहाचा भाग महत्त्वाचा. आपली प्रेयसी आपली सावत्र आई म्हणून आपल्या जीवनात येते आणि यामुळे उद्ध्वस्त झालेलं आपलं भावविश्व उभं करणाऱ्या तरुणाची ही भावकथा. काहीशी मेलोड्रॅमॅटिक. मराठीतील संज्ञाप्रवाहाचं फसलेलं आणि बाद झालेलं रूप पुन्हा इथं दिसतं. मर्ढेकर, वसंत कानेटकर किंवा गंगाधर गाडगीळ यांनी हा प्रयोग यापूर्वी केला होता. पण मुळातच व्यक्तिवादी प्रवृत्तीचं हे रूप मराठी किंवा भारतीय समूहमनाच्या समाजात एकरूप होणारं नव्हतं. या प्रवृत्तीचा जन्मच मुळात एका उद्ध्वस्त, विदीर्ण समाजपरिस्थितीतून झालेला आहे. त्यामुळे एकीकडे समाजमनाचं, सामूहिक मानसिकतेचं मराठी कादंबरीत चित्रण होत असताना 'निळे कमळ' ही व्यक्तिवादी कादंबरी समोर येते. या पार्श्वभूमीवर 'निळे कमळ'चे वाङ्मयीन संचित मात्र बेताचेच वाटते. मुद्दाम वेगळेपणा जाणवावा म्हणून तर कादंबरीकार मुद्दाम या कथेला संज्ञाप्रवाही रूप देत नाही ना अशी शंका येते. एवढे असूनही संज्ञाप्रवाहाच्या पातळीवर 'निळे कमळ' ही 'घर', 'रात्रीचा दिवस' किंवा 'लिलीचे फूल' यांच्यापुढे गेली का ? तर याला केवळ नकारात्मकच उत्तर द्यावे लागेल. शेवटी 'निळे कमळ'ची जमेची बाजू 'एक प्रयत्न' एवढीच सांगता येईल.

भाऊ मांडवकर यांची 'माझी चाळीस भावंडं' ही अनाथालयात वाढलेल्या एका मुलीची भावकथा आहे. अनाथालयात चालणारे गैरप्रकार, पिळवणूक, अधिकारांचा गैरवापर इत्यादींवर ही कादंबरी प्रकाश टाकते. कादंबरीचा विषय तसा नवीन असला तरीही लेखकाचा आवाका मात्र सीमित आहे. एक बऱ्यापैकी कादंबरी यापलीकडे या कादंबरीला अधिक श्रेय देता येत नाही.

'भंडारवाडी' ही बाजीराव पाटील यांची वऱ्हाडी कादंबरी त्या दृष्टीने लक्षणीय आहे. अकोला-वाशीम रस्त्यावरील भंडारवाडी या खेड्याचे चित्रण करणारी ही कादंबरी. आप्पाजी, गोमाजी पाटील, शिवराम तेली, भागीबुढी, फत्तेसिंग पाटील या व्यक्तिरेखांच्या माध्यमातून भंडारवाडीतील हे जनजीवन फुलत जाते; पण 'धग', 'माणूस' नंतर वऱ्हाडचं चित्रण करणारी ही कादंबरी त्या कादंबऱ्यांएवढी महत्ता प्राप्त करू शकली नाही. कारण 'भंडारवाडी'मागची मूळ प्रेरणाच 'बनगरवाडीची' आहे. बाजीराव पाटलांजवळ नेमकी जीवनदृष्टी नसल्यामुळे 'भंडारवाडी'नंतर ते पुन्हा काही लिहू शकले नाहीत.

डॉ. सुभाष सावरकर हे नव्या पिढीतील एक महत्त्वाचे नाव. 'आत्मा', 'व्हायरस',

'आटपाटनगर', 'सूर्यसूक्त', 'आहुती' या सावरकरांच्या प्रसिद्ध कादंबऱ्या. या संपूर्ण कादंबऱ्यांकडे एक दृष्टिक्षेप टाकला असताना निश्चित अशी दृष्टी नसलेला एक कादंबरीकार म्हणून सावरकरांचा निर्देश करावा लागेल. कधी अस्तित्ववाद, अतिअस्तित्ववाद, कधी रूपवाद, कधी विडंबन अशा गोंधळलेल्या प्रकृतीचा हा कादंबरीकार आहे. एकीकडे जन-साहित्याची चळवळ चालवणारा हा लेखक जनसाहित्याच्या संकल्पनेत न बसणारे असे लेखन करीत आहे. डॉ. सावरकर तसे अभ्यासू आहेत. समीक्षक म्हणून त्यांना नावही आहे; पण कादंबरीकार म्हणून त्यांची भूमिकाच डळमळीत आहे. कादंबरी या वाङ्मयप्रकाराकडे त्यांनी तटस्थपणे आणि गंभीरपणे पाहिलं तर ते चांगलं लिहू शकतीलसुद्धा; नाही असं नाही.

अरुण साधू हे नाव विदर्भाशी जन्माच्या संदर्भातच फक्त जोडता येते. बाकी साधूंची संपूर्ण हयातच पश्चिम महाराष्ट्रात गेली. जन्माच्या ऋणानुबंधाने ते वैदर्भीय आहेत. एवढाच अरुण साधूंचा व विदर्भाचा संबंध; पण राजकीय कादंबरीच्या संदर्भात अरुण साधूंचं नाव महत्त्वाचं आहे. योगायोग असा की, जे जन्माने वैदर्भीय नव्हते, पण ज्यांची संपूर्ण हयात विदर्भात गेली अशा ग. त्र्यं. माडखोलकरांनी मराठीत राजकीय कादंबरी रूढ केली, आणि हीच परंपरा जन्माने वैदर्भीय असणाऱ्या अरुण साधूंनी पुढे चालविली. माडखोलकर आणि अरुण साधू यांच्यामध्येच निर्माण झालेली राजकीय कादंबरी एक तर अंशतः राजकीय होती किंवा क्षीण तरी होती. 'सिंहासन' ही या दृष्टीने लक्षणीय कादंबरी. ही कादंबरी मराठी राजकीय कादंबरीचा मापदंड आणि मानदंड ठरणारी कादंबरी ठरावी, इतकी अस्सल आहे.

'आजची राजकीय कादंबरी उद्याची ऐतिहासिक कादंबरी ठरू शकेल काय ?' असाही प्रश्न मधूनमधून विचारला जातो, पण याचे उत्तर नकारात्मकच द्यावे लागेल. कारण ऐतिहासिक कादंबरीकार इतिहास आणि वर्तमानाचा दुवा जोडत असतो. वर्तमानात पाय रोवून त्याला इतिहासात शोध घ्यायचा असतो. आणि म्हणूनच राजकीय कादंबरी भविष्यात ऐतिहासिक वगैरे ठरू शकत नाही.

'सिंहासन' व्यतिरिक्त 'मुंबई दिनांक', 'स्फोट', 'शापित', 'बहिष्कृत' इत्यादी अरुण साधूंच्या कादंबऱ्या प्रसिद्ध आहे. 'बहिष्कृत' ही दलितांच्या प्रश्नावरील कादंबरी तर 'शापित' ही दुष्काळामुळे परवड झालेल्या एका संसाराची कथा. राजकीय विषयाबरोबरच 'अर्बन कल्चर'चेही चित्रण अरुण साधूंच्या अलीकडच्या लेखनातून दिसून येते.

दिनकर देशपांडे यांच्या 'तपझिरा' आणि 'जागली' या दोन प्रसिद्ध कादंबऱ्यांना लक्षणीय कादंबऱ्या म्हणता येईल; तथापि दिनकर देशपांडे बालकांसाठी लेखन करणारे व विनोदी लेखक म्हणूनच प्रसिद्ध आहेत. 'तपझिरा' आणि 'जागली' यामध्ये जवळजवळ पाव शतकाचे अंतर आहे.

शेळके-तल्हार यांच्या पिढीचेच, पण कादंबरीलेखनाकडे अलीकडेच वळलेले समर्थ कादंबरीकार म्हणून डॉ. वसंत वऱ्हाडपांडे, डॉ. मधुकर वाकोडे, मधुकर केचे ही नावे समोर येतात. डॉ. वऱ्हाडपांडे समीक्षक, कथाकार. डॉ. वाकोडे लोकसाहित्याचे अभ्यासक आणि केचे

कवी व विनोदी लेखक म्हणून सुपरिचित आहेतच.

'चित्रशाळा' ही डॉ. वऱ्हाडपांडे यांची कादंबरी. एका निवृत्त प्राध्यापकाच्या जीवनाची ही चित्रशाळा. या कादंबरीला एकसूत्री अशी कथा नाहीच. तर कथानायकाच्या अंतर्मनातील संवादी-विरोधी आंदोलनांच्या आणि जीवनाच्या दैनंदिन घटनांमधून कादंबरीकार ही कादंबरी उभी करतो. काहीशी आत्मप्रत्ययी स्वरूपाची. एक चांगली कादंबरी म्हणून ही उल्लेखनीय अशी कादंबरी. लेखकाच्या चिंतनशील व्यक्तिमत्त्वाचे दर्शन प्रस्तुत कादंबरीतून समर्थपणे घडते.

मधुकर केचे यांची 'मोती ज्याच्या पोटी' ही तुकडोजी महाराजांच्या आई-वडिलांच्या जीवनावरील चरित्रात्मक कादंबरी. या कादंबरीलेखनामागे मुख्य प्रेरणा श्रद्धेची असली तरीही कलाकृती म्हणून केचे या कादंबरीला पूर्णपणे न्याय देतात, ही जमेची बाजू; पण 'मोती ज्याच्या पोटी'चा विपय चरित्रकादंबरीचा विपय कितपत होऊ शकेल हा वादाचा मुद्दा आहे.

'झेलझपाट' ही मधुकर वाकोडे यांची समर्थ कादंबरी. मेळघाट परिसरातील कोरकू आदिवासींच्या जीवनावरील ही कादंबरी तिथल्या जीवनदर्शनाबरोबर त्या जीवनातील अंतर्बाह्य बदल अधिक सूक्ष्मपणे आणि मनःपूर्वकतेने टिपते. ज्या समाजात बदलत्या मूल्यांचा वारासुद्धा पोहोचला नाही, अशा समाजाचे एक निश्चित भूमिकेतून चित्रण करणे कठीण असते. पण ललित कलाकृती ही मानवी जीवनाचे प्रतिबिंब नसून मानवी जीवनाचा अर्थ, प्रयोजन शोधणारी, निश्चित करणारी वाट असते. काव्यात्मक अंगाने ही कादंबरी खुलत जाते. एक 'ऑब्झर्व्हर' म्हणून कादंबरीकाराची भूमिका इथे अधिक महत्त्वाची वाटते. ज्या जीवनाचे मराठी कादंबरी विश्वात इतक्या तन्मयतेने दर्शन घडले नव्हते, ते दर्शन 'झेलझपाट'ने घडविले, हे वाकोडेंचे श्रेय निश्चितच नमूद करण्याजोगे आहे.

वैदर्भीय कादंबरीकारांमध्ये अस्तित्ववादाची कास धरून लिहिणारे कादंबरीकार म्हणून वसंत आबाजी डहाके ख्यातनाम आहेत. मुळात प्रकृतीने डहाके कवी. 'अधोलोक' आणि 'मर्त्य व प्रतिबद्ध' या त्यांच्या कादंबऱ्या प्रकाशित आहेत. विदर्भात राहून कादंबरीलेखन करणाऱ्या डहाकेंनी सार्त्र किंवा कामू यांच्याप्रमाणे जीवनातील कोणती भीपणता अनुभवली आणि कोणत्या अनुभवाचा परिपाक म्हणून त्यांच्या कादंबऱ्या जन्माला आल्यात? डहाकेंचे कादंबरीलेखन हा अस्तित्ववादी लाटेचा परिणाम वाटू लागतो. जीवनातील दृश्य, गोचर प्रश्नांना सामोरे न जाता अंतर्गत मनाचा अदृश्य शक्तीशी केवळ शाब्दिक खेळ खेळण्यापलीकडे हे लेखन जाते असे वाटत नाही.

नव्या पिढीचे विदर्भातील कादंबरीकार म्हणून बाबाराव मुसळे, रवीन्द्र शोभणे, पुरुषोत्तम बोरकर ही नावे समोर येतात. बाबाराव मुसळेंची 'हल्या हल्या दुधू दे' ही अकोला-वाशीम-परिसरातील एका शेतकऱ्याच्या कुटुंबाची शोकांतिका. बाबाराव मुसळे हे तसे दमदार कथाकार. बाह्य जगताकडे जाणीवपूर्वक पाहण्याची दृष्टी त्यांना आहे आणि या

सजगतेतूनच 'हल्या हल्या दुधू दे'चा जन्म झाला आहे; पण यां ठिकाणी लेखकाची एक गफलत झाली आहे. एकाच घरात जगातील सर्व दुःख साठवून लेखकाने आपल्या मानसपुत्रांचे उदात्तीकरण केले आहे. त्यामुळे या कादंबरीतील मूळ दुःखाची धारच कमी- वाटते. सांगण्यासारखे सगळे एकाच कलाकृतीत कोंबल्यामुळे ही कादंबरी फसली. तथापि नवीन कलाकृतीची अपेक्षा बाबाराव मुसळेंनी या निमित्ताने वाचकांच्या मनात निर्माण केली हे मात्र नाकारता येत नाही.

'प्रवाह' आणि 'रक्तध्रुव' (पुढारी : दिवाळी ८६) ह्या रवींद्र शोभणेंच्या दोन कादंबऱ्या. कथा, नाटक, समीक्षा, कादंबरी, ललितलेखन इत्यादी वाङ्मयप्रकार समर्थपणे हाताळणारा हा लेखक कादंबरीकार म्हणूनच सरस वाटतो. शोभणेंच्या कादंबरी-लेखनात पुरेपूर सामाजिक भान दिसून येते. मानवी जीवनातील नीती-अनीतीच्या चक्रव्यूहात भरकटलेल्या एक स्त्रीच्या जीवनाची वाताहत मांडून लेखक समाजातील वेगळ्या अंगावर प्रकाश टाकतो. या कादंबरीत विचारांचा पक्वपणा असला तरीही कलाकृती म्हणून 'प्रवाह' ही बरीचशी फसलेली कादंबरी वाटते. त्या दृष्टीने 'रक्तध्रुव' ही शोभणेंची दुसरी कादंबरी अधिक सरस व सकस वाटते. मानवी जीवनातील मातृत्वाचा वेगळा आयाम घेऊन ग्रामीण मुस्लीम जीवनाचे अतिशय प्रत्ययकारी चित्रण करण्यात लेखक यशस्वी झाला आहे. आशय आणि रचनाबंध या दोहोंच्याही दृष्टीने एक समर्थ कलाकृती म्हणून 'रक्तध्रुव'चा उल्लेख करावा लागेल.

पुरुषोत्तम बोरकर हे या पिढीतील आणखी एक समर्थ नाव. 'मेड इन इंडिया' या कादंबरीने ते प्रकाशात आले. स्वातंत्र्यानंतर ग्रामीण जीवनात घडून आलेले संक्रमण आणि त्या संक्रमणाने ग्रामीणत्व हरवलेले खेड्याचे जीवन लेखक या कादंबरीतून टिपतो. लेखकाची शैली ही तिरकस, विडंबनात्मक स्वरूपाची आहे. पण वरवर दिसणाऱ्या या शैलीच्या मुळाशी दुःखाचा, करुणेचा, अंतर्मुखतेचा एक सलग असा प्रवाह असल्याचे जाणवते. ही शैली म्हणून ठीक आहे; पण समग्र जीवनाचेच आकलन करायला मात्र ही शैली खूप मर्यादा घेऊन येते हे पुढच्या कलाकृतीच्या संदर्भात लेखकाने लक्षात घ्यावे असे वाटते.

आशा बगे, आशा सावदेकर, शुभांगी भडभडे, इंदुमती शेवडे या काही स्त्री कादंबरीकार म्हणून मराठी वाचकांसमोर आहेत. यातील आशा बगेंचे अनुभवविश्व अतिशय मर्यादित स्वरूपाचे आहे. हे मर्यादित अनुभवविश्व त्यांच्या कथेत जेवढ्या जोरकसपणे उभे राहते, तेवढे 'भूमिका' किंवा 'मनस्विनी' यांमध्ये मात्र उभे राहत नाही. इंदुमती शेवडे यांची 'कथा एका शायराची' ही चरित्रवजा कादंबरी सोडली तर त्या कथाकार म्हणूनच अधिक 'अपिल' होतात. डॉ. आशा सावदेकर यांची 'मी तुळस तुझ्या अंगणी' ही कादंबरी पाहिली म्हणजे आशाबाईंमधील समीक्षिका, विचारवंत हीच बाजू अधिक महत्त्वाची वाटते. कादंबरीलेखन हा त्यांच्या बाबतीत एक योगायोग किंवा अपघात वाटू लागतो. मराठी कादंबरीचं 'कल्याण' करायला निघालेल्या ज्या कादंबरीकार आहेत, त्यांत शुभांगी भडभडे यांचं नाव घेता येईल. मराठी वाचकाला कचकड्याच्या विश्वापलीकडे ही कादंबरीकार आणखी काही देणार नाहीच.











१९६० ते १९८८-८९ या उण्यापुऱ्या तीन दशकांतील विदर्भातील कादंबरीचे अशा प्रकारे परिशीलन करताना आणि मराठी कादंबरीच्या इतिहासात या कादंबरीचे स्थान शोधताना काही महत्त्वाचे प्रश्न उद्‌भवतात. ह्या प्रश्नांचा मागोवा घेतल्याशिवाय या कादंबरीचे परिशीलन पूर्ण होणार नाही.

ऐतिहासिक कादंबरीचा विचार केला तर 'सत्तावनचा सेनानी' नंतर विदर्भात ऐतिहासिक कादंबरी लिहिली गेलेली नाही किंवा पौराणिक कादंबरीच्या संदर्भातसुद्धा हेच विधान करावे लागते. पश्चिम महाराष्ट्रात जसे ना.सं.इनामदार, रणजित देसाई, विश्वास पाटील, शिवाजी सावंत, शरद दळवी ही नावे ऐतिहासिक किंवा पौराणिक कादंबऱ्यांच्या संदर्भात दिसून येतात, तशी नावे इकडे दिसून येत नाहीत. यामागची कारणपरंपरा काय? किंवा योगेन्द्र मेश्राम यांची 'माझं गाव कुठाय?' ही एकमेव दलित कादंबरी सोडली तर दलित कादंबरीच्या बाबतीतही तीच परिस्थिती दिसून येते. (दलित आत्मकथनांच्या बाबतीतही हीच बाब दिसून येते.) राजकीय विषयावरही विदर्भात कादंबऱ्या लिहिल्या जात नाहीत. थोडक्यात आर्थिक, सामाजिक, राजकीय क्षेत्रांतील बदलांचे व त्याचे सर्वसामान्यांच्या जीवनाशी असलेल्या नातेसंबंधाचे चित्रण वैदर्भीय कादंबरीच्या संदर्भात विचार केला तर स्पष्टपणे अजूनही उमटलेले नाही. वऱ्हाडी कादंबऱ्यांचा विचार करताना 'धग' किंवा 'माणूस' नंतर ठोसपणे कुठल्या कलाकृतीचा उल्लेखच करता येत नाही. वैदर्भीय जीवनाचे सर्वव्यापी आणि सर्वस्पर्शी दर्शन घडविणारी कादंबरी 'माणूस' आणि 'धग' सोडली, तर गेल्या पाव शतकातसुद्धा निर्माण होऊ नये ही खंत आहे.

(रवीन्द्र के. शोभणे २७६, छत्रपती नगर, नागपूर)

---

## नवे आजीव सदस्य

*(दि. २९-६-९० अखेर)*

विनयकुमार दिगंबर कुलकर्णी (मुंबई); स. रा. गाडगीळ (नांदेड); इंद्रजित नारायण भालेराव (परभणी); सौ. कल्पना अशोक अग्रवाल (भुसावळ); नंदकुमार काशिनाथ कुलथे (नाशिक); मा. रं. कुलकर्णी (चेंबूर); राजेश कांबळे (येवला); शरद गायकवाड (येवला); दिलीप नरहरराव महाजन (डोंबिवली); दत्ताजी गोडाजी गायकवाड (कोकणगाव); हरिश डाह्याभाई पटेल (लासलगाव); रामेश्वर श्रीकिशन राठी (लासलगाव); प्रकाश आनंदराम भट्टड (लासलगाव); किशोर माधवराव क्षीरसागर (लासलगाव); अंजनेय धनंजय ढवळे (भटवाडी, गिरगाव); वामन देशपांडे (मुंबई); खंडेराव जयराम पाटील (साक्री); श्रीधरराव गंगाधरराव सातपुते (परभणी); सदाशिव दत्तात्रय कदम (श्रीगोंदा, अहमदनगर); अरविंद बाजी (ठाणे); शोभा सुभेदार (ठाणे); कृष्णाजी गोविंद चिंचाळकर (भिवंडी); भास्कर धोंडिबा खांड्गे (अकोले); शरद दळवी (पणजी गोवा); प्रकाश भातंब्रेकर (मुंबई); अनंत प्रभाकर सामंत (बोरिवली); इंदिरा संत (आदर्शनगर बेळगाव)



अनुक्रमणिका







# वैदर्भीय कविता

## समृद्ध, वैविध्य व वैचित्र्य

डॉ. अक्षयकुमार काळे

विदर्भ ही सकस कवींची भूमी आहे. या भूमीने आधुनिक कालखंडात सतत केवळ विदर्भालाच नव्हे, तर संपूर्ण महाराष्ट्राला ललामभूत ठरणाऱ्या कवींची निर्मिती केली आहे. प्रत्येक वळणावर बी, ना.घ. देशपांडे, अनिल, मुक्तिबोध, ग्रेस इत्यादी कवींनी संपूर्ण मराठी कवितेला आपल्या असाधारण प्रतिभाबळाने समृद्ध केले आहे. एकूणचं मराठी कवितेची प्रकृती आणि प्रवृत्ती या कवींच्या अभ्यासाशिवाय समजणे अशक्य आहे.

विदर्भातील आधुनिक मराठी कवितेची सुरुवात श्रीपाद कृष्ण कोल्हटकर व कविवर्य 'बी' यांच्या कवितेने झाली असली तरी श्रीपाद कृष्णांचे खरे कर्तृत्व त्यांच्या गद्य साहित्यनिर्मितीतूनच दिसून येते. 'गीतोपायन' या त्यांच्या एकमात्र काव्यसंग्रहात असलेल्या सोळा कवितांमध्ये लक्षणीय कविता नसली, तरी श्रीपाद कृष्णांच्या महाराष्ट्र गीतामुळे वैदर्भीय कवितेमध्ये मोलाची भर घातलेली आहे. प्रस्तुत गीतातील महाराष्ट्राच्या उज्ज्वल इतिहासाचे आणि सामर्थ्याचे भावनांना हात घालणारे वर्णन केवळ अपूर्व आहे.

वी हे केशवसुत परंपरेतील महत्त्वाचे कवी होत. तत्त्वज्ञान हाच बींच्या काव्याचा आधार आहे. त्याच्या प्रकाशात स्वतःतल्या अपूर्व वस्तुनिर्मात्याकडे निरखून पाहिले तेव्हा अंतर्मुखतेत घोळलेल्या काव्य-जाणिवेला मूर्त रूप मिळाले व कवीच्या सामर्थ्याचा, कर्तृत्वाचा आणि कर्तव्याचा अदमास घेता आला. जेव्हा या प्रकाशात त्यांनी अंतरात्म्याचे रूप पाहण्याचा प्रयत्न केला, तेव्हा गूढगुंजनात रममाण होऊन अनंताची प्रदक्षिणा करीत प्रकाशाची दारे त्यांनी शोधिली. त्यांची जाणीव तेव्हा बहिर्मुख झाली तेव्हा प्रचारकाचा धोका पत्करून सामाजिक प्रगतीचा संबंध वैश्विक प्रगतीशी जोडून कवीमध्ये अभिप्रेत असलेल्या युगीन प्रेपिताची भूमिका त्यांनी पार पाडली.

बींचे तत्त्वज्ञान परिपूर्ण आहे. त्यांच्या तत्त्वज्ञानाची जाणीव मूलतः वैश्विक आहे. राष्ट्राचा वा समाजाचा विचार करताना त्यांच्या प्रतिभेला काही अंगभूत मर्यादा पडतात. परंतु जेव्हा ही वंधने टाळून त्यांची कविता वैश्विकतेकडे झेप घेते, तेव्हा सर्व मर्यादा उल्लंघण्याचे सामर्थ्य तिच्या ठिकाणी निर्माण होते.

आधुनिक मराठी कवितेच्या प्रारंभ काळातच एकूण मराठी कवितेचा वैचारिक सूर पारंपरिक भारतीय तत्त्वज्ञान आणि साहित्यशास्त्र यांच्या प्रकाशात समृद्ध करण्याचे कार्य 'बीं'च्या कवितेने आपली अभिजात शैली न सोडता घडवून आणले. केशवसुतांच्या परंपरेतच कविता निर्माण करीत असताना देखील, केशवसुतांच्या आंधळ्या अनुनयात न गुंतता आपल्या










आशावादी तत्त्वज्ञानाने जीवनाच्या ल्हादैकमय स्वरूपाच्या जाणिवेमुळे व अभिजात सौंदर्यप्रकटीकरणामुळे केशवसुतांपेक्षा वेगळे व स्वतंत्र अस्तित्व निर्माण केले.

बी आणि श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्यानंतर विदर्भात आनंद कृष्णाजी टेकाडे, ना.के. बेहेरे, श्री.रा. बोवडे, ज.के. उपाध्ये, ब.ग. खापर्डे, गु.ह. देशपांडे इत्यादी कवींनी वैदर्भीय कवितेत महत्त्वाची भर टाकली. आनंद कृष्णाजी टेकाडे यांच्या काव्यातील ओजस्वी राष्ट्र भक्ति, ज.के. उपाध्येंची विडंवनगीते, ब.ग. खापर्डे यांची गद्यगीते आणि गु.ह. देशपांडे यांची गूढगीते यांनी केवळ वैदर्भीय कवितेतच नव्हे, तर एकूण मराठी कवितेत आपला स्वतःचा ठसा उमटवला आहे. आधुनिक मराठी गद्यकाव्याचे आद्य प्रवर्तक म्हणून कविभूषण ब.ग. खापर्डे यांचे स्थान वादातीत आहे.

**वैदर्भीय कवितेचा दुसरा टप्पा :**

या पिढीनंतर वा.ना. देशपांडे, या.मु. पाठक, भ.श्री. पंडित, वि.भि. कोलते यांनी आपले कवितालेखन केले. केशवसुतानंतर वृत्तरचनेत विविध प्रयोग करण्याचे श्रेय वा.ना. देशपांडे यांचेच. मुक्तछंदाचे प्रवर्तन करण्याचे श्रेय अनिलांइतकेच वा.ना. देशपांडे यांनाही देणे आवश्यक आहे. वैचारिकता हा त्यांच्या कवितेचा लक्षणीय विशेष आहे. नाट्यकाव्यनिर्मितीचे आद्य प्रवर्तकत्व त्यांच्या 'कपटवेशं', 'आदिनारी', 'विचारांचे बंड', 'स्वप्नदृश्य' या नाट्यकाव्यामुळे त्यांना लाभले. मराठी कथाकाव्याच्या परंपरेतही त्यांनी मोलाची भर घातलेली आहे.

या.मु. पाठक हे वस्तुतः विपुल लेखन करणारे कवी असले, तरी गेल्यां पन्नास वर्षांत त्यांनी केलेले कवितालेखन दुर्दैवाने अप्रकाशित आहे. असे असले तरी त्यांच्या 'शशिमोहन' या सामाजिक खंडकाव्यामुळे मराठी काव्यक्षेत्रातील त्यांची कीर्ती चिरस्थायी आहे.

ना.घ. देशपांडे हे या दरम्यानचे मराठीतील महत्त्वाचे गीतकार आहेत. निसर्ग आणि प्रेम यांचे विलक्षण आकर्षण ना.घं.च्या प्रतिभेला आहे. विलक्षण प्रेमानुभूती त्यांच्या प्रेमकवितेचा कणा आहे. त्यामुळे त्यांची कविता आत्मपर झाली आहे. सामाजिक बंधने टाळून या चिरंतन, त्रिकालधारिणी व अनंतरूपिणी प्रीतीचा साक्षात्कार करून घेणे त्यांच्या काव्याचे महत्त्वाचे प्रयोजन आहे. लावणी-वाङ्मयाच्या घट्ट संस्काराने त्यांच्या प्रेमगीतांना वैशिष्ट्यपूर्ण आकार मिळाला असला तरी लावणीतील कामवासनेच्या उत्तान दिग्दर्शनाकडे ना.घं.चा कल नाही. ना.घं.ची बौद्धिक आणि भावनिक पातळी जात्याच उन्नत आणि सुसंस्कृत असल्यामुळे लावणीत हटकून येणारी उत्तानता ना.घं.च्या कवितेत हटकून टळली आहे.

'शीळ', 'अभिसार' आणि 'खूणगाठी' या तीनही काव्यसंग्रहांत प्रेमकविताच अधिक असल्या तरी त्यातही संक्रमणाच्या खुणा आहेत. अर्थात ना. घं.चा पिंड मात्र एकात्म आहे. प्रारंभी असलेल्या कवितेतील उल्हास आणि आनंद जाऊन विषण्णतेची जाणीव पुढील कवितांत प्रकर्षाने प्रकटली आहे. स्फुट कवितेबरोबरच 'निश्वास गीतावली', 'जुईची कळी',



अनुक्रमणिका






'गिरिजेचा संसार', 'कंचनीचा महाल' इत्यादी दीर्घ कवितांनी मराठी दीर्घ कवितेच्या प्रागंणात ना. घं. नी मोलाची भर घातली आहे. एक प्रेमयोगी गीतकार म्हणून मराठी काव्यात ना. घं.चे स्थान केवळ असाधारण आहे.

**वैदर्भीय कवितेचा तिसरा टप्पा : अनिल व मुक्तिबोध :**

उपरिनिर्दिष्ट कवींच्या आधी जन्मूनही नव्या काळाचे आव्हान स्वीकारणारी कविता लिहिण्याचा मान अनिलांकडे जातो. समकाल आणि भावी काळ यांच्याशी सहकंप पावण्याची विलक्षण क्षमता अनिलांमध्ये होती. आधुनिक मराठी कविता ज्या व्यवच्छेदक लक्षणांसहित ओळखली जाते, त्यांतील काहींच्या निर्मितीचे व काहींना उजाळा देण्याचे महान कर्तृत्व करणाऱ्या कवींपैकी अनिल एक आहेत. मुळात अनिक एक भावसंपन्न कवी आहेत. या संपन्नतेतून अनिलांची आत्मनिष्ठायुक्त प्रेमकविता उमलली. प्रेम आणि निसर्ग यांच्या समृद्ध विकसित परिमाणांबरोबरच अनिलांना असलेल्या सामाजिकतेच्या परिमाणामुळे अनिलांच्या कवितेचा स्तर व्यापक झाला. त्यांची सामाजिक प्रेरणा धगधगती नसली तरी सामाजिक काव्याविष्कारामुळे पुढील सामाजिक आणि वैचारिक कवितेला निश्चितच वळ मिळाले.

आधुनिक मराठी काव्यातील मुक्तछंदाच्या प्रवर्तनाचा आणि आपल्या टीकाकारांशी सतत दोन हात करीत त्याचे संवर्धन करण्याचा मान अनिलांचाच. मुक्तछंद आणि दशपदी यांचे प्रवर्तक व संपन्न भावकवी म्हणून अनिलांचे नाव एकूण मराठी काव्यात चिरस्थायी झाले आहे. रविकिरण मंडळाच्या सामान्य विषयांभोवती घोटाळणाऱ्या कवितेला केशवसुती संप्रदायाइतकी ताकद परत प्राप्त करून देण्याचा अनिलांचा प्रयत्न होता. यातच त्यांच्या कर्तृत्वाचे सार साठवले आहे.

अनिलांच्या या कवितेमुळे शरच्चंद्र मुक्तिबोधांना अधिक ताकदीने आपली स्वंयपूर्ण कविता लिहिता आली. अनिलांना दुरून मोहक वाटलेले तत्त्वज्ञान मुक्तिबोधांच्या जीवननिष्ठेचा विषय झाले व मराठी काव्यात खऱ्या अर्थाने 'सूर्ययुगा'ची सुरुवात मुक्तिबोधांनी केली. एक संपूर्ण जीवनदर्शन म्हणून मार्क्सवादाचा स्वीकार त्यांनी केला. परंतु हा स्वीकार आंधळा नव्हता. म्हणूनच क्रांतिसन्मुख कवितेबरोबरच आपल्या भावसंवेदनांनी आविष्कृत करणारी कविता त्यांनी लिहिली. साम्यवादी क्रांतीचे स्वागत करणारी आणि भावनेच्या एकतानतेने रसरसलेली मुक्तिबोधांची कविता अखेरपर्यंत आपल्या वैचारिक भूमिकेशी एकनिष्ठ राहिली आहे. निराशावादावर कडाडून चढविलेला हल्ला, नवनवोन्मेष दाखविणारी आशावादी वृत्ती, मार्क्सवादी तत्त्वज्ञानाचा सुदृढपणे केलेला आश्रय व आपल्या इतर कोमल भावनांचा आणि अनुभूतींचा त्यांनी कधीही न दिलेला बळी इत्यादी वैशिष्ट्यांनी मर्ढेकरांच्या वैफल्यग्रस्त परंपरेपेक्षा दूर हटून आणि नेटाने, वैचारिक विरोध दर्शवून आपले स्वतंत्र अस्तित्व त्यांनी निर्माण केले. मराठी कवितेचा आत्यंतिक निराशावादाकडे झुकणारा डोलारा सावरण्याची ऐतिहासिक जवाबदारी आपल्या कवितेच्या सहाय्याने पार पाडली.



अनुक्रमणिका






**वैदर्भीय कवितेचा चौथा टप्पा :**

वस्तुतः अनिल, मुक्तिबोध इत्यादी बलदंड कवींच्या अस्तित्वाने पुढील वैदर्भीय कवींना निर्मितीचे असाधारण बळ मिळणे सहज शक्य होते. परंतु या नंतरच्या कालखंडात वैदर्भीय कवितेला ओहोटी लागल्याचे दिसून येते. मर्ढेकरांचा अध्यात्मशरण वैफल्यवाद आणि अनिल-मुक्तिबोधांचा साम्यवादाशी जवळीक साधणारा आशावाद यांच्याशी सरसकटपणे नाते न जुळविता आपल्या संवेदनांना कलारूप देण्याचे कार्य अनिल मुक्तिबोधानंतरच्या पिढीने केले.वामन इंगळे या एकाच कवीचा या दृष्टीने अपवाद. देशातील भांडवलशाहीचा विकास आणि सामान्य माणसाची परवड या द्वंद्वात्मक जाणिवेतून त्यांची बहुसंख्य कविता स्फुरलेली आहे. परंतु अभिव्यक्तीच्या ढिसाळपणामुळे त्यांना फारसे श्रेय मात्र लाभले नाही.

या कालखंडातील कवींमध्ये मधुकर केचे आपल्या ओवी-अभंगातील प्रयोगशील वेगळेपणामुळे उठून दिसतात. केच्यांच्या तीनही काव्यसंग्रहांतून त्यांच्या मनातील अध्यात्मओढीची प्रचीती येते. परंपरेवरील श्रद्धा व नावीन्याची आस हे त्यांच्या मनःपिंडांचे लक्षणीय वैशिष्ट्य आहे. परंपरागत विचारांचा पगडा अधिक असल्यामुळे संतकाव्याचे पडसाद त्यांच्या काव्यातून सतत जाणवतात. त्यात अनुकरणशीलता अधिक आहे. तुकारामाने प्रकट केलेल्या सगुण-निर्गुणाविषयीच्या छटा, आत्म्याच्या अंधकाराविषयीची तगमग, मीलनेच्छा, हुरहूर इत्यादी आध्यात्मिक टप्प्यांचा भास केच्यांच्या काव्यात होत असला तरी त्यातील आत्मानुभवाचे बळ अगदीच तोकडे आहे. त्याच त्या विचारांच्या छटा पुनःपुन्हा त्यांच्या काव्यसंग्रहांतून आवर्तित झाल्याने पुढेपुढे या आध्यात्मिक ओढीचे प्रकटीकरणही शिथिल झाले आहे.

सुरेश भट अलीकडच्या काळातील महत्त्वाचे गीतकार आहेत. या गीतांचे कवितामूल्य हरवू नये यासाठी ते जागरूक राहिलेले दिसतात. प्रेमसंवेदनेचे विलक्षण आकर्षण आणि त्याचे तरल पातळीवरील प्रकटीकरण हा भटांच्या कवितांचा आकर्षण विशेष आहे. प्रेमातील मुग्धता, शृंगार, निराशा, साफल्य इत्यादी भावांचे दर्शन त्यांच्या कवितेत घडत असले तरी त्यात फारशी व्यक्तिविशिष्टता नाही; परंतु वैयक्तिक जीवनातील अपेक्षा, मानखंडना इत्यादींचे दर्शन घडविणाऱ्या 'रंग माझा वेगळा'मधील कवितेमध्ये त्यांना आलेली अनुभूती आपल्या पूर्ण सामर्थ्यासह तिच्या मूळ स्वरूपात प्रकट झाली आहे.

सुरेश भटांना कमालीची रसिकप्रियता लाभली ती त्यांच्या गझल निर्मितीमुळे. माधव जूलियन यांनी मराठी काव्यात लावलेल्या गझल रोपट्याचा वेल ज्या काही मोजक्या कवींच्या निमित्ताने गगनावर गेला, त्यात सर्वाधिक श्रेय सुरेश भटांचे आहे. विशिष्ट काव्यप्रकार म्हणून विस्मृतप्राय होऊ पाहणाऱ्या मराठी गझलेचा जीर्णोद्धार त्यांनी केला. त्याचप्रमाणे अलीकडच्या काळात केवळ दुय्यम प्रतीच्या कवींनीच हा प्रकार हाताळावयाचा हा काव्य-प्रांतातील भ्रम त्यांनी दूर केला. जणू मराठी गझलेची घसरू पाहणारी प्रत त्यांनी सावरली आणि तिला प्रतिष्ठा

प्राप्त करून दिली. उर्दू गझलेच्या बांधणीतील सर्व वैशिष्ट्ये जशीच्या तशी आत्मसात करून आपल्या वाङ्मयीन कार्यशाळांसहित शेकडो अनुयायांच्या गझल निर्मितीने गझल काव्यप्रकाराला स्थिरत्व प्राप्त करून देणाायचा निकराचा प्रयत्न या दशकात भटांनी केल्याचे दिसून येते.

राम शेवाळकर हे भट व मधुकर केचे यांचे समकालीन. 'रेघा' आणि 'असोशी' या काव्यसंग्रहांत समाविष्ट करण्यात आलेल्या त्यांच्या कवितांत प्रेमसुलभ वृत्तीचा आविष्कार त्यांनी केलेला दिसून येतो. निसर्गाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोणही निर्व्याज, अतएव मधुर आहे. कवितालेखनाचा ध्यास मध्येच सोडल्यामुळे बोरकर-पाडगावकर परंपरेमध्ये बसू शकणारी शेवाळकरांची कविता आज विस्मृतप्राय झाली आहे.

अलीकडच्या समकालीन वैदर्भीय कवींमध्ये श्रीधर शनवारे यांनी जाणीवपूर्वक आपले वेगळे स्थान निर्माण केलेले आहे. निसर्गाच्या गाढ आकर्षणाबरोबरच भावसुकोमल वृत्तीशी समरस होऊन रेखाटलेली अनंत चित्रे, प्रारंभीच्या काही कवितांतून दिसत असली तरी, या प्रारंभीच्या टप्प्यावरच ते रेंगाळलेले दिसत नाहीत; तर त्यांनी पुढे झेप घेतलेली दिसून येते. या टप्प्यापासूनच त्यांची कविता वैचारिकतेकडे आणि आध्यात्मिकतेकडे वळलेली दिसते. ईश्वरी सत्तेशी संवाद हे त्यांच्या अनुभूतीचे प्रमुख केंद्र आहे. या संवादातूनच व्यक्तिगत अपूर्णतेची खंत त्यांच्या मनाला बोचते.

सतत मृत्यूची जाणीव आणि संचितहीनतेचे दुःख अशा दुहेरी काचात कवीच्या मनाची फरफट होताना दिसते. काळाच्या विशाल आणि विक्राळ चक्रापुढे एका पराभूत आणि पराधीन झालेल्या आत्म्याची गुंतवळ शनवाऱ्यांच्या मनाला ग्रासून टाकते. अज्ञेयवाद आणि दैववाद स्वीकारलेल्या व्यक्तिमत्त्वावर वास्तव छाया आपले स्वामित्व गाजवते. या अपूर्णतेवर मात करण्याचा, आपले अस्तित्व विशाल आणि व्यापक करण्याचा प्रयत्न त्यांचे मन करीत आहे, याचा प्रत्यय येतो. परंतु त्यांच्या कवितेत प्रयत्नपूर्तीच्या खुणा नाहीत, तर या वाटचालीतील खाचखळग्यात वाट्याला आलेले जखमीपण रेखल्याच्या खुणा आहेत.

अलीकडच्या काही कवितांमधून निसर्ग-रूपकांच्या माध्यमातून समाजवास्तवाचा वेध घेण्याचा प्रयत्न करताना ते दिसून येतात. परंतु अलिप्त जाणिवेच्या पातळीवर मनाचा वावर असल्यामुळे, तीव्रतेच्या अभावी ते वाचकांना वास्तव प्रत्ययापर्यंत नेऊ शकत नाहीत. शनवाऱ्यांच्या कल्पनात्मक प्रतिक्रियांमध्ये असलेली सहानुभूती, विचारशीलता आणि प्रामाणिकपणा यामुळे, अलीकडील चिंतनशील आणि वैचारिक कवितेतील खंडित झालेले दुवे सांधून घेण्याचे श्रेय त्यांच्या कवितेने प्राप्त केले आहे, हे मात्र इथे लक्षात घेण्यासारखे आहे.

श्रीधर शनवाऱ्यांप्रमाणेच तुळशीराम काजे यांनीदेखील आपल्या कवितेने वैदर्भीय कवितेत वेगळा ठसा उमटविला आहे. त्यांची प्रारंभीची कविता प्रेम आणि निसर्ग यांच्या अनुभूतीचे क्षण संवेद्य करू पाहणारी असली तरी पुढे त्यांच्या प्रेरणा बदललेल्या दिसतात.

समाजजीवनातील विसंगती, दांभिक व्यक्तिजीवने, शोषणाचा आकार असणाऱ्या व्यवस्थेत सामान्य माणसाच्यां जीवनाची चाललेली परवड इत्यादींनी ग्रासलेली जीवनावस्था पाहून, गलबलून गेलेले मन उपहासाचा आश्रय घेऊन, आपली ही बदललेली जाणीव व्यक्त करताना दिसते. जीवनातील अर्थहीनता व्यक्त करताना तिने बऱ्याच ठिकाणी मर्ढेकरी पद्धतीचा आश्रय घेतल्याचे जाणवते. अर्थात मर्ढेकरी प्रभावाखाली काव्यांची चिंतनशीलता दबून गेली नाही. तिने आपल्या पद्धतीने जीवनातील चित्रविचित्र प्रवृत्तींना प्रच्छन्न आकार-विकारांना सामोरे जाण्याचा प्रयत्न केला आहे. विशिष्ट वैचारिक भूमिका त्यांनी स्वीकारल्याचे दिसत नाही. तसाही त्यांच्या जीवनाचा परीघ फारसा व्यापक नसल्यामुळे अपेक्षित असणाऱ्या 'नव्या युगाचे अनुभवनिष्ठ अनन्यसाधारणरूप अभिव्यक्त' करण्याच्या प्रक्रियेमध्ये त्यांना फारसे यश आल्याचे दिसत नाही.

**ग्रेस : विदर्भभूमीचे धूसर स्वप्नशिल्प**

ग्रेस हे विदर्भाच्या मातीत उगवलेले अनोखे फूल आहे. समकालीनांपेक्षा त्यांच्या अभिव्यक्तीची पद्धत पृथगात्म आहे. नागाला बेभान करणारा पुंगीचा नाद असावा तसा स्वर ग्रेसच्या कवितेला लाभला आहे. गूढ, गहन, गंभीर प्रदेशाचे अमूर्त वातावरण त्यांच्या कवितेला सतत वेढून असते. पुष्कळदा त्या स्वरांचा अर्थ कळत नाही पण ते झपाटून टाकतात. सांस्कृतिक संचितातून बळ घेण्याची व ते प्रकट करण्याची इतकी विलक्षण क्षमता त्यांच्यात आहे की, ते संस्कार जपणाऱ्या मनाला ती सहजच कवेत घेते व कायमचे बद्ध करते.

रूढार्थाने कुठल्याही प्रवृत्तिप्रवाहात ग्रेसची कविता बसत नाही. तिची निर्मितिप्रक्रियाच मुळी संपूर्ण वेगळी आणि नेणिवप्रधान आहे. कार्यकारणभावाच्या संदर्भात मर्ढेकरी बुद्धीचा अंकुश जसा त्यांच्या रचनेवर असतो तसा ग्रेसच्या रचनेवर नाही. त्यामुळे त्यांची कविता दुर्बोधतेकडे अधिक झुकली. उपलब्ध भाषेची शक्ती किंवा मांडणीचा प्रकार त्यांच्या अभिव्यक्तीसाठी तोकडा पडतो, म्हणून कराव्या लागणाऱ्या पुनर्घटनेतून दुर्बोधता निर्माण होते. त्याचप्रमाणे जाणिवेच्या एकाच वर्तुळात ग्रेस उभे असताना ते दुसऱ्या वर्तुळात केव्हा शिरतात ते त्यांनाही कळत नाही. वाचकाला असे सरकणे शक्य नसते व परिणामी दुर्बोधतेच्या गजावर आदळून तो रक्तबंबाळ होतो.

त्यांच्या कवितेत एकांतप्रियतेला, संध्याकाळशी संवादी असणाऱ्या वेदनास्वराला, मृत्युबोधाला आणि सुप्त स्त्रीदेहलालसेला विशेष महत्त्व आहे. हा सगळा आशयगाभा ग्रेसच्या स्वायत्त परिभाषेत आविष्कृत होतो. ही परिभाषा अनवट प्रतिमांनी युक्त असते. आई, सती, चंद्र, गंगा, घोडा इत्यादी प्रतीके त्यांचा सतत पाठलाग करीत असतात.

मात्रावृत्ते व अक्षरगणवृत्ते यांच्यावरील ग्रेसचे प्रभुत्व असाधारण आहे, नव्हे, यांचे पुनरुज्जीवनच त्यांनी केले आहे. त्यांच्या काव्यात नाद, लय, ताल, सूर इत्यादींना महत्त्वाचे स्थान आहे. प्रथमदर्शनातच रसिक या कवितेतील अंतस्थ गेयतेकडे ओढला जातो. तिच्या



अनुक्रमणिका

लाघवी पदन्यासाने मोहित होतो. शब्दांनी वेढलेली कवितेची बाह्य त्वचा इतकी मुलायम असते की, ती खिळवून ठेवते. नव्या पिढीतील किती तरी कवी या आकर्षणातून ग्रेसचे आंधळे अनुकरण करू लागतात. पण ग्रेसच्या आत्म्याचे अनुकरण कसे करणार? 'फिरुनि फिरुनि माझा वंश निर्वंश होई' हे ग्रेसचे निवेदन नवोदितांनी समजून घेतलेच पाहिजे.

अशी ही परंपरासमृद्ध कविता विदर्भात निर्माण होत असताना, मराठीतील अस्तित्ववादी प्रवृत्तीशी नाते सांगणारी नवकविता विदर्भात वसंत आबाजी डहाके यांच्या निमित्ताने निर्माण झाली. समकालीन व्यक्ती आणि समाज यांचे परस्परसंबंध आणि मानवी जीवनातील अर्थशून्यता व पोकळी यांचा ते सतत विचार करताना दिसतात. व्यक्ती म्हणून स्वतःच्या पराधीनतेची, दुर्बलतेची आणि हताशतेची जाणीव त्यांनी पुनःपुन्हा व्यक्त केली आहे. माणसातच राहून एक प्रकारची आलेली मानसिक हद्दपारी त्यांच्या अनुभूतीचा विषय होते. त्यांच्या दीर्घ कवितांतून व्यक्ती आणि समाज, नीती आणि नियती याबद्दल निरपेक्ष चिंतन केले आहे. स्वतःला पडलेल्या मर्यादा, समाजजीवनातील बकाल अस्थिरता, किडलेला मूल्यभाव यांचा आलेख त्यांनी या कवितांतून काढला आहे.

मानवाच्या मूलभूत विद्रोही शक्तीचा अदमास घेण्याची त्यांची क्षमता असली तरी, व्याज आशावाद आणि कंठाळीपूर्ण वक्तृत्वापासून त्यांची कविता अलिप्त आहे. आपल्या व्यक्तित्त्वाच्या कोंडीची जाणीव कोणत्याही कृतिसापेक्ष विचार-प्रकटीकरणाला पायबंद घालते. क्रांतिकल्पना आणि ईश्वरशरणतेवर त्यांचा विश्वास नाही. म्हणून ईश्वरी अस्तित्व झुगारणे ही त्यांच्या मनाची स्वाभाविक प्रक्रिया आहे.

मृत्यूचिंता आणि मृत्यूचिंतन हा डहाक्यांच्या कवितेचा लक्षणीय विशेष आहे. मृत्यूविषयीचे प्रेम आणि मृत्यूचा तिरस्कार दोन्हींचा आढळ प्रकर्षाने त्यांच्या कवितेत होतो. सभोवताली चाललेले मृत्यूचे प्रचंड थैमान बघून, मानवी जीवनातील अटळ आणि हादरवून टाकणारी घटना एका क्षुल्लक जाणिवेच्या पातळीवर येऊन स्थिरावते.

डहाक्यांप्रमाणेच त्यांच्या पत्नी प्रभा गणोरकर यांचे व्यक्तिमत्त्वही समकालीन कवयित्रींमध्ये उठून दिसणारे आहे. अस्तित्वशोधाने व्याकुळलेले व्यक्तित्व विश्वाच्या प्रचंड पसाऱ्यात आपले स्थान काय, या प्रश्नाने व्याकुळले आहे. या व्याकुळलेपणातून अपरिहार्यपणे आलेले एकाकीपण स्वतःच्या आणि परस्परांच्या संदर्भातील मानवी संबंधाची त्वचा सोलून बघते. त्यातून वाट्याला आलेली निराशा गणोरकरांच्या कवितेचा स्थायीभाव आहे. स्वतःच्या अस्तित्वानुभवाच्या छटांचा खोलवर जाऊन वेध घेणाऱ्या प्रभा गणोरकर या पहिल्याच मराठी कवयित्री असल्यामुळे इतर कवयित्रींच्या काव्यातील दुःखाचा शोध जसा सरळसरळपणे घेता येतो, तसा गणोरकरांच्या दुःखाचा घेता येणे अशक्य आहे. मराठी अस्तित्ववादी कवितेचा प्रवाह समृद्ध करण्याचे कार्य या दोघांनी जाणीवपूर्वक केल्याचे दिसून येते.

**वैदर्भीय दलित कवी :**

१९६० नंतर प्रचंड प्रमाणात निर्माण झालेल्या दलित कवींमध्ये विदर्भातील दलित कवींचे स्थान अतिशय महत्त्वाचे आहे. अलीकडच्या काळात विपुल दलित कवी निर्माण झाले असले तरी डॉ. यशवंत मनोहर आणि वामन निंबाळकर यांनी महत्त्वाची दलित कविता निर्माण केली. हे दोनही कवी दलित साहित्याचे भाष्यकारही असल्यामुळे कविता-निर्मितीबरोबर एक वाङ्मयीन जबाबदारीही त्यांनी स्वीकारल्याचे दिसते.

निंबाळकरांची कविता आपल्या समाजात फुललेल्या निखाऱ्यांचा वेध घेणारी, उद्दाम क्रांतीची गाणी गाणारी कविता आहे. क्वचित तिचा डौल प्रचारात्मकतेकडे झुकतो तर पुष्कळदा ती अंतर्मुखतेतून वैचारिक होते. आत्मप्रतिष्ठेला ही कविता जोजावणारी असली तरी काव्यमूल्यांचा ती अव्हेर करीत नाही. म्हणूनच अनाठायी अतिरेक आणि उऱबडवेपणा व अभिव्यक्तीतील पसरटपणा ती टाळू शकली आहे. दलित कवितेला प्रारंभीच समृद्ध करण्याचे श्रेय निंबाळकरांना देणे आवश्यक आहे.

यशवंत मनोहरांची कविता दलित काव्यपरंपरेतील महत्त्वाचा टप्पा आहे. एका विशिष्ट टप्प्यावर या परंपरेमध्ये निर्माण झालेली कोंडी फोडण्याचे काम मनोहरांच्या कवितेने केले. 'उत्थानगुंफे'च्या प्रकाशनादरम्यान दलित कवितेच्या मर्यादा स्पष्ट होत चालल्या होत्या. चिंतनशीलतेचा अभाव, वैचारिक परिपक्वतेचा अभाव, विशिष्ट तत्त्वज्ञानाचा एकांगी अंगीकार, आवर्तित आशयानुभूती, भाषा आणि प्रतिमा यांचे दुबळेपण या त्या मर्यादा होत्या. यशवंत मनोहरांचा विस्तृत आवाका, उद्दामपणा, आत्मसामर्थ्याची जाणीव आणि प्रगल्भता या वैशिष्ट्यांनी दलित कवितेला वैचारिक आधार लाभला आणि काव्याच्या दृष्टीनेही एक सौंदर्यपूर्ण वळण तिला मिळाले.

आदिवासी कवितेचे प्रथम स्फुल्लिंग या विदर्भाच्या मातीतच प्रज्वलित झाले आहे. विनायक तुमराम यांच्या 'गोंडवन पेटले आहे' या संग्रहातून आदिवासींना आलेले आत्मभान त्यांनी प्रखर शब्दांत अभिव्यक्त केले आहे. या कवितेचा आशयाकार दलित कवितेसारखाच भासत असला तरी, संस्कृती आणि परिस्थिती यांच्या भिन्नतेमुळे तिची पृथगात्मताही लक्षणीय आहे.

**भरतीच्या नव्या लाटा :**

सुधाकर गायधनी, नारायण कुलकर्णी, शिरीष गोपाळ देशपांडे, श्रीपाद भालचंद्र जोशी, सुनील शिनखेडे या वैदर्भीय काव्यसागराच्या आजच्या भरतीच्या लाटा आहेत. शिरीष देशपांडे यांनी आपल्या कवितेद्वारा अत्याधुनिक विज्ञान कवितेची भर घातली आहे. आपल्या नव्या विज्ञान-प्रतिमांच्या सहाय्याने प्रेम आणि समाज यांच्याबद्दलच्या अनुभवांना टोकदारपणे साकार करण्याचा प्रयत्न ते करतात. नवी कविता म्हणजे नव्या प्रतिमा हा बीजमंत्र ध्यानी घेऊन, त्यांनी जाणीवपूर्वक आपली प्रतिमासृष्टी घडविलेली आहे. विज्ञान कवितेबरोबर शृंगाराची



अनुक्रमणिका







धीट अभिव्यक्ती हा त्यांच्या कवितेचा लक्षणीय विशेष आहे.

नारायण कुलकर्णी कवठेकरांच्या कवितेत सामाजिक वास्तवाचे भान अधिक प्रगल्भ झालेले दिसते. लाचार मध्यमवर्गीय जीवनाचे वास्तवपूर्ण चित्रण त्यांच्या कवितेत येते. परिस्थितीच्या दाबाखाली चिरडल्या गेलेल्या व्यक्तींच्या उत्स्फूर्त संवेदना, त्यांचा विरून गेलेला मस्तवालपणा आणि चिमटीएवढ्या सुखासाठी अंतःकरणात उगवलेली लाचारी त्यांनी प्रभावीपणे रेखाटली आहे.

सुधाकर गायधनी यांनी आपल्या 'देवदूत'या दीर्घ चिंतनशील काव्यात लौकिक जीवनातील सामाजिक अनुभवांचे नाट्यपूर्ण चित्रण केले आहे. धार्मिक अंधश्रद्धा, भोगलालसा, सत्तालालसेपायी चालू असणारे राजकारण आणि त्याला बळी पडणारी दरिद्री जनता यांचे आपल्या वक्तृत्वपूर्ण शैलीद्वारे त्यांनी दर्शन घडविले आहे.

या नव्या वैदर्भीय कवींबरोबरच सुलभा हेर्लेकर, मृणाल चिंचाळकर, श्रद्धा पराते इत्यादी कवयित्रींनी आजची वैदर्भीय कविता आपल्या परीने समृद्ध केली आहे. विदर्भातील कवींच्या या अलौकिक काव्यकर्तृत्वाचे सिंहावलोकन करताना, त्यांच्यातील समृद्धतेची, विविधतेची वैचित्र्याची आणि सामर्थ्याची पातळी लक्षात घेता, मन सुखावते व भविष्यातील वैदर्भीय कवितेच्या समृद्ध रूपचित्राची कल्पना करू लागते.

*

---

**आजीव सदस्य**

*पुणे (१ मे ते २९ जून १९९०)*

मनोहर गोविंद बोडस; हरि रामचंद्र नरके (पिंपरी-पुणे १८); सुरेशचंद्र गोविंद सहस्रबुद्धे; सुगंध वसंत देसाई; यशवंत हरी कुलकर्णी; सौ विमल श्रीधर मेनन; एस. जी. वढावकर; श्रीमती रजनी सूर्यकांत कुलकर्णी; सौ. माधुरी श्रीरंग साठे; शिरीष वसंत पिंगळे; श्रीराम दत्तात्रेय केतकर; सौ. सुनीता उमेश खासनीस; वसंत राजेराव कडपा; विजय गोपाळ भिडे; व्यंकटेश ऊर्फ बाबूराव कानडे; राजज्ञ उल्हास; राजन गंगाधर नाईक.

*



अनुक्रमणिका








# कविवर्य कांत यांची प्रेमकविता

## निसर्गसौंदर्यात परिणत झालेली प्रेमभावना

डॉ. अरुणा चौधरी

वा.रा. कांत यांची प्रेमकविता तीन टप्प्यांतून विकसित झालेली दिसते. 'रुद्रवीणे'तील प्रेमकविता ह्या स्वप्नाळू वृत्तीतून व तरुण वयाच्या जाणिवेतून लिहिल्या आहेत. त्यांतून भावनांचा खळखळाट ऐकू येतो. तारुण्यातील उन्माद प्रकट होतो. ही कविता वर्णनात्मक असून स्त्री-सौंदर्याची, तिच्या देहाची, रंगरूपाची वर्णने यातून आलेली आहेत. 'सखी शेजारणी तू हसत राहा,' 'रमणि उदविशी निज कचभार', 'त्या तरुतळी विसरले गीत', 'मोगरा फुले तो थांब' इ. कवितेतून प्रणयाची व रमणीची धुंद सौंदर्यचित्रे आली आहेत. दीर्घ बदामी, तपकिरी, गहिरे, शर्बती, श्यामल, भुरके आणि मुलायम नेत्र असलेल्या युवती त्यांच्या कवितेत आहेत.

*'तपकिरी डोळे किंचित गहिरे तुझे,*
*उठविती भोवती मदिरेचे वादळ'*

यातील 'मदिरेचे वादळ' निर्माण करणारे गहिरे डोळे तरुण मनाला सहज भुरळ घालतात. तर शेजारणीचे दीर्घ बदामी डोळे व त्यांतून उमलणारे हास्य कवीचे भावविश्व उजळून टाकतात.

*"दीर्घ बदामी श्यामल डोळे । एक सांद्रघन स्वप्न पसरले*
*धूपछाँव मधी यौवन खेळे । सखि शेजारणी तू हसत रहा"*

यातून निर्मळ व सौंदर्यासक्त भाववृत्तीचा अपूर्व असा आविष्कार झालेला आहे. तिच्या हास्यातील सौंदर्याबरोबरच स्त्रीच्या विशाल व काळ्याभोर केशसंभारामुळे तरुण मनाच्या भावना अधिकच उत्तेजित होतात.

*"न्हाले ओले केश मोकळे, खांद्यावरुनी स्वैर पसरले*
*मोत्यावाणी मधुनि चमकती, टिपुनिही सलील तुषार"*

कांतांची ही प्रेमगीते धुंद व बेहोषीने तारुण्यसुलभ भावनांचा आविष्कार करतात. कांत ज्या निजाम राज्यात राहात होते, तेथील वातावरणही धुंद होते. ते पाहात असलेल्या नृत्यांगनांचे लावण्य आणि रुबाया, शेर हे उर्दू काव्य यांच्या प्रभावामुळे त्यांनी धुंद सौंदर्याची वर्णने केली असावीत. दहिवरले डोळे, रेशमी, कुरळे, काळे केस, त्यातून चमकणारे मोत्यासारखे सलिल तुषार, आरक्त असे गुलाबी तळवे, तिच्या हास्याचा प्रकाश इ. सौंदर्याची विलक्षण मोहिनी त्यांच्या गीतांवर पडली आहे.

कांतांच्या प्रारंभीच्या प्रेमकवितेवर केशवसुत, बालकवी, माधव ज्युलियन, उर्दू कविता, शाहिरी परंपरा, रविकिरण मंडळाची कविता, इंग्रजी रोमँटिक काव्य इ. संस्कार जाणवतात. कुठे उर्दू व शाहिरी वाङ्मयातील भडक उत्तानपणा दिसून येतो.



अनुक्रमणिका






*"राज्य भोगिले पृथ्वीचे तुझ्या उघड्या बाहूत" किंवा*
*"तुझी नखक्षते, रात्री माझ्या उरी फुले झाली"*

यांसारख्या ओळीतून हा भडकपणा जाणवतो. प्रेयसीची आराधना, प्राप्ती आणि उपभोग या तीन अवस्थांतच प्रणयीजनांच्या आयुष्याची इतिश्री व्हायची असा जो वाङ्मयव्यवहारात संकेत होता, त्या संकेतातच ही प्रेमकविता अडकून बसली होती. त्याग ही प्रेमाची कसोटी माधव ज्युलियन मानतात. 'प्लेटॉनिक लव्ह' च्या कल्पनेचा पगडा त्यांच्या मनावर होता. या खोट्या व अव्यवहार्य कल्पना त्यांनी स्वप्नरंजनातील भावकवितेत मांडल्या. 'रुद्रवीणे'तील प्रेमकवितेत हुरहूर, प्रतीक्षा, प्रतीक्षेतील विरहव्यथा व शेवटी मीलनातील आनंदाची बेहोषी इ. प्रमुख टप्पे पाहावयास मिळतात. 'दीपाचे मनोगत', 'आलीस उशिरा', 'जागविले', 'साखरझोप' इ. कवितांतून याच भावनांचा आविष्कार झालेला दिसतो. ही सर्व शृंगाराची कविता आहे. प्रेमाची नव्हे. आकर्षणाचे पहिलेवहिले साधन म्हणून कांतांनी देहसौंदर्यालाच प्राधान्य दिले. उर्दू काव्याचा प्रभाव त्यावर दिसतो.

प्रेमभावनेचे विकसित व प्रगल्भ स्वरूप 'वेलांटी' या संग्रहात दिसून येते. यातील कविता प्रामुख्याने विरहभावनेची व विरहव्यथेची आहे. ही कविता आंतर मानसीच्या लावण्यवतीचे दर्शन घडविणारी आहे. अनुभूतीची सोनेरी किनार लाभल्यामुळे ही कविता उत्कट झाली आहे. प्रेम ही एक हृदयाची तळमळ आहे. ती केवळ शरीराची भूक नाही. दोन हृदयांची समरस होण्याची धडपड आहे. मानसिक मनोमीलन आहे. प्रेम याचा अर्थ मानसिक सुख, शारीरिक सुख, आत्मिक सुख. प्रेम हे जीवनाशी निगडित असल्याने त्याची गोडी प्रत्येकालाच चाखावी लागते. अर्थात हे सुख व ही गोडी जे जरी प्रेमाचे बाह्य रूप असले तरी, प्रेमाचे अंतरंग मात्र तितकेसे सुखद नसते. मानसिक यातना, वेदना आणि व्यथा या काटेरी मार्गाच्या वाटचालीतून प्रेमाच्या गुलाबाचे सौख्य अनुभवास येते. मीलनाच्या दैवी सुखाबरोबरच विरहाच्या वेदनांची व्याकुळताही प्रेमातून मिळते. त्यातून स्मृतींनी भारलेल्या व्यथांच्या कविता निर्माण होतात. कांतांच्या 'वेलांटी'मध्ये गतकालीन प्रेमस्मृती आहेत. या स्मृती जतन करण्याचा अट्टाहास आहे. प्रेमस्मृतीवर प्रेम करण्याची आस आहे. आविष्कारात मोकळेपणा, उत्कटता आहे. उन्माद आहे, पण उच्छृंखलपणा किंवा उत्तानपणा नाही. यातील अनुभव, स्वानुभव असून त्याचे प्रामाणिकपणे कवीने चित्रण केले आहे.

प्रेमस्मृतींची जोपासना हळुवार मनाने करणे हा विरहभावना सुसह्य करण्याचाच प्रयत्न आहे. विविध वस्तूंशी, प्रसंगाशी, कवीच्या भावमनाशी नाते जुळले आहे.

*"ठेव जिंदगी गहाण, सुखे घेई पंचप्राण*
*मागू नको भिंग पण*
*क्षण बिलोरी सुखाचा एवढा हा नको नेऊ*
*आरसा हा नको नेऊ"* *('आरसा हा नको नेऊ')*

अशा आर्ततेने आपल्या प्रियेची विनवणी करतात. पहिल्या भेटीचे प्रतिबिंब ज्या दर्पणात बिंबले आहे, तो उत्कट क्षण प्राणपणाने अंतःकरणात साठवून ठेवण्याचा तरुण मनाचा भांबडेपणाच यातून दिसतो. त्याचबरोबर पंचप्राणाचे मोल देऊन प्रतिबिंब जोपासण्याचे वेड हे कविमनाच्या हळवेपणाचे दर्शक आहे.

*"सखीविण आरशात, आज पुनवेची रात*
*हंसू फुटे कुंतलात*
*प्रतिबिंब जगण्याचे माझे वेड नको नेऊ."*

सखीची प्रतिमा कवीच्या भावविश्वात खोल जाऊन रुजली आहे. ती त्याच्या आयुष्याचाच एक भाग वनली आहे.

*"गंध मातीचा मादक, येई निर्लेप गगना,*
*स्मरे तुज पाहिलेले खिडकीत हास ताना"* (वे. 'पुष्कराज स्मिते')

निसर्गप्रतिमेतूनच व्यक्त होणारी तरल, सूक्ष्म अशी प्रेमभावना कुठेच सुटी अशी दिसून येत नाही. विविध भावनांचे मिश्रण तेथे आढळते. भोवतालची सृष्टी, लोककथा, पुराणकथा, सांस्कृतिक संदर्भ यातील घटक प्रेमानुभवात एकत्र आलेले सापडतात. त्यातील कारक भावना प्रेमाचीच असते, पण केवळ प्रेमानुभवाचेच आविष्करण होत नाही. भिन्न भिन्न जाणिवांचे पदर दिसून येतात. गोष्ट सांगतो एक फुलाची ही कविता केवळ प्रेमाच्या आत्मसमर्पणाची गोष्ट सांगत नाही. प्राजक्त फुलाच्या जन्मावद्दलच्या काव्यरम्य लोककथेचे भाववीज या कवितेत आढळून येते. एका वाजूला प्रेमाच्या आत्मसमर्पणाची कहाणी सांगणारी कविता दुसऱ्या बाजूने लोककथा सांगू लागते; तर तिसऱ्या बाजूने लोकगीतातून जाणवणाऱ्या निर्मळ, विशुद्ध व प्रांजळ आत्मनिवेदनाशी नाते दाखवते.

अनुभवाला शब्दरूप देताना कांतांची कविता सहजतेने चिंतनाच्या पातळीवर जाऊन पोचते. मुंबईला हॉटेलातील एका पत्र्याच्या वळचणीखाली बसलेल्या कबुतराच्या हालचाली, भाव टिपणारे निळे कवूतर ही साधी कविता वैचारिक बनून जाते.

*"मिटल्या डोळ्यांत स्वप्न नाही, देखल्या डोळ्यात डोळेपण नाही*
*उरते वाऱ्यात फक्त, रातांधळ्या पंखांची एकांत तडफड"*
*"युगविरहीचे त्यात जागरण जळते आहे.*
*निळे कबूतर बसले आहे."*

शेवटी विरहाचा 'टच' आहे व तेथेच कवीचे नाते जुळते.

लोककथा, लोकगीते, सांस्कृतिक कल्पना इ. विविध पदर असलेली 'धानराजा' ही कविता तेलंगणातील भूमिगत संग्रामाची पाश्र्वभूमी वापरते.

*"कुणी म्हणे कायसे ते, भूमिगत तू झालाय*
*मग बळिराजापरी, ये ना आता दिवाळीस"*

येथे 'बळीराजा' ही सांस्कृतिक कल्पना आलेली आहे. दिवाळीत आपण बलिप्रतिपदा साजरी करतो. वामनाने तिसरा पाय बळीच्या मस्तकावर ठेवताच तो पाताळात गेला. तसाच हा भूमिगत झालेला नक्षलवादी तरुण आहे. पौराणिक संदर्भाचा उपयोग समर्पकपणे केला आहे.

पौराणिक व सांस्कृतिक संदर्भ, लोककथा यांचे पदर कांतांच्या प्रेमकवितेत आढळून येतात. यातच कांतांचे 'कान्तपण' आहे. एकाच मर्यादित अर्थाने कविता झाली तर ती खुरटलेली, संकुचित होते. अनेक अर्थाने विकसित होण्यातच तिचे मोठेपण आहे. काळाबरोबर वाहात जाऊनही स्वतःचे वेगळेपण राखले आहे.

नाट्यगीते हाही कांतांच्या प्रेमकवितेतील लक्षणीय भाग आहे. नाट्यगीतानुकूल अशी त्यांची प्रतिभा आहे. नाट्यगीते लिहिण्यासाठी कवी हा मनकवडा हवा. त्याला दुसऱ्याचे मनोगत ओळखता आले पाहिजे व ते त्या माणसाच्या शब्दात व्यक्त करता आले पाहिजे. कांतांनी तांबे छापाची नाट्यगीते लिहून विरहव्यथेची भावचित्रे रेखाटली आहेत. विरहातील व्यथा व वेदना ही भावना एकच असली तरी सौंदर्यचित्रे वेगवेगळी असल्यामुळे ती हृद्य झालेली आहेत. 'सख्या का गायिलेस हे गान' या नाट्यगीतातील वेदना, विरहव्यथा, तिची असहाय्यता जीवघेणी आहे. पूर्वायुष्यातील प्रेम असफल झाले ते सर्व विसरून टाकण्याचा प्रयत्नही फसला तेव्हा घायाळ मनाने, व्याकुळतेने त्याला प्रश्न विचारते—

*'संपवूनी तू कविता जाशील*
*कीर्तीफुलाचे गेंद झेलशिल*
*हेहि सवे ने, उपसुनी देते मम हृदयातील बाण'*

'मज माझा न अधिकार' या नाट्यगीतात प्रेम असफल झालेल्या स्त्रीमनाची दुर्बलता व मानसिक ओढाताण रेखाटली आहे. पूर्वायुष्यातील तिचे प्रेम असफल झाल्यामुळे दुसऱ्याशी विवाहबद्ध होऊन संसारात रमण्याचा प्रयत्न करते. पण 'पराधीन' झाल्याचे दुःख जाळत आहे.

*"हिरण्मयी मी प्रकाशधारा*
*विश्वाचा उजळीत उंबरा_ जळलेले हे फुलविन त्रिभुवन"*

एवढी दैवी प्रेमाची शक्ती तिच्याठायी असूनही आज ती प्रियकराला हसवू शकत नाही. सामाजिक, नैतिक बंधनामुळे तिच्या भावनांचा कोंडमारा व व्याकुळता यातून व्यक्त झाली आहे.

कांतांची कविता प्रेमाचे तत्त्वज्ञान सांगण्यापेक्षा प्रेमानुभवातील नाट्य व सौंदर्य टिपण्याचाच प्रयत्न जास्त करते. प्रेमपूर्ती न झाल्यामुळे स्त्रीच्या भावावस्थेचे चित्रण करण्यात ते रमतात. कोमल, हळुवार, अधिक संवेदनाक्षम असे स्त्रीमन कुठलेही रूक्ष तत्त्वज्ञान ऐकून घेण्यास तयार होत नाही.

विरहप्रसंगी प्रियकर तिला सांगतो,

*"करिशी का दुःख होता ताटातुटी*
*विलगता ओठी स्फुरे शब्द*
*वेगळाल्या तारा करिती झंकार*
*निर्मिते अन्तर नादब्रह्म"* (वेलांटी : दीपछाया)

पण हे तत्त्वज्ञान ऐकून घेण्याच्या मनःस्थितीत ती नसतेच. उत्कट प्रेमापोटी ती वैतागाने म्हणते :

*"तुझे तत्त्वज्ञान, सांग पाषाणास*
*मुक्ति पतंगास, दीपछाया"*

प्रीतीचे सार्थक हे आत्मसमर्पणास सिद्ध होण्यातच आहे असे तिचे भावूक मन सांगत असते. अभंगरचनेचा घाट असलेली ही छोटीशीच कविता म्हणून आशयघन वाटते. प्रेमसाफल्यापेक्षा प्रेमनैराश्याची स्थिती चित्रित करणारी कविता 'वेलांटी'मध्ये अधिक आहे. ही कविता आत्मानुभूतीतून स्फुरली आहे. प्रियेच्या नकारामुळे कवीचे भावविश्वच उद्ध्वस्त झाले आहे.

*"तुझ्या नकाराची भाषा, जाळ बने अक्षरात*
*आग जशी काटक्यात, अर्थ जळती शब्दात"*
*(वेलांटी : काही काळ्या निळ्या रेषा)*

*"पुढे लोंबे झाडावर रिते मोहळ उदास*
*मध, मधमाशा गेल्या, हसे विषण्ण आकाश"* (वे. भिर्जुनिया पावसात)

विरहाची व्यथा-वेदना असह्य व जीवघेणी होते. या वेदना कुरवाळण्यातही आत्मिक सुख आहेच. 'वेदनेस उरि जपत रहावे' असे ते म्हणतात.

मीलनाच्या कविता कांतांनी मोजक्याच लिहिल्या असल्या तरी त्या भावरम्य व मधुर आहेत. 'चंदेरी, रात्रीच्या निढळी', 'चांदणे हे डहुळेल', 'ओल चांदण्याचा', 'तुला झोपेत हसू आले', 'इतुक्यात कशी झोप तुझी झाली' इ. कवितांतून मीलनाच्या स्मृतीची सुखद व भावमधुर चित्रे रेखाटली आहेत. यातून मीलनातील धुंदी व बेहोषी दिसून येत नाही, तर एका अनुभवलेल्या प्रसंगाकडे अलिप्त वृत्तीने पाहात असताना त्यातील आनंद हृदयात साठवून ठेवण्याचा प्रयत्न दिसतो.

*"झोप आता, नको बोलू । फुलमिटू झाले डोळे*
*अर्थ जागविता ओठी । शब्द माझे पेंगुळले"* (वे. 'चांदणे हे डहुळले')

मीलनाच्या तृप्तीची अवस्था संयमित व सूचित शब्दांतून कवीने वर्णन केली आहे. बोलले तर तृप्तीला धक्का बसेल म्हणून तो म्हणतो :

*"आता बोलू नको काही, निळाई ती गढुळेल*
*निःश्वासहि नको खिन्न, चांदणे हे डहुळेल"*



अनुक्रमणिका






इथे शारीरिक पातळीवरील मीलनाचे संदर्भ आढळून येत नाहीत. ही मीलनाची कविता देहस्वितेच्या पलीकडे गेलेल्या एका अनुभवाचे दर्शन घडविते. दोन मनांचे झालेले हे मनोमीलन आहे. कांतांच्या प्रतिभेतील विकासाचा हा महत्त्वपूर्ण टप्पा आहे. शारीरिक अनुभवाच्या पलीकडे असलेली ओढच त्यांच्या मीलनगीतातून व्यक्त झाली आहे.

*"मिठीत साऱ्या विरुन व्यथा । उरल्या चंद्रा अमृताच्या कथा,*
*अर्ध्या रात्री शिणल्या गात्री सुखऽदुःख फुला आले"*

लौकिक जीवनातील दुःख, व्यथा याचा विसर पाडण्याचे सामर्थ्य या दैवी मीलनात आहे. 'वेलांटी'तील प्रेमकवितेत भावनांचा संयतपणा, शांत वृत्ती, अनुभवाची तरलता, सूक्ष्मता, मनाची कोवळिक, निखळ सौंदर्यदृष्टी इ. प्रगल्भतेच्या खुणा दिसतात. स्थूलाकडून सूक्ष्माकडे वाटचाल झालेली आहे. या कवितेत देहशृंगारानंतर कालांतराने प्रेमाची व्यक्ती दूर निघून जाते व फक्त प्रेमस्मृतीवरच कवी प्रेम करू लागतो. विरहव्यथेतही आत्मिक सुख साठवलेले आहे. म्हणूनच विरहाचा क्षण सांभाळून ठेवणे व्यथेइतकेच सुखावह वाटते.

वेलांटीनंतरची कवीची तिसरी विकासाची अवस्था पन्नाशीच्या आसपास लिहिलेल्या 'मावळते शब्द' या काव्यसंग्रहात आढळते. प्रौढ, चिंतनशील वृत्तीचे व एकूण जीवनविषयक दृष्टीचे, सौंदर्याचे उदात्त व व्यापक रूप यात सापडते. प्रेम ही एक सामान्य भावना न राहता त्याचे रूपांतर 'मूल्या'त झालेले दिसते. इथे प्रेमस्मृतीदेखील धूसर होऊन जातात. निसर्ग सौंदर्यातून, विश्वातील रमणीय, सुंदर व लोभस सृष्टीतूनच ही प्रेमभावना स्थिर झालेली दिसते. यातील प्रेमकवितेत कवी भोगलेल्या अनुभवाकडे तटस्थपणे पाहात आहे. कवीचे व्यक्तिमत्त्व त्या अनुभवात विरघळून जात नाही, तर तो त्या अनुभवाचा साक्षीदार बनतो. स्मृतिरूप सौंदर्याच्या भावचित्रात आत्मिक समाधान शोधण्याचा प्रयत्न करतो.

*"मी शब्द शोधीत असतो । मला अर्थ हवा असतो*
*या साऱ्या सौंदर्याचा । तुझ्या चाफेगौर बाहूंचा"*

साऱ्या विश्वाच्या सौंदर्याचा अर्थ त्याला तिच्या रूपात सापडतो. विश्व व मानव यांचा वेगवेगळ्या पातळीवरून शोध घेण्याचा प्रयत्न अलीकडील प्रेमकवितेतून केलेला आहे. ही प्रेमकविता निसर्ग आणि मानवी जीवन यांच्या अद्वैत सिद्धान्ताचीच प्रतीती आणून देते.

*"ढगढग गुलमोहर । ओल्या पहाट ऊनात*
*झाड सरीनी पेटून । अरुणावले फुलात*
*फुले गाभुळल्या स्मिती । रुद्ध आसवात जळे*
*असा एक गुलमोहर । माझ्या अंतरात झुले"*

*(मावळते शब्द : 'गुलमोहर')*

(प्रा. डॉ. सौ. अरुणा चौधरी, 'अक्षय' धर्माबाद, ४३१ १८९ जि. नांदेड)

*



अनुक्रमणिका






# शुद्धलेखन आणि प्रमाण-भाषा

## शुद्धलेखनविषयक पुनर्विचार

डॉ. द. न. गोखले

अ.भा.मराठी साहित्यमहामंडळाने शुद्धलेखनाच्या प्रश्नाचा पुनर्विचार करण्याचे ठरविले आहे. त्यासाठी महामंडळाने एक समिती नियुक्त केली असून समितीचे निमंत्रक प्रा. डॉ. गं.ना.जोगळेकर यांनी २४-५-९० या दिवशी एक शुद्धलेखनविषयक प्रश्नावली अनेक नामवंत लेखकांकडे पाठवली आहे. या प्रश्नावलीमुळे आता शुद्धलेखनाविषयी बरीच साधक-बाधक चर्चा होईल अशी अपेक्षा आहे. तेव्हा शुद्धलेखनाविषयी काही मूलभूत प्रश्न उत्पन्न करण्याचा विचार या लेखात आहे. चर्चेला खोलपणा यावा म्हणून या लेखात काही प्रश्नांची एक बाजूही मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

आतापर्यंत शुद्धलेखनाविषयी जे जे नियमसंच तयार झाले त्यात प्रमाण-भाषा हा शब्द आलेला दिसत नाही. प्रमाण-भाषा दुर्लक्षितच झाली आहे. १९३० चे म.सा.परिषदेचे संच घेतले तर त्यात 'तत्त्व' म्हणून पुढील गोष्टींचा उल्लेख केला आहे-

"केवळ उच्चाराप्रमाणे शुद्धलेखन असावे हे तत्त्व या मंडळाला संमत नसून परंपरा, वर्तमानकालीन प्रचार, व्युत्पत्ती, व्याकरण व उपयुक्तता यांचा शुद्धाशुद्ध लेखन ठरविण्याच्या कामी विचार करावा."

म्हणजे, म.सा.परिषदेने १९३० साली काही प्रमाणात उच्चारानुसारित्व मान्य केले आहे आणि शिवाय प्रचार, व्युत्पत्ती, व्याकरण व उपयुक्तता यांचाही शुद्धलेखनाच्या कामी निकष म्हणून स्वीकार केला आहे. १९५८ साली म.सा.परिषदेच्या शुद्धलेखन महामंडळाच्या निर्णयाप्रमाणे १९३० चाच नियमसंच जवळजवळ कायम करण्यात आला. १९४७ साली मुंबई विद्यापीठाने 'मराठी शुद्धलेखन' या नावाची जी पुस्तिका प्रसिद्ध केली तीमध्ये असे म्हटले आहे की 'सुसंस्कृत शिष्टांचे सभोचित (non-coloquial) भाषण' हेच शुद्धलेखनाचे प्राणभूत तत्त्व समजावे. या भाषणाच्या निर्णयाची साधने म्हणून व्युत्पत्ती, मराठीचा स्वभाव, मान्य ग्रांथिक प्रयोग वगैरे कसोट्या सांगितल्या आहेत. म्हणजे, मुंबई विद्यापीठाने शिष्टांचे सभोचित भाषण हे शुद्धलेखनाचे आधारभूत तत्त्व मानले असून व्युत्पत्ती, भाषेचा स्वभाव, मान्य ग्रंथांतील प्रयोग वगैरे गोष्टी साह्यभूत मानल्या आहेत. १९७२ च्या महामंडळाच्या 'लेखनविषयक नियमात' शुद्धलेखनाचे नियम दिले आहेत. पण त्या नियमांचे प्राणभूत तत्त्व दिलेले नाही. याप्रमाणे प्रत्येक नियमसंचाची चिकित्सा करून आतापर्यंत शुद्धलेखनाच्या नियमात प्रमाण-भाषेचा विचार झालेला नाही हे दाखवून देता येईल.

प्रमाण-भाषेचा उल्लेख नसणे हे स्वाभाविकही म्हणावे लागेल. प्रमाण-भाषेची संकल्पना










अलीकडे सुस्थिर झालेली आहे आणि प्रमाण-भाषेचा विचार आपल्याकडे तर काहीसा नवीनच आहे. 'सुसंस्कृत शिष्टांचे सभोचित भाषण' वगैरे उल्लेखात प्रमाण-भाषेची संकल्पना हळूहळू उमटत येते असे फार तर म्हणता येईल.

प्रमाण-भाषेची काही मुख्य लक्षणे पुढीलप्रमाणे सांगता येतील,

१. भाषेची अनेक रूपे असतात. उदा. विशिष्ट जातीची भाषा, वर्गाची भाषा, प्रांताची भाषा वगैरे. प्रमाण-भाषा हे भाषेचे एक रूप आहे. सभा-संमेलने, परिषदा, अधिवेशने इत्यादींत दैनिके, साप्ताहिके, मासिके, पुस्तिका-पुस्तके, ग्रंथ इत्यादीत आणि आकाशवाणी, दूरचित्रवाणी, विधीमंडळे, कायदेकानू वगैरेमध्ये परस्पर संपर्कासाठी प्रमाण-भाषा बहुतकरून वापरली जाते.

२. प्रमाण-भाषेमुळे स्थानिक, वर्गीय, जातीय वगैरे संकुचित भाषारूपे वापरणारे लोक सहज एकमेकांशी संपर्क साधू शकतात. हा संपर्क स्थल आणि काल या दोन्ही दृष्टींनी युक्त असतो. म्हणजे प्रमाण-भाषा ही भाषेप्रमाणे जरी प्रवाही आणि परिवर्तनशील असली तरी एका ठिकाणच्या लोकांना दुसऱ्या ठिकाणची प्रमाण-भाषा समजते. नागपूरच्या लोकांना कोल्हापूरची भाषा कळते आणि भूतकाळातील प्रमाणभाषा वर्तमानकालातील लोकांना समजते. त्याचप्रमाणे भूत-वर्तमानकालीन प्रमाण भाषा भविष्यकालीन लोकांना कळण्याची शक्यता असते. चिपळूणकरांची 'निबंधमाला' म्हणूनच आज आपण वाचू शकतो आणि आजची गीता-प्रवचने उद्याच्या चिंतकाला प्रकाश देतील अशी आशा बाळगतो.

३. ज्याप्रमाणे भाषेची अनेक रूपे असू शकतात त्याप्रमाणे प्रमाण-भाषेचीही अनेक रूपे असू शकतात. भाषेच्या रूपात आणि प्रमाण-भाषेच्या रूपात फरक एवढाच की, प्रमाण-भाषेची रूपे संख्येने कमी असतात आणि त्यांमधील अंतर थोडे असते.

४. भाषेप्रमाणेच प्रमाणभाषा प्रवाही आणि परिवर्तनशील असते, हे वर आलेच आहे. दोन्हींच्या प्रवाहित्वांत आणि परिवर्तनशीलतेत फरक एवढाच की पहिलीपेक्षा दुसरी कमी प्रवाही आणि कमी परिवर्तनशील असते.

५. काही भाषा अधिकाधिक क्षेत्र व्यापत जातात आणि विकास पावत राहतात. अशा भाषांच्या विकसन-प्रक्रियेत कालांतराने प्रमाणभाषा जन्म घेते. म्हणजे प्रमाणभाषा ही विकसनाच्या विशिष्ट प्रक्रियेशिवाय आढळू शकत नाही.

शुद्धलेखनाच्या नियमांचा कोणताही संच प्रमाणभाषेवर आधारलेला असतो, असे म्हणता येईल. उदा. शुद्धलेखनातील ऱ्हस्व, दीर्घाचे नियम आपण बघू या. परंपरागत शुद्धलेखनात ऱ्हस्व इकारान्त व ऱ्हस्व उकारान्त संस्कृत तत्सम शब्द ऱ्हस्वान्त आहेत. उदा. कवि, गुरु. इतर शब्द दीर्घान्त आहेत. उदा. पाटी, जादू. विभक्तीप्रत्यय लागताना मूळ शब्दातील अन्त्य इकार, उकार दीर्घ होतो. उदा. कवि-कवीचा, गुरु-गुरूचा. हे सर्व ऱ्हस्व-दीर्घ प्रमाण-मराठीच्या लिखित रूपात होतेच. म.सा.परिषदेच्या १९३० च्या नियमांप्रमाणे ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त संस्कृत तत्सम शब्द प्रथमेमध्ये ऱ्हस्वान्त होते. उदा. कवि, गुरु, तत्सम

इकारान्त व उकारान्त अव्यये ऱ्हस्वान्तच होती. उदा. परंतु, यद्यपि. संस्कृत तत्सम शब्दांतील उपान्त्य व उपान्त्यपूर्व इ, ई, उ, ऊ मुळाप्रमाणे ऱ्हस्व किंवा दीर्घ होते. उदा. पूर्व, द्वीप. हे सर्व ऱ्हस्व-दीर्घही प्रमाण - मराठीच्या लिखित रूपात होतेच. मुंबई विद्यापीठाच्या नियमांप्रमाणे संस्कृत तत्सम शब्द विकल्पाने ऱ्हस्वान्त किंवा दीर्घान्त लिहिलेले चालत असत. उदा. कवि-कवी, गुरु, गुरू– हेही ऱ्हस्वदीर्घ प्रमाण-भाषेच्या लिखित रूपात होते किंवा भाषित रूपात होते. महामंडळाच्या १९७२च्या 'लेखनविषयक नियमां'नुसार शब्दान्तीचे सर्व इकार, उकार दीर्घ आहेत. हे ऱ्हस्वदीर्घ प्रमाण-भाषेच्या लिखितरूपात अंशतः आणि भाषित रूपात बहुंशी होतेच.

शीर्षबिंदूचे (अनुस्वाराचे) उदाहरण घेऊनही शुद्धलेखनाचे नियम प्रमाणभाषेवरच अधिष्ठित होते, हे दाखविता येईल. शीर्षबिंदूंचे दोन मुख्य वर्ग पडत होते : १ उच्चारित, २ अनुच्चारित. पैकी प्रमाणभाषेच्या लिखितरूपात हे दोन्ही वर्ग आलेले होते. अनुच्चारित शीर्षबिंदूंचे पुढील ४ उपवर्ग पडत होते : १ केवळ रूढीमूलक (लांकूड, केंस), २ केवळ व्याकरणीक (त्यानें निशाण फडकावलें, विभक्ती लिंग), ३ केवळ अर्थभेदक (नांव = नाम, नाव = होडी, कां = कारण, का = काय), ४ केवळ व्युत्पत्तिमूलक (कोंवळ- कोमल, घांट- घण्टा), अनुच्चारित शीर्षबिंदू प्रमाण मराठीच्या भाषित रूपात नव्हते; पण लिखित रूपात होते हे उघड आहे. उच्चारित नि अनुच्चारित शीर्षबिंदू परंपरागत शुद्धलेखनाने मानले होते. पण शुद्धलेखन सुधारकांनी जे अनेक नियमसंच तयार केले, त्यांत त्यांनी निरनिराळ्या प्रमाणात अनुच्चारित शीर्षबिंदूंचे उच्चाटन केले. मात्र, परंपरागत किंवा सुधारक दोन्ही प्रकारच्या नियमसंचांनी प्रमाणमराठीचे अधिष्ठानच मान्य केले. सर्वच नियम संच प्रमाण - मराठीच्या कक्षेमध्येच वावरताना दिसतात. समकालीन प्रमाण-मराठीत नसलेला कोणताही शीर्षबिंदू (उच्चारित वा अनुच्चारित) कोणत्याही नियमसंचाने मानलेला नाही.

प्रमाणेतर मराठीतील काही शब्दांवरून शुद्धलेखनाने आजवर प्रमाण-मराठी हेच आपले अधिष्ठित मानले आहे, हे अधिक स्पष्ट होईल. संस्कृत उष्ट्र वरून उंट नि ऊँट या दोन्ही शब्दांची व्युत्पत्ती सांगता येईल. पण प्रमाण मराठीतील उंट शुद्धलेखनाने मानला; ऊंट मानला नाही. तीच गोष्ट म्हैस-म्हस (सं.-महिष, भा-महिस), गाढव-गाढाव (सं-गर्दभ), पाणी-पानी (सं-पानीपम्) वगैरे शब्दांची. 'बैल'चे अनेकवचन प्रमाणेतर मराठीत 'बैलं' असे होते; पण प्रमाण मराठीतील 'बैल' हे अनेकवचनच शुद्ध समजले जाते. 'जा' ऐवजी 'जावा', 'करायचं' ऐवजी 'कराचं', 'दिले/दिलं' ऐवजी 'दिलेनी' वगैरे शब्दरूपे प्रमाणेतर मराठीत आढळतात. पण सर्व शुद्धलेखनसंचांनी प्रमाणमराठीतील बैल (अ.व.), जा, (तुम्ही जा), दिले/दिलं ही रूपेच ग्राह्य मानलेली दिसतात.

शुद्धलेखनाचे अधिष्ठान प्रमाण मराठीच असेल तर शुद्धलेखनाच्या नियमांचे अनेक संच अस्तित्वात का येतात, असा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो. त्या प्रश्नाचे उत्तर वर सूचित झाले असून अनेक संचांचे मूळ प्रमाण भाषेच्या विविध रूपांमध्ये नि पर्यायांमध्ये सापडू शकते.



अनुक्रमणिका

विशिष्ट नियमसंच प्रमाण भाषेचे विशिष्ट रूप नि प्रमाण भाषेतील विशिष्ट पर्याय ग्राह्य ठरवतो आणि बाकीच्यांना बाजूला सारतो. त्यामुळे तो नियमसंच अस्तित्वात येतो. दुसरा संच दुसऱ्या रूपाला नि पर्यायाला मानतो. त्यामुळे तो अस्तित्वात येतो. अशा रीतीने शुद्धलेखनाच्या नियमांचे अनेक संच तयार झालेले दिसतात. प्रमाण भाषेच्या विविध रूपांमुळे नि पर्यायांमुळे 'नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणम्' अशी स्थिती होते !

उदा. मराठी प्रमाणभाषेच्या अनेक रूपांत नि पर्यायांत मूळचे ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त संस्कृत शब्द ऱ्हस्वान्तही होते आणि दीर्घान्तही होते. पैकी परंपरागत शुद्धलेखनाने ऱ्हस्वान्त शब्द मानले. मुंबई विद्यापीठाने तत्सम शब्दापुरता दोन्हीत पर्याय असावा असे मानले. १९७२ च्या महामंडळाने हे सर्व दीर्घान्त मानले. म्हणजे तीनही नियमसंच प्रमाण भाषेच्या परिघातच फिरत राहिले; पण प्रत्येक संचाने प्रमाण भाषेचे वेगळे रूप किंवा पर्याय यांना मान्यता देऊन स्वतःच्या स्वतंत्र अस्तित्वास वाव दिला.

सर्व प्रकारचे शीर्षबिंदू प्रमाण भाषेत होतेच. काही तिच्या लिखित स्वरूपात असतील तर काही भाषित स्वरूपात असतील. हे सर्व परंपरागत शुद्धलेखानाने ग्राह्य ठरवले. त्यांतले सर्व उच्चारित शीर्षबिंदू नि अनेकवचनी सामान्य रूपांवरील बिंदू महामंडळाने मान्य केले, तर मुंबई विद्यापीठाने १९३० चे म.सा.परिषदेचे नियम नि विदर्भ साहित्य संघ यांनी आपापल्या परीने स्वतंत्र निवड केली. मिळून प्रमाण मराठीच्या विविध रूपांनी नि पर्यायांनी विविध नियमसंचांच्या उत्पत्तीला कारण दिले !

निरनिराळे नियमसंच जे अस्तित्वात येतात त्यांना प्रमाण भाषेतील विविधता हे एकच कारण नाही. शुद्धलेखनाची उद्दिष्टेही त्याला कारण आहेत. प्रमाण भाषा एकीकडे प्रवाही आणि परिवर्तनशील असते तर दुसरीकडे काही प्रमाणात स्थिरही असते. तिची स्थिरता तिचे संपर्क क्षेत्र स्थानदृष्ट्या आणि कालदृष्ट्या वाढविण्यास कारणीभूत होते. शुद्धलेखनाने प्रमाण भाषेतील बदलाकडेही लक्ष द्यावयाचे असते आणि तिच्या स्थिरतेलाही जपावयाचे असते. शुद्धलेखनाचे ते भाषाशास्त्रीय (आणि समाजशास्त्रीय) कार्य आहे. अर्थात बदलाप्रमाणे बदलत जाणे आणि स्थिरतेला साह्यभूत होणे अशी परस्परविरुद्ध उद्दिष्टे शुद्धलेखनाला सांभाळावी लागतात. मग, काही नियमसंच या उद्दिष्टाला तर काही नियमसंच त्या उद्दिष्टाला महत्त्व देतात. शिवाय, केव्हा किती महत्त्व द्यावयाचे याबद्दलही मतभेद असतात, मिळून अनेक नियमसंच अस्तित्वात येतात.

उदा. परंपरागत शुद्धलेखन स्थिरतेला अधिक महत्त्व देते आणि सर्व सुधारणावादी शुद्धलेखने स्थिरतेसह बदलांकडेही कमी-अधिक लक्ष पुरवतात. प्रमाण भाषेचे लिखित रूप आणि भाषित रूप यात मुख्यतः फरक पडत जातो. तो कमी करणे हे बहुतेक सर्व सुधारणावादी शुद्धलेखनांचे एक उद्दिष्ट आहे. पैकी महामंडळाच्या प्रचलित शुद्धलेखनाची तुलना जर १९३० च्या म.सा.परिषदेच्या शुद्धलेखनाशी केली, तर महामंडळाचे प्रचलित शुद्धलेखन सापेक्षतः १९३० च्या म.सा.परिषदेच्या शुद्धलेखनापेक्षा, प्रमाण भाषेच्या लिखित स्वरूपाला भाषित











स्वरूपाकडे अधिक आणू पाहते.

विविध नियमसंचांना आणखीही कारणे आहेत. पण ज्यांचा प्रमाण भाषेशी संबंध आहे, अशा मुख्य कारणांचाच वर विचार केला आहे. प्रमाण भाषेतील काही रूपांची नि पर्यायांची निवड करूनच नियमसंच तयार होतात असे वर म्हटले आहे. त्याचा अर्थ असा नव्हे की प्रमाण भाषेत अस्तित्वात नसलेले कोणतेही रूप किंवा कोणताही पर्याय नियमसंच पुरस्कारीत नाहीत. जेव्हा नियमांचा संबंध लिपीसुधारणेशी येतो आणि लिपीत नवीन चिन्हे आणण्याचा प्रयत्न होतो, तेव्हा प्रमाण भाषेत अस्तित्वात नसलेले रूप किंवा पर्याय नियमसंचाने पुरस्कारला जातो. उदा. सावरकरी-विनोबांची ऱ्हस्व वेलांटी ि वगैरे. बरेच पारिभाषिक शब्दही नव्यानेच शुद्धलेखनात येतात.

शेवटी, शुद्धलेखनाचे नियम आणि शुद्धलेखनाचा व्यवहार यांत फरक केला पाहिजे. नियम प्रमाण भाषेवर आधारलेले असतात आणि व्यवहार, नियमांवर व प्रमाण भाषेवर आधारलेला असतो.

उदा. महामंडळाच्या नियमांप्रमाणे घरी, जाताना, झोप, पाच (संख्या), पांढरी (फुले) वगैरे शब्दांत चौथ्या नियमाप्रमाणे शीर्षबिंदू नको. शीर्षबिंदू नाकारणारा हा नियम प्रमाण-भाषेवरच आधारलेला आहे. पण नीतीचे की नीतिचे, गुरूने की गुरुने यासंबंधी महामंडळाच्या नियमांत स्पष्ट आदेश नाही. शब्दाला विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लागल्यावर शब्दातील इकार उकार दीर्घच राहतो, असा नियम महामंडळाने दिलेला नाही. तेथे प्रमाण-भाषेवर अवलंबून राहून तो नियम अध्याहृत धरावा लागतो. अर्थात 'नीतीचे' आणि 'गुरूने' असे लेखन करावे लागते.

**सारांश :**

(१) प्रमाण-भाषेची पुढील मुख्य लक्षणे सांगता येतील :- (अ) ते भाषेचे एक रूप असते. सभा-संमेलने, नियतकालिके, ग्रंथ, आकाशवाणी, विधिमंडळे, कायदेकानून वगैरे ठिकाणी ती बहुधा वापरली जाते. (आ) तिचे संपर्कक्षेत्र भाषेच्या जातीय, प्रांतीय वगैरे रूपांपेक्षा जास्त असते आणि ते स्थल-काल-दृष्ट्या अधिक पसरलेले असते. (इ) ती भाषेचे एक रूप असली तरी तिचीही अनेक रूपे असतात. तीही प्रवाही आणि परिवर्तनशील असते. मात्र, मुख्य भाषेपेक्षा तिची रूपे, प्रवाहित्व नि परिवर्तनशीलता ही कमी असतात. (ई) भाषा विकास पावत असता तिच्या एका उन्नत अवस्थेत प्रमाण भाषा हळूहळू जन्म घेते.

(२) शुद्धलेखनाच्या नियमांचा कोणताही संच प्रमाण-भाषेवरच अवलंबून असतो.

(३) प्रमाण-भाषेतील विविधतेत निरनिराळ्या नियमसंचांच्या जन्माला वाव मिळतो.

(४) शुद्धलेखनाची विविध उद्दिष्टे ही निरनिराळ्या नियमसंचांच्या जन्माचे कारण असू शकतात. ही उद्दिष्टे प्रमाण भाषेच्या प्रवाहित्वाशी, परिवर्तनशीलतेशी नि स्थिरतेशीही निगडित असतात.



अनुक्रमणिका







(५) शुद्धलेखनाचे 'नियम' प्रमाण-भाषेवर आधारलेले असतात आणि शुद्धलेखनाचा प्रत्यक्ष 'व्यवहार' विशिष्ट नियमसंच आणि प्रमाणभाषा यांवर आधारलेला असतो.

(डॉ. द. न. गोखले, सहवास सोसायटी, कर्वेनगर, पुणे)

*

---

## साभार स्वीकार

### आयुर्वेद

* **पाचभौतिक चिकित्सा भाग १**– आयुर्वेदाचार्य आत्मारामशास्त्री वामन दातार, ७४७, गावभाग, सांगली, ४१६४१६ २-१९९०. पृष्ठ ३७४. एकशेवीस रुपये.

* **पांचभौतिक चिकित्सा आणि बालरोग**– आत्माराम वामन दातार, ७४७, गावभाग, सांगली. १-१९८९, पृष्ठे १२०. तीस रुपये.

* **गोवर आणि कांजिण्या**– आत्माराम वामन दातार, ७४७, गावभाग, सांगली. १-१९९०, पृष्ठे ४०. बारा रुपये.

### प्रवासवर्णन

* **काबूलनामा**– फिरोझ रानडे, श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०. पृष्ठे २००. ऐंशी रुपये.

* **न संपणाऱ्या गोष्टी**– बाळ सामंत, श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०. पृष्ठे १४०. साठ रुपये.

*



अनुक्रमणिका







पुस्तक परिचय :

# शुभवर्तमान : वसंत डहाके

## दुर्बोधतेला छेद देणारा कवी

**प्रा. नंदकुमार भगत.**

मराठी काव्याच्या प्रांगणात कवी भरपूर, काव्य कमी अशी अवस्था आज आहे.

त्र्यं. वि. सरदेशमुख म्हणतात, "विक्षिप्त पदबंध, थोट्या-पांगळ्या प्रतिमा, पोखरलेल्या आशयाचे कवडसे या सगळ्यांना ऐसपैस जागा देणारा रटाळ गद्यछंद इतका जोगावला की, अर्थ, भाव आणि गती हातोहात गमावण्यात कवितेला कसलीच हानी जाणवली नाही. शब्दांची बोचकी बांधून ठेवण्यात. कवींची जणू चढाओढ लागली. ती सोडून पाहायला कोणी राजी नव्हते. कविता वाचणे कष्टदायक झाले." (धुके आणि शिल्प-पृष्ठ ४९)

मराठी कवितेतील दुर्बोधतेवर सरदेशमुखांनी अचूक बोट ठेवले आहे. मर्ढेकर व ग्रेस यांनी मराठी काव्याला नवे स्वरूप दिले. मात्र या नव्या स्वरूपाचा अतिरेकी वापर झाला. त्यामुळे मराठी कवितेत दुर्बोधता जास्त आली. या दुर्बोधतेतून कवितेला मोकळे करणे गरजेचे होते. हे कार्य 'शुभवर्तमान' (वसंत आबाजी डहाके) या संग्रहाने केले. काव्यसंग्रहाच्या नावाप्रमाणेच मराठी कवितेच्या प्रांगणातले हे वर्तमान शुभ, मांगल्ययुक्त, सुबोध आहे. सुबोध या अर्थाने की, कवितेवर आरूढ झालेले दुर्बोधत्व येथे कमी झालेले दिसते.

ज्या वर्तमानात आपण जगतो, जीवनाचे अनुभव घेतो, त्या वर्तमानकाळाचे अगदी सहजतेने शब्दांकन केले आहे.

'शुभवर्तमान' मधील विविध कवितांमध्ये एकसमान असे वास्तव उभे आहे. यातील कविता वर्तमानातील, वास्तवतेच्या अनुभवाला समोर ठेवून लिहिलेल्या आहेत.

'प्रतिवादी' या दीर्घ कवितेत आजच्या समाजातील बेकायदेशीरपणा मांडलेला आहे. एकीकडे कायद्याचे राज्य आहे अशी हाकाटी पिटायची व दुसरीकडे मात्र बेकायदेशीरपणाला मोकाट रान द्यायचे, नको तेथे नको त्या व्यक्तींना आडवायचे हे 'बेकायदेशीर' स्वरूप येथे रेखाटले आहे. आजच्या समाजातील कायद्याच्या राज्याबद्दल उपरोधपूर्ण भाष्य येथे आढळते. 'नटासाठी पार्श्वसूचना' ही कविताही आजच्या समाजवास्तवावर प्रकाश टाकणारी आहे. सर्वसामान्य माणसाला जगाच्या रंगभूमीवर शब्द न उच्चारताच जगावे लागते. अनेक वेळा अज्ञानी, अडाणी अवस्थेत जगावे लागते. गद्यप्राय लेखनातून अचूक पण सहज अशी भाव-निर्मिती येथे झाली आहे. "मग तू हसण्याचा प्रयत्न करशील, चेहरा क्षणभर वेडावाकडा होईल. तुला हसता येत नाही आहे. मग तू एकदम जबडा उघडून बोलू पाहशील या शतकात."

आजच्या जीवनात संप, मोर्चे यांचे प्राबल्य नेहमीच आढळते. अशाच एका मोर्चाचे



अनुक्रमणिका








स्वरूप व त्या वेळची मनाला अस्वस्थ करून टाकणारी शांतता, त्या काळातले समाजजीवन 'नोर्चा' कवितेत रेखाटले आहे.

आजच्या समाजात व्यक्तीला वागणूक कशी दिली जाते याचे चित्रण 'यंत्रणा' या कवितेत आहे. सर्वच समाजात अशा 'यंत्रणा' आज अस्तित्वात आलेल्या जाणवतात. अनेक वेळा लोकांच्या मनात या यंत्रणेविषयी विरोधाचा सूरही असतो, पण लोक बोलत नाहीत. 'लोक' या कवितेतील पुढील ओळी पहा-

"लोक नुस्ते कुरकुरत राहतात, अंधाऱ्या आडोशात दडून,
करत काहीच नाहीत."

लोकांच्या संयमी अथवा स्तब्ध वृत्तीवर सहजतेने प्रहार करीत कवी शेवटी म्हणतो,

"लोक स्तब्ध असतात
कोऱ्या कागदासारखे."

अशा सहजतेने डहाके आजच्या सामाजिक वास्तवाचे, त्यात अनुभवलेल्या घटनांचे चित्रण करतात. असे चित्रण करताना कधी कधी ते नकळत अस्तित्वाच्या जवळही जातात.

उंदीर मारण्याचं औषध आहे का ?
तर, नाही, दुकानदार म्हणाला,
आजकाल आम्ही ठेवीत नाही. _
_ मग मी उंदीर पकडण्याचा पिंजरा विकत घेतला.
प्रथम मुलीला आत टाकलं,
मग बायकोला ढकललं _
(उंदीर मारण्याचं औषध)
गोळीबार, बाँबहल्ले असे रोजच.
मग एकदा असं छापून आलं.
जनतेचा गोळीबार. पोलीस ठार
सरकार भयभीत.
(वृत्तपत्र)

असे चित्रण करताना डहाके अनेक वेळा आत्मनिष्ठतेच्या पातळीवर जातात. "नव्या सत्राच्या आरंभी वर्गातल्या मुलांना उद्देशून" या कवितेत स्वतःविषयी बोलू लागतात. आजच्या भयाण वास्तवात जगताना सर्वत्र 'व्यर्थ'पणा जाणवतो. त्याविरुद्धचा झगडा निकामी ठरतो.

आता, ही जी वेळ आहे,
हात मागं बांधून
डोकं खाली झुकवण्याची
ती



अनुक्रमणिका







अटळ आहे.(व्यर्थ)

अशीच निराशा कवी 'सरतेशेवटी' याही कवितेत व्यक्त करतो.

एकीकडे सामाजिक वास्तवाचे भान या कवितांत आहे. तर दुसरीकडे मानवी मनाची व जीवनाची असहाय्य तडफड व्यक्त झालेली आहे. हे सर्व रेखाटताना अवजड प्रतिमा कवी टाळतो.

त्यात काव्यनिर्मितीचा डामडौल अथवा हव्यास नाही. जे जाणवलं ते त्या पातळीवर ठेवून रेखाटलं. ते मग 'नारायणरावाच्या खूनासंबंधी' असो अथवा स्वतःच्या घराविषयी. कवी सर्व भावना अगदी सहजतेने रेखाटतो.

(शुभवर्तमान : वसंत आबाजी डहाके, मौज प्रकाशन, मुंबई. पस्तीस रुपये)

प्रा. नंदकुमार भगत

# वाडा चिरेबंदी : एलकुंचवार

## संक्रमणातील समाजस्थितीचे हृद्य दर्शन

प्रा. सदाशिव कुल्ली

'वाडा चिरेबंदी' नाटक पाहताना बहुतेक प्रेक्षकांना आपल्याच घरातील मागच्या पिढीची जीवनकथा पाहत असल्यासारखे वाटून, पुनःप्रत्ययाचा आनंद झाला असेल. त्याचबरोबर आपल्याही एकत्र कुटुंबाचे विघटन होऊन चौघेजण चार दिशांना गेल्याचा दारुण भूतकाळ आठवून दुःखद स्मृती चाळवल्या गेल्या असतील. प्रेक्षकांतील अनेकजण सुधीरमध्ये किंवा अभयमध्ये स्वतःला शोधत असतील. समाजवास्तवाचे असे प्रातिनिधिक आणि प्रभावी चित्रण 'वाडा चिरेबंदी'मध्ये एलकुंचवारांनी केले आहे.

प्रस्तुत नाटकात झालेला एलकुंचवारांच्या लेखनातील बदल स्वागतार्ह आहे. कारण याआधी त्यांच्या नाटकावर कधी विकृत लैंगिकतेची छाया पडलेली दिसते; उदा. गार्बो, वासनाकांड; तर कधी रोगट हिंस्रतेने माणसांचे मुखवटे ओरबडण्याची प्रवृत्ती दिसते. उदा. रुद्रवर्षा, होळी; तर कधी आत्मकेंद्रित मनोवृत्तीतून तात्त्विकतेचा आभास उभा केलेला दिसतो; उदा. प्रतिबिंब, एका म्हाताऱ्याचा खून, सुलतान. पार्टी या नाटकापासून ते वास्तवाच्या पातळीवरून समाजदर्शन घडवायला लागले. शिवाय 'पार्टी'मध्ये राजकीय वास्तवाचे भान त्यांना आलेले दिसते. झुंबर, कैफियत आणि पार्टी या त्यांच्या सर्वोत्तम साहित्यकृती ठराव्यात. त्यांच्या जाणिवेचा एकूण प्रवास नागमोडी वळणाचा दिसतो. व्याकुळ काव्यात्मकता, कलाबाह्य प्रेरणांना बळी न पडण्याची वाङ्मयनिष्ठा, प्रत्ययकारी स्वभावचित्रण, नाट्याची सूक्ष्म समज, तीक्ष्ण संवाद आणि नितळ, कातीव भाषाशैली इत्यादी महत्त्वाची वैशिष्ट्ये त्यांच्या










बहुतेक सर्व लेखनात आढळतात.

वाडा चिरेबंदीमध्ये या वैशिष्ट्यांसोबत माणसांच्या दु:खाकडे, दोषाकडे पाहण्याचा एक परिपक्व, समंजस दृष्टिकोण दिसतो. वाडा चिरेबंदीमध्ये त्यांनी सरंजामी जीवनव्यवस्थेच्या ऱ्हासाचे शोकात्म दर्शन हृद्यपणे घडविले आहे.

वऱ्हाडातील धरणगावच्या मालगुजार तात्यासाहेब देशपांड्यांचा भला मोठा चिरेबंदी वाडा. पिढ्यानुपिढ्या शेतावरची कुळे घाम गाळून, त्यांना बसल्याजागी उत्पन्न आणून द्यायची. त्यातून वाड्याचे वैभव वाढले. प्रतिष्ठा वाढली. पण त्याचबरोबर बसून खाण्याची सवय लागली. निष्क्रियता आली. बदलत्या काळाची पावले, बंद वाड्यातील माणसांना ऐकू येईनाशी झाली. काळ बदलला. मालगुजारी गेली. कूळकायद्यात जमिनी गेल्या. उत्पन्नाचे झरे आटले. पण घराण्याच्या मोठेपणाची झूल अंगावर चढवलेली असल्याने खर्च कायमच राहिला. आपले वैभव चिरकाल टिकणार या कल्पनेने व्यवहाराला पारखी झालेली ही माणसे आळशी, दुबळ्या मनाची, शिक्षण-उद्योग यांचे महत्त्व न कळणारी अशी होतात. वाढत्या खर्चापायी हळूहळू जुनी एक-एक चीजवस्तू गहाण पडायला लागते. वाड्याला अवकळा येते. व्यंकटेशतात्यांचा मृत्यू होतो. अंत्यविधीसाठी मुंबईला नोकरी करण्यास गेलेला धाकटा मुलगा सुधीर व त्याची कोकणस्थ पत्नी गावी येतात. तात्यांच्या श्राद्धाच्या निमित्ताने सगळ्यांच्या मनातील असंतोष, अतृप्त आकांक्षा यांचा उद्रेक होतो. दागिन्यांचा डबा घेऊन रंजू मास्तरबरोबर पळून जाते. श्राद्धखर्चासाठी वाड्याचा एक भाग विकावा लागतो. तो वाड्याचा भाग पाडण्यासाठी, बुलडोझर येऊ लागतो आणि त्या प्रचंड घरघराटात दादीचे 'व्यंकटेशा व्यंकटेशा' हे करुण आक्रंदन दबून जाते.

एका संक्रमणावस्थेतील समाजस्थितीचे प्रभावी चित्रण या नाटकात आढळते. कृषिप्रधान अर्थव्यवस्थेवर, ग्रामप्रधान समाजरचनेवर आणि पुरुषप्रधान- एकत्र कुटुंबव्यवस्थेवर आधारलेल्या सरंजामी समाजरचनेला, ब्रिटिशांच्या काळातच तडे जाऊ लागले. उद्योग-व्यापारप्रधान, शहरी आणि विभक्त कुटुंबावर आधारलेली भांडवली समाजरचना आकार घेऊ लागली. या संक्रमणाची चाहूल् महाराष्ट्रात सर्वप्रथम ब्राह्मण जातीला लागली. तिचे झपाट्याने शहरीकरण झाले. जे नव्या परिस्थितीशी जुळवून घेऊ शकले नाहीत त्यांना वाईट दिवस आले. स्वातंत्र्यानंतर पंधरा-वीस वर्षे ब्राह्मण जातीत ही प्रक्रिया सुरू होती. आज ही प्रक्रिया ब्राह्मणांमध्ये अपवादाने आणि मराठा-देशमुख वगैरे मंडळीत सार्वत्रिकपणे दिसते आहे.

सामाजिक नियतीचा हा प्रचंड बुलडोझर आंधळ्या गतीने पुढे सरकत होता आणि परंपरा, जुने आदर्श, रक्ताची नाती, मानवी मूल्ये यांना चिरडून टाकीत होता. माणसांची मुळे उखडून त्यांना इतस्ततः भिरकावून देत होता. एलकुंचवारांचे वैशिष्ट्य क़ी, एखाद्या तात्कालिक समस्येमुळे ही माणसे उद्ध्वस्त होतात असे न दाखवता त्यांनी एकूण आंधळ्या सामाजिक गतीकडे बोट दाखवले आहे. प्रतिष्ठा, कुळाचार, व्यसने या गौण कारणांना ते जबाबदार धरत

नाहीत, तर अटळ सामाजिक नियतीला जबाबदार धरतात. सर्व भारतभर हे संक्रमण घडले आहे. भारतात घडलेल्या अंध भांडवली संक्रमणावस्थेच्या रोलरखाली अगणित कुटुंबांची वाताहत झाली; जीवनातील आनंद हरवून, अगतिक बनली. शेकडो वर्षांच्या परंपरेत जे काही सुंदर, उदात्त, मानवी असे जपण्यासारखे होते, त्याचे तुकडे तुकडे झाले. समाजवादी देशात भांडवलशाहीकडून समाजवादाकडे जाताना एक दिशा, नियोजनबद्धता, भविष्यातील सुखाची हमी असते. इथे मात्र आंधळ्या, अराजक पद्धतीच्या संक्रमणाने धड सरंजामी नाही, धड भांडवली नाही. ना धड पारंपरिक, ना धड आधुनिक असे विकृत आकार समाजाला प्राप्त झाले.

वाडा चिरेबंदी या नाटकाचे मोठेपण समाज वास्तवाच्या प्रभावी चित्रणात, संक्रमणावस्थेतील कुटुंबसंस्थेच्या शोकात्म दर्शनात तर आहेच, त्याशिवाय या नाटकाला आणखी एक परिणाम आहे. सरंजामी समाजव्यवस्थेचा ऱ्हास अटळ होता. त्याचे समर्थन लेखक करीत नाही. परंतु कोसळणाऱ्या चिरेबंदी वाड्याच्या प्रचंड चिऱ्यांखाली परंपरेतील सत्त्वशीलता, भावबंधांची कोवळीकता गाडली जात आहे हे पाहून तो व्याकुळ होतो. या नाटकाचे केंद्र जुन्या-नव्या समाजव्यवस्थांचा संघर्ष हे नाही. पिढ्यानुपिढ्यांचे सत्त्वसंपन्नतेचे मोलाचे आणि जपण्यासारखे धन ही जुनी व्यवस्था टिकवू शकली नाही. आणि छचोर भांडवली संस्कृतीलाही ह्या सांस्कृतिक धनाची किंमत कळू शकत नाही. त्या प्राचीन सत्त्वशीलतेचा, त्या भोळ्या माया-ममतेचा आक्रोश, हे वाडा चिरेबंदीचे मुख्य केंद्र आहे.

ह्याचे प्रतीक म्हणजे ह्या नाटकातील दादी, आई, वहिनी या स्त्रिया. इथे त्या साध्या स्त्रिया न राहता गूढ मातृदेवता बनल्या आहेत. पिढ्यानुपिढ्या माणसांनी एकमेकांसाठी केलेला त्याग व निरपेक्ष प्रेम यांचे त्या प्रतीक बनल्या आहेत. दुःख आणि हालअपेष्टा सोसूनही आपले आयुष्यभराचे संचित नंतरच्या पिढीला देऊन रिते व्हायचे, ही या मातृदेवतांची सनातन परंपरा असते. वहिनी जेव्हा सर्व दागिने अंगावर घालते तेव्हा तिला पूर्वीच्या पिढ्यांच्या स्त्रियांचे हात मायेने आपल्या अंगावरून फिरत असल्याचा भास होतो आणि भविष्यात आपली मुलगी हे दागिने अंगावर घालेल तेव्हाही आपण असण्याचा भास तिला होईल, अशी विलक्षण अनुभूती वहिनीला येते. या प्रसंगात ती सामान्य मानवी पातळीवरून मातृदेवतेच्या अतिमानवी, गूढ पातळीवर जाते. जीवनाचे हे सातत्य आणि परंपरेतील सत्त्वशीलता पाहून आपण मुग्ध होऊन जातो. आणि अटळपणे सामाजिक नियतीच्या वधस्तंभाकडे होणारा त्यांचा प्रवास पाहून गलबलून जातो. शेवटच्या प्रसंगात तर माय ओट्यावर येऊन बसते तेव्हा जणू गिलोटिनच्या पात्याखाली बसण्यासाठी ती आली आहे, असे वाटते.

उत्तम वाङ्मयकृती ही त्या काळाचे समाजजीवन स्पंजाप्रमाणे शोषून घेत असल्याने ती कधी सामाजिक दस्तऐवजाचे कार्य करते. वाडा चिरेबंदीने सूचकपणे काही सामाजिक भविष्येही वर्तवली आहेत. उदा. मुंबईला नोकरीसाठी स्थायिक झालेल्या सुधीरचा मुलगा अभय खेड्यातील शिक्षणात मागे पडलेल्या आपल्या चुलत भावाकडे तुच्छतेने पाहतो; त्याचा भाऊ असल्याची लाज बाळगतो व गावाकडून आणलेला नोकर म्हणून इतरांना त्याची

ओळख सांगणार असतो. आज उच्च राहणीमानाच्यामागे पिसाटपणे धावणारी शहरी पिढी ग्रामीण जनतेला-एवढेच नव्हे, तर देशालाही, विसरून 'स्टेट्स'चे ग्रीन कार्ड मिळवण्याची धडपड करते आहे. भारतीय म्हणवून घेण्याची लाज बाळगते आहे.

या सामाजिक आशयाचा आविष्कार नाट्यपूर्ण प्रसंगातून आणि लहानसहान तपशिलांतून झाला आहे. चिरेबंदी वाडा जुन्या व्यवस्थेचे प्रतीक आहे. वाड्यासमोरील बंद पडलेल्या ट्रॅक्टरचे धूड हे वाड्याच्या पोकळ प्रतिष्ठेचे व गतिशून्यतेचे प्रतीक. त्यात या माणसांच्या आयुष्याचे वस्त्र अडकून फाटते, तर कधी त्याचा गंजलेला पत्रा लागून ही माणसे जायबंदी होतात. दागिन्यांचा डबा हे परंपरेच्या संचिताचे व घराण्याच्या अब्रूचे तर बुलडोझर निर्घृण सामाजिक गतीचे, नियतिचे प्रतीक. दीदी हे काळाचे भान नसलेल्या पिढीचे आणि तिचे 'व्यंकटेशा' हे आक्रंदन एका अस्तंगत होणाऱ्या युगाच्या वेदनेचे प्रतीक आहे. मुख्य म्हणजे ही प्रतीके भोवतालच्या कौटुंबिक, सामाजिक वातावरणातून सहजपणे आलेली आहेत. आशयाशी एकजीव झालेली आहेत.

वाडा चिरेबंदी पाहत असताना गुरुदत्तच्या 'साहिब, बीबी और गुलाम' ह्या चित्रपटाची आठवण होते. गुरुदत्तने तिथे बंगालमधील बड्या जमीनदार घराण्यांची शोकांतिका दाखवलेली आहे. बडी हवेली आणि त्यातील सत्त्वसंपन्न छोटी बहू यांचे शोकात्म दर्शन घडवले आहे. तशी प्रगल्भता एलकुंचवारांनी इथे दाखवली आहे.

चेकॉव्हच्या 'चेरीचा बाग' या नाटकाच्या शेवटी, जुन्या व्यवस्थेचे प्रतीक असलेल्या चेरीच्या बागेवर बसणारे कुऱ्हाडीचे घाव ऐकू येतात. पण त्या उद्ध्वस्त होणाऱ्या जुन्या बागेनंतर धैर्याने व आशावादाने नव्या बागेचा संकल्पही सोडला जातो. 'पार्टी' लिहिणाऱ्या एलकुंचवारांना भारतातही ढासळलेल्या चिरेबंदी वाड्याच्या जागेवर नवे घर उभारण्याचा संकल्प सोडला जात असल्याचे दाखवता येईल का ?

(प्रा. सदाशिवकुल्ली गोकुळपेठ, कर्नाटक संघासमोर, नागपूर)

---

# माझ्या पृथ्वीवर : प्रसन्नकुमार पाटील

## रोमँटिक वृत्ती आणि प्रखर वास्तव यांच्यातील संघर्ष

प्रा. सुधीर जोशी

---

'श्रीरंग', 'घोडे' यापाठोपाठ प्रसन्नकुमार पाटील यांचा 'माझ्या पृथ्वीवर' हा सप्टेंबर ८९ मध्ये प्रकाशित झालेला तिसरा कवितासंग्रह आहे. हा कवी मुळात रोमॅन्टिक वृत्तीचा आहे. आणि तरीही वास्तवाशी दोन हात करण्याची त्याला अनावर खुमखुमी आहे. रोमॅन्टिक स्वप्नाळू वृत्ती आणि अस्वस्थ करणारे वास्तव दर्शन, यांच्यामुळे मनात सतत संघर्ष उसळत असतो. लेखणी कल्पनाविलासाकडे ओढ घेते आणि मन मात्र वास्तवाने पोळून निघते. अशा वेळी



अनुक्रमणिका






कल्पनारम्य लेखन म्हणजे वास्तवाशी केलेला व्यभिचार असे वाटते.

या संग्रहातील कविता सत्याला सामोऱ्या जाणाऱ्या आहेत. मात्र सत्याला आपल्या कवेत घेणाऱ्या आहेत, असे मी म्हणणार नाही. कारण भोवतालची विषमता, दारिद्र्य, व्यभिचार, माणूसपण गहाण टाकून करावा लागणारा उदरनिर्वाह, एकाच माणसाची कल्पनेतही न येणारी अनेक रूपे हे भयानक वास्तव व्यक्त करताना आपली मराठी भाषा अगदी बापुडवाणी होऊन जाते. म्हणून मी म्हणतो ही कविता सत्याला सामोरी जाते. सत्याला कवेत घेत नाही.

कवी प्रसन्नकुमारांच्या कवितेचा भाषिक अवकाश मला मोठा जाणवतो, त्याचे कारणही तेच आहे.

देहाचे कलम । देहालाच केले
रोपटे वाढले । नभावेरी
मोगरा फुलला । मोगरा फुलला
आतून किडला । ज्ञानदेवा !

ईश्वरी साक्षात्काराचे क्षण, पराकोटीच्या आनंदाचे क्षण शब्दबद्ध करताना ज्ञानोबांनी जी प्रतिमा स्वीकारली, तीच प्रतिमा कवीने स्वीकारून, जीवनातील शोकात्म अनुभव व्यक्त केला आहे. पूर्वसूरींच्या कवितेला गूढतेचा स्पर्श आहे. त्यांचे शब्द, त्यांचे अर्थ भिडत असतानाही अनामिक गूढता जाणवते. पण त्याच प्रतिमा स्वीकारून, त्यांना वास्तवाचा संदर्भ देऊन, प्रसन्नकुमारांनी जीवनातील शोकात्म जाणीव व्यक्त केली आहे.

काही कवितांचे विडंबन हे मूळ कवितेच्या गांभीर्याला धक्का न लावता आपली शोकात्म आणि वैफल्याची जाणीव व्यक्त करते. पूर्वसुरींच्या प्रतिमांचा इतका समर्पक वापर क्वचितच आढळत असेल !

ईश्वराला संबोधून सहा-सात कविता आहेत. आतापर्यंत ईश्वराला 'दयाघन', 'सर्व सुखाचे आगर', 'सत्यसंकल्पाचा दाता', 'उदार' इत्यादी विशेषणेही लावली गेली. कवीने 'कामू-काफ्कापासून' या कवितेतही त्याला 'उदार' हे विशेषण लावले आहे. पण ते ईश्वराला बोचेल असे आहे. कवीला मानवी जीवन असंबद्ध वाटते. अनेक गुंत्यांची गुंतावळ त्याला जाणवते. 'तर्काच्या कात्रीने अधिकच वाढणारा, श्रद्धेने अनाकलनीय ठरणारा' असा हा गुंता आहे. या गुंत्याशिवाय ईश्वराने काहीच दिले नाही; इतका तो 'उदार' आहे ! हा ईश्वरही सुखाचा सोबती आहे. पण बलात्कार घडत असताना, संकट प्रसंगी मात्र तो पलायन करतो. म्हणून कवी त्याला 'भंकस की अवलाद' म्हणतो. हा ईश्वर भिकारणीच्या पसरलेल्या हातात गुदमरताना दिसतो आहे. ही ईश्वराची कवितागत अवस्था म्हणजे ईश्वर मानवी समस्यांना उत्तरे देऊ शकत नाही याचे द्योतक आहे !

या कवितांत तळहातावरील रेषांचा उल्लेखही बऱ्याच वेळा येताना दिसतो. माणसाची दैवाधीनता, त्याची असहाय्य अवस्था, त्याचे फिके प्राक्तन दाखविण्यासाठीची ही एक परिणामकारक योजना कवीने केलेली दिसते. या कवितांत येणाऱ्या 'सूर्य', 'रक्तसमुद्र' अशा



अनुक्रमणिका







काही प्रतिमा मराठी विद्रोही कवितेशी नाते सांगणाऱ्या आहेत. 'जन्माला घालणाऱ्यानेच हिसकावून घेतला माझा सूर्य जन्मतःच' किंवा 'हे कर्वती वारे थरथरवत नाहीत माझ्या रक्तसमुद्राला'.

'भिंगरपावले','अस्तित्व कमळ','संगमरवरी उरावर','जीव मयूरावा','बुद्ध करुणा'असे शब्दप्रयोग आपला अनुभव अधिक नेमकेपणाने व्यक्त करण्यासाठी कवीने केले आहेत.

अभंगसदृश, ओवीबद्ध आणि भावगीत रचना यात सहजता जाणवते. बाकीच्या कविता तुलनेने तितक्या 'सहज' आहेत असे वाटत नाही. इतर कविता वाचताना अनुभव व्यक्त करण्याची असोशी जाणवते.

अनेकांनी दुःखप्राप्तीने कविता केल्या असतील, अनेकांनी दुःखाच्या कविता केल्या असतील. पण 'दुःखाचं स्वागत' करणाऱ्या कविता एकूण दुर्मिळच.

दुःख व्हावा सखा
दुःख व्हावा भ्राता
कर्ता करविता
तोची व्हावा_ ॥
दुःखानेच माझे
जळावे मीपण
जावे उल्लंघून
मीच मला_! ॥

अशी कविता कविमनाची ओळख पटवते. अशी कविता 'माझ्या पृथ्वीवर'च होऊ शकते! म्हणूनच ती मदर तेरेसाला अर्पिली जाते!!

(माझ्या पृथ्वीवर : प्रा. प्रसन्नकुमार पाटील, प्रचार प्रकाशन, कोल्हापूर, बत्तीस रुपये)

(प्रा. सुधीर जोशी, सन्मित्र प्रकाशन, कॉमर्स कॉलेज समोर, कोल्हापूर)

---

# 'सूर्याखालची वस्ती'

## नवोदित कवींच्या प्रतिभेची झलक

---

**प्रा. पी. जे. भानुशाली**

---

'सूर्याखालची वस्ती' हा नवोदित कवींचा संग्रह ६३ व्या अखिल भारतीय मराठी संमेलन प्रसंगी प्रसिद्ध झाला.

कवींची ही सूर्याखालची वस्ती विविधरंगी, विविधढंगी आहे. यातून सुखदुःखाचे कृष्ण-धवल, तसेच मानवता क्रौर्याचे पारदर्शी-गडद रंगही व्यक्त होतात. दुःख ही मानवी



अनुक्रमणिका






जीवनातील सनातन भावना. या दुःखघटितांचे निःश्वास येथे अनेक कवितांतून जाणवतात. मंजुषा मेंगे यांची निनावी कविता वाचकांना अंतर्मुख करून जाते.

"काही दिले, काही ल्याले, काही तृप्त रिते झाले.
सुखदुःख झुलवून, क्षण पाचोळा जाहले.
सारं सोसणं असंच, अनंताच्या वाटेवर.
रातदिन वहायाचा असा अतर्क्याचा भार."

महेंद्र इनामदारांची आजी सुरकुतलेल्या हातांनी चंद्रमौळी घरात पावसाला थोपविण्याचा प्रयत्न करते, तेव्हा दुःखावर मात करण्याची धडपडच व्यक्त होताना दिसते. अश्रूंचे वय विचारणाऱ्या भगवान भोईरांनाही 'आसवं अशीच जलमत्यात राजा, आपुन आसवांची मान्सं' असे वाटते. हे दुःख अनेक रूपांत अवतरते. व्यक्तिपरत्वे ते वेगळे असते. मैत्रिणींची लग्ने होतात. त्यांचा वेल मांडवावर चढतो. मग आपल्याच संसाराचं असं मातेरं का व्हावं अशी खंत करणारी अभागी स्त्री येथे भेटते. 'आसवांत आता भिजली पंढरी दुःख वारकरी माझ्यासाठी' असे प्रभाकर शेळके सांगतात. या दुःखातूनही माणूस सुख शोधण्याचा प्रयत्न करीत असतो. आणि 'जरी दुःख भरपूर, अमुच्या उरात आहे, तरी आमचे गाणे सुरात आहे' ही भावना तो व्यक्त करीत असतो.

'सूर्याखालची वस्ती' हे शीर्षकही बोलके आहे. अनेक कवितांतून सूर्याची प्रत्ययकारी प्रतीके भेटतात. ('सूर्यफूल', 'सूर्य अस्ताला जाताना', 'सखी', 'संदर्भ', 'निश्चय', 'एकेक तेजाचा किरण', 'ग्वाही' इ.) दत्तात्रय लडकरांचा सूर्य पोटाच्या आगीतून जन्म घेतो. संतोष वझेंचा सूर्य मानवी क्रौर्यातून प्रकट होतो. कधी कधी विषण्ण करणाऱ्या या वस्तीत भुकेच्या पोटी लज्जेचे दान करणारी अभागी स्त्री आहे, बापाच्या जीवावर पोरगा उठलेला आहे. म्हणून कवी देवाला म्हणतो, 'देवा तुझे असे जग हे भयाण, जन्मल्यास जाण तुझा तूच.' आजोबारूपी सूर्याचे अश्रू पुसण्याचा कवी प्रयत्न करतो, तेव्हा चंद्ररूपी आजी त्यांना सोडून गेलेली असते. प्रकाश पाटणकर त्याविषयी म्हणतात,

"एक दिवस काय झालं, माझं मलाच कळलं नाही
सूर्याबरोवर क्षितिजावरती मला चंद्र दिसला नाही."

नश्वरतेच्या गर्तेतून उदात्त तेजाची किरणे प्रस्फुटित होतात. या उदात्ततेचे रूप व्यक्त करताना अरविंद खिरे म्हणतात :

"एकेक किरण तेजाचा, जमवित मी निघालो ।
अंधार जरा थोडासा, उजळीत मी निघालो ॥
हे तोरण माझ्या दारी,
ही देवाघरची वाट, उजळून निघाली सारी ।
हृदयातल्या कळ्यांना फुलवित मी निघालो ॥"

संवेदनशील छायाचित्रकाराने सामाजिक जाणिवेतून विषमतेचे चित्रण करावे तशा या संग्रहातील कविता दगड फोडणाऱ्या पाथरवटाच्या श्रमाचे, सूनसान गावाचे, फूटपाथवरील जीवनाचे, चित्रण करताना दिसतात.

प्रास्तविकात कवी वि.म.कुळकर्णी म्हणतात त्याप्रमाणे हे नवोदित कवी मराठी काव्याची, संस्कृतीची नि भोक्तृत्वाची ही वीणा समर्थपणे पेलताना दिसतात.

(सूर्याखालची वस्ती, प्रकाशक : रमाकांत कवठेकर. ६३ वे साहित्य संमेलन स्वागत मंडळ, पुणे मराठी ग्रंथालय, पुणे २, चाळीस रुपये)

(प्रा. पी. जे. भानुशाली, ३०५/९ समता, काटेमानिवली, कल्याण (पूर्व) ४२१३०६)

# तुमच्याही लक्षात राहील : कोठुरकर

## गेल्या १०० वर्षांतील स्मृतिविषयक संशोधनाचा परिचय

शरच्चंद्र चिंचाळकर

विस्मरणामुळे आपण अनेक वेळा अडचणीत येतो. उदाहरणार्थ जाहीर आभार मानताना, आपण ज्यांची नावे घेणे अगदी आवश्यक होते, अशा एक-दोन व्यक्तींचा उल्लेख करायचेच विसरतो. छत्री, चष्मा, किल्ल्या अशासारख्या वस्तू आपणच कुठेतरी ठेवलेल्या असतात. परंतु अनेकदा हव्या त्या वेळी त्या सापडत नाहीत. विस्मरणाचे असे अनेक अनुभव आपण घेतच असतो.

मात्र विस्मरण अगदी वाईटच असे समजण्याचे कारण नाही. सर्वच गोष्टी आपल्या सारख्याच लक्षात राहू लागल्या तर फार कठीण प्रसंग ओढवेल. विस्मृती हा निसर्गाचा नियम आहे. त्याच्याविरुद्ध उगाच त्रागा करण्यात अर्थ नाही.

शोध घ्यायचा तो आठवणींचा. आपल्याला कसे आठवते, किती आठवते, किती काळ ते लक्षात राहते याचा.

प्रा. वा. कृ. कोठुरकर हे तीन तपांहून अधिक काळ प्रायोगिक मानसशास्त्र या विषयाचे अध्ययन, अध्यापन आणि संशोधन करीत आहेत. मानवी स्मृती हा त्यांचा खास अभ्यासाचा विषय.

'तुमच्याही लक्षात राहील (आठवण-साठवण)' या पुस्तकात त्यांनी मानवी स्मृतीविषयी गेल्या १०० वर्षांत झालेला संशोधनाचा परिचय करून दिला आहे.

आठवण राहणे या अर्थी आपण सर्रास स्मरणशक्ती हा शब्द वापरतो. प्रा. कोठुरकरांना तो शब्द अयोग्य वाटतो. कारण स्मरण ही काही एकजिनसी गोष्ट नाही. वेगवेगळ्या ज्ञानेंद्रियांतून होणारे ज्ञानग्रहण, त्यांचे अल्पकालीन व दीर्घकालीन जतन, त्या ज्ञानाचे योग्य

वेळी स्मरण होणे वा न होणे या सर्व गोष्टींचा समावेश स्मरणात होतो. त्यामुळे स्मरणशक्ती ही एकजिनसी वस्तू मानता येणार नाही असे ते म्हणतात.

लघुस्मृती, दीर्घस्मृती, विस्मरणाचे प्रकार यांचा समावेश मानसशास्त्राच्या पाठ्यपुस्तकात असतोच. परंतु त्यात ज्यांचा अंतर्भाव नसतो अशा अनेक संकल्पनांचे (उदाहरणार्थ क्रियाशील स्मृती) विवेचन या पुस्तकात रसाळपणे मांडण्यात आले आहे.

एबिंग हाऊस याने प्रायोगिक स्मृतिविज्ञानाचा पाया रचला. एक थोर आणि प्रभावी परंपरा निर्माण केली. अर्थहीन शब्दसमूहाच्या (Nonsense syllables) शोधाबद्दल त्यांना नोबेल प्राईझ द्यायला हवे होते असे प्रा. कोठुरकरांना वाटते. या निरर्थक अक्षरसमूहांच्या सहाय्याने एबिंगहाऊस यांनी केलेल्या स्मृतीच्या अभ्यासाची माहिती या पुस्तकात आहेच. परंतु प्रा. कोठुरकरांचे केंब्रिज येथील अध्यापन प्रा. बार्टलेट यांनी स्मृतीच्या अभ्यासाचा चेहरामोहरा हेतुपूर्ण आणि अर्थपूर्ण स्मरणाकडे आणि अध्ययनाकडे कसा वळवला यांचे स्पष्टीकरण आहे. एरव्ही उपेक्षित राहिलेली अर्थपूर्ण स्मरणाची बाजू या ग्रंथात स्पष्ट करून प्रयोगसिद्ध ज्ञान दैनंदिन व्यवहारात कसे उपयोगात आणता येईल हे दाखवले आहे.

मानसशास्त्र हा विषय न शिकलेल्यांना या ग्रंथाचा उपयोग होईल. प्रत्येकाला स्वकष्टाने संपादन केलेले ज्ञान त्याची चाचणी होईपर्यंत तरी जतन करावे लागतेच. हे ज्ञान चांगल्या प्रकारे कसे जतन करावे हे या पुस्तकाने समजेल. महत्त्वाकांक्षी व्यक्तींना आपली स्मृती अधिक तीक्ष्ण व कार्यक्षम करण्याचे तंत्र सापडेल.

मानसशास्त्रात ज्यांना अजिबात गोडी नाही अशांना देखील हे पुस्तक उपयुक्त वाटेल. शेवटी दिलेल्या विषय सूचीतील उद्याची आठवण, कमी श्रमात अधिक चांगले शिका, खूणगाठ, स्मृतीला उपयुक्त ठरणाऱ्या युक्त्या, आपण का विसरतो यासारखे विषय निवडून त्यासंबंधीची पाने वाचली तर मनोरंजनाबरोबर फायदाही होईल.

अवघड संकल्पना मराठीत आणताना रूक्षता, बोजडपणा येणारच. परंतु शक्यतोवर तो टाळून मानवी स्मृती या विषयावरील १०० वर्षांतल्या संशोधनाची माहिती देणारे हे पुस्तक महत्त्वपूर्ण ठरेल.

(तुमच्याही लक्षात राहील : प्रा. वा. कृ. कोठुरकर, ज्ञानप्रबोधिनी प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे ३०३. सव्वाशे रुपये.)

(शरच्चंद्र चिंचाळकर, ४७७ ब/४ अ सुमेधा, पर्वती, पुणे ९)

*

# 'संस्मरणे' : शांता शेळके

## संख्या सूत्राचा अभाव

सौ. आशा भिडे

'वडीलधारी माणसे', 'एकपानी', व 'संस्मरणे' ही शांताबाईंची अगदी अलीकडे प्रसिद्ध झालेली पुस्तके. पाठच्या भावंडाप्रमाणे सारखा तोंडवळा असलेली. ह्याचं अंगातलं त्याला घातलं तरी फिट बसावं इतकी सारखी, बरोबरची.

शांताबाईंना आजपर्यंत आयुष्यात भेटलेली (न भेटलेली पण) माणसं, भावलेली पुस्तकं, स्थळं, एवढंच काय पण एखादी कवितेची सुंदर ओळ, एखादं संस्कृत सुभाषित यावर त्यांनी या तिन्ही पुस्तकातील लेखन केले आहे. 'माझ्या विशिष्ट वाङ्मयीन अभिरुचीचा त्याला संदर्भ जडलेला आहे' असं त्या स्वतःच म्हणतात. कृ. शि. पेडणेकर त्यांच्याबद्दल म्हणतात, "बुद्धिनिष्ठ विश्लेषणापेक्षा सहृदयतेनं व्यक्तिवैशिष्ट्ये टिपण्यावर लेखिकेचा अधिक भर असतो." ते खरं आहे.

पुस्तक हाती घेतल्यावर पहिल्यांदा मोहवतं ते त्याचं मुखपृष्ठ. काळ्याभोर पार्श्वभूमीवर रेखाटलेलं जीर्णशीर्ण जाळीदार पिंपळपान, म्हणजे गतकाळातील आठवणीचं बोलकं प्रतीकच.

पहिले तीन-चार लेख वाचताना आपल्याला इंदिरा संतांच्या 'मृद्‌गंध'ची आठवण होते. दोन्हीचा विषय एक, फक्त आठवणी सांगण्याची शैली वेगळी. इंदिराबाईंची भाषा म्हणजे गद्यकाव्यच. अथांग अनुभवविश्व, सहजसुंदर, नितळ, पारदर्शक, प्रवाही भाषा. आपण आकाशातून चांदण्यांच्या पायघड्यावरून चालतोय किंवा रंगीबेरंगी फुलांच्या ताटव्यामधून चाललोय असा आभास निर्माण करणारी; तर शांताबाईंची सहज, सोपी, प्रासादिक, वाचकाशी सुसंवाद साधणारी भाषा, मळलेल्या पायवाटेवरून चालताना मध्येच एखादा लालगुंज झालेला गुलमोहोर भेटावा, एखादा छोटासा झरा लागावा तशी भाषा !

कोष्टी समाजात जन्म झाला तरी घराणं सुशिक्षित व ब्राह्मणी वळणाचं. शांताबाईंचं वाचनाचं वेड जोपासलं गेलं. पुस्तकं वाचण्याची इतकी दांडगी ओढ की, ती पुस्तकं त्या कुठूनही, कुणाकडूनही मिळवून वाचत बसत.

'पाऊलवाटा' व 'जुनी ओळख' ह्या लेखांतून आपल्याला शांताबाईंच्या वाचनाच्या छंदाची ओळख होते. 'न झालेल्या भेटी' मध्ये चौफेर वाचनामुळे बनलेली तरल, संवेदनाक्षम भाववृत्ती, वैचारिक प्रगल्भता प्रकट होते.

'कलावंताचे जीवन व त्याची निर्मितीप्रक्रिया यांच्या गूढ नात्याचे भान आणि कुठल्याही अनुभवाला मुक्त मनाने आत्मशोधाच्या भावनेने भिडण्याचे त्यांचे सामर्थ्य यांचा प्रभाव, आपल्याला त्यांच्या कुठल्याही लेखनात जाणवतो. तो मोहक आणि उत्कट असतो. त्यांच्याशी

आंतरिक नाते जोडणारा असतो, हे श्री. शंकर सारडा यांचे 'वडीलधारी माणसं'च्या मासिक सकाळ मधील समीक्षणातील विधान, 'संस्मरणे' वाचतानाही प्रत्ययाला येते. 'गांधीजी : मी व माझ्यापुरते' यातला पहिलाच परिच्छेद वरील विधानाची साक्ष देतो– "सामान्यांचे असामान्यांशी काय नाते असते ? काहीच नसते. आकाशस्थ ग्रहगोल आपापल्या दिव्य पथावरून परिभ्रमण करत असताना, आपण सामान्य माणसे जमिनीवर काट्याकुट्यातून, खाचखळग्यातून चाचपडत वाट काढीत असतो. तरीही त्यांच्यापासून येणारा एखादा किरण आपल्याला पुरेसा होतो. आपण आपले भुईसरपटत जिणे जगताना अज्ञाताची येवढीच झुळूक कधीतरी अंगावरून जाते आणि तेवढ्यापुरते आपण आभाळापर्यंत झेपावतो."

'साहित्य आणि नीतिमत्ता' हा पाचवा लेख. टी. व्ही.वर एखादा कार्यक्रम रंगात आलेला असताना मध्येच 'व्यत्यय' यावा तसा व्यत्यय ही संस्मरणे वाचताना या लेखामुळे येतो. आतापर्यंत आपण वाचत असलेल्या आठवणींची लिंक तुटते.

'न जमलेला वाङ्मयप्रकार' यात पुन्हा पूर्वीच्या रम्य आठवणी सांगणाऱ्या शांताबाई भेटतात. 'कादंबरी' या वाङ्मयप्रकाराशी खूप झटापट करूनही त्यांना तो वाङ्मयप्रकार जमावा तितका जमलेला नाही, अशी त्या स्वतःच प्रांजळ कबुली देतात. 'स्वप्नतरंग', 'कोजागिरी', 'ओढ', 'धर्म' यांसारख्या त्यांनी सहा-सात कादंबऱ्या लिहिल्या. पण आता त्या वाटेला जायचं नाही असं त्यांनी ठामपणे ठरवून टाकलेलं आहे.

माधव ज्युलियन या कवीविषयी, त्यांच्या काव्याविषयी व त्या अनुषंगाने स्वतःविषयी, स्वतःच्या काव्याविषयी त्या आपल्याशी बोलतात. 'रविकिरण मंडळाची' व त्यातल्या यशवंत व माधव ज्युलियन या कवींची आपल्यावर व त्या वेळच्या युवा पिढीवर विलक्षण मोहिनी पडलेली होती. या कवींच्या सर्व काव्याचा शांताबाईंनी फडशा पाडला होता. कॉलेजात असण्यापासून त्या कविता लिहू लागल्या होत्या. प्रारंभीच्या उमेदवारीच्या काळात कुणाचा तरी पांगुळगाडा घेऊन पावले टाकावीच लागतात. शांताबाईंनी आपल्या काव्य दैवताचे, माधव ज्युलियनांचे अनुकरण करण्याचा त्या वेळी सपाटा लावला होता. 'तुझी कविता हुबेहूब त्यांच्या कवितेसारखी वाटते' असं कोणी म्हटलं तर त्या वेळी धन्य धन्य वाटायचं. अनुकरण कवीला भूषणावह नाही हे त्या वेळी समजत कुठे होते ? त्यानंतर 'त्या अनुकरणातूनच बरंच काही शिकायला मिळून मला माझी स्वतःची शैली गवसली' असं त्या सांगतात.

'काव्यानुवाद : एक छंद एक आनंद' ह्या लेखाचा मनमुराद आनंद घेऊन पुढे पान उलटल्यावर 'बेथ', दैवलीला, तिन्ही सांजा, चेंजिंग हे लेख जेवणात आलेल्या खड्यासारखे इथे काढून टाकावेसे वाटतात. त्या लेखांचा विषय, दर्जा, मांडणी उत्कृष्ट आहे याबद्दल वादच नाही. पण जसे दागिने, जिथल्या तिथे, योग्य जागी शोभून दिसतात तसेच या लेखांच्या बाबतीत म्हणावे लागेल. पुन्हा 'माझ्या कवितांचा जन्मकथा', व 'एक गाव आठवणीतले' हे दोन घास सुखेनैव पोटात जात नाहीत तो पुढचे दोन लेख घासातील खडे ठरतात.

'माझ्या कवितांच्या जन्मकथा' ऐकताना मन रमून जाते. परा, पश्यन्ति, मध्यमा, वैखरी या

# 'संस्मरणे' : शांता शेळके

## संख्या सूत्राचा अभाव

सौ. आशा भिडे

'वडीलधारी माणसे', 'एकपानी', व 'संस्मरणे' ही शांताबाईंची अगदी अलीकडे प्रसिद्ध झालेली पुस्तके . पाठच्या भावंडाप्रमाणे सारखा तोंडवळा असलेली. ह्याचं अंगातलं त्याला घातलं तरी फिट बसावं इतकी सारखी, बरोबरची.

शांताबाईंना आजपर्यंत आयुष्यात भेटलेली (न भेटलेली पण) माणसं, भावलेली पुस्तकं, स्थळं, एवढंच काय पण एखादी कवितेची सुंदर ओळ, एखादं संस्कृत सुभाषित यावर त्यांनी या तिन्ही पुस्तकातील लेखन केले आहे. 'माझ्या विशिष्ट वाङ्मयीन अभिरुचीचा त्याला संदर्भ जडलेला आहे' असं त्या स्वतःच म्हणतात. कृ. शि. पेडणेकर त्यांच्याबद्दल म्हणतात, "बुद्धिनिष्ठ विश्लेषणापेक्षा सहृदयतेनं व्यक्तिवैशिष्ट्ये टिपण्यावर लेखिकेचा अधिक भर असतो." ते खरं आहे.

पुस्तक हाती घेतल्यावर पहिल्यांदा मोहवतं ते त्याचं मुखपृष्ठ. काळयाभोर पार्श्वभूमीवर रेखाटलेलं जीर्णशीर्ण जाळीदार पिंपळपान, म्हणजे गतकाळातील आठवणीचं बोलकं प्रतीकच.

पहिले तीन-चार लेख वाचताना आपल्याला इंदिरा संतांच्या 'मृद्‌गंध'ची आठवण होते. दोन्हीचा विषय एक, फक्त आठवणी सांगण्याची शैली वेगळी. इंदिराबाईंची भाषा म्हणजे गद्यकाव्यच. अथांग अनुभवविश्व, सहजसुंदर, नितळ, पारदर्शक, प्रवाही भाषा. आपण आकाशातून चांदण्यांच्या पायघड्यावरून चालतोय किंवा रंगीबेरंगी फुलांच्या ताटव्यामधून चाललोय असा आभास निर्माण करणारी; तर शांताबाईंची सहज, सोपी, प्रासादिक, वाचकाशी सुसंवाद साधणारी भाषा, मळलेल्या पायवाटेवरून चालताना मध्येच एखादा लालगुंज झालेला गुलमोहोर भेटावा, एखादा छोटासा झरा लागावा तशी भाषा !

कोष्टी समाजात जन्म झाला तरी घराणं सुशिक्षित व ब्राह्मणी वळणाचं. शांताबाईचं वाचनाचं वेड जोपासलं गेलं. पुस्तकं वाचण्याची इतकी दांडगी ओढ की, ती पुस्तकं त्या कुठूनही, कुणाकडूनही मिळवून वाचत बसत.

'पाऊलवाटा' व 'जुनी ओळख' ह्या लेखांतून आपल्याला शांताबाईंच्या वाचनाच्या छंदाची ओळख होते. 'न झालेल्या भेटी' मध्ये चौफेर वाचनामुळे बनलेली तरल, संवेदनाक्षम भाववृत्ती, वैचारिक प्रगल्भता प्रकट होते.

'कलावंताचे जीवन व त्याची निर्मितीप्रक्रिया यांच्या गूढ नात्याचे भान आणि कुठल्याही अनुभवाला मुक्त मनाने आत्मशोधाच्या भावनेने भिडण्याचे त्यांचे सामर्थ्य यांचा प्रभाव, आपल्याला त्यांच्या कुठल्याही लेखनात जाणवतो. तो मोहक आणि उत्कट असतो. त्यांच्याशी

आंतरिक नाते जोडणारा असतो, हे श्री. शंकर सारडा यांचे 'वडीलधारी माणसं'च्या साप्ताहिक सकाळ मधील समीक्षणातील विधान, 'संस्मरणे' वाचतानाही प्रत्ययाला येते. 'गांधीजी : मी व माझ्यापुरते' यातला पहिलाच परिच्छेद वरील विधानाची साक्ष देतो– "सामान्यांचे असामान्यांशी काय नाते असते ? काहीच नसते. आकाशस्थ ग्रहगोल आपापल्या दिव्य पथावरून परिभ्रमण करत असताना, आपण सामान्य माणसे जमिनीवर काट्याकुट्यातून, खाचखळग्यातून चाचपडत वाट काढीत असतो. तरीही त्यांच्यापासून येणारा एखादा किरण आपल्याला पुरेसा होतो. आपण आपले भुईसरपटत जिणे जगताना अज्ञाताची येवढीच झुळूक कधीतरी अंगावरून जाते आणि तेवढ्यापुरते आपण आभाळापर्यंत झेपावतो."

'साहित्य आणि नीतिमत्ता' हा पाचवा लेख. टी. व्ही.वर एखादा कार्यक्रम रंगात आलेला असताना मध्येच 'व्यत्यय' यावा तसा व्यत्यय ही संस्मरणे वाचताना या लेखामुळे येतो. आतापर्यंत आपण वाचत असलेल्या आठवणींची लिंक तुटते.

'न जमलेला वाङ्मयप्रकार' यात पुन्हा पूर्वीच्या रम्य आठवणी सांगणाऱ्या शांताबाई भेटतात. 'कादंबरी' या वाङ्मयप्रकाराशी खूप झटापट करूनही त्यांना तो वाङ्मयप्रकार जमावा तितका जमलेला नाही, अशी त्या स्वतःच प्रांजळ कबुली देतात. 'स्वप्नतरंग', 'कोजागिरी', 'ओढ', 'धर्म' यांसारख्या त्यांनी सहा-सात कादंबऱ्या लिहिल्या. पण आता त्या वाटेला जायचं नाही असं त्यांनी ठामपणे ठरवून टाकलेलं आहे.

माधव ज्युलियन या कवीविषयी, त्यांच्या काव्याविषयी व त्या अनुषंगाने स्वतःविषयी, स्वतःच्या काव्याविषयी त्या आपल्याशी बोलतात. 'रविकिरण मंडळाची' व त्यातल्या यशवंत व माधव ज्युलियन या कवींची आपल्यावर व त्या वेळच्या युवा पिढीवर विलक्षण मोहिनी पडलेली होती. या कवींच्या सर्व काव्याचा शांताबाईंनी फडशा पाडला होता. कॉलेजात असण्यापासून त्या कविता लिहू लागल्या होत्या. प्रारंभीच्या उमेदवारीच्या काळात कुणाचा तरी पांगुळगाडा घेऊन पावले टाकावीच लागतात. शांताबाईंनी आपल्या काव्य दैवताचे, माधव ज्युलियनांचे अनुकरण करण्याचा त्या वेळी सपाटा लावला होता. 'तुझी कविता हुबेहूब त्यांच्या कवितेसारखी वाटते' असं कोणी म्हटलं तर त्या वेळी धन्य धन्य वाटायचं. अनुकरण कवीला भूषणावह नाही हे त्या वेळी समजत कुठे होते ? त्यानंतर 'त्या अनुकरणातूनच बरंच काही शिकायला मिळून मला माझी स्वतःची शैली गवसली' असं त्या सांगतात.

'काव्यानुवाद : एक छंद एक आनंद' ह्या लेखाचा मनमुराद आनंद घेऊन पुढे पान उलटल्यावर 'बेथ', दैवलीला, तिन्ही सांजा, चेंजिंग हे लेख जेवणात आलेल्या खड्यासारखे इथे काढून टाकावेसे वाटतात. त्या लेखांचा विषय, दर्जा, मांडणी उत्कृष्ट आहे याबद्दल वादच नाही. पण जसे दागिने, जिथल्या तिथे, योग्य जागी शोभून दिसतात तसेच या लेखांच्या बाबतीत म्हणावे लागेल. पुन्हा 'माझ्या कवितांचा जन्मकथा', व 'एक गाव आठवणीतले' हे दोन घास सुखेनैव पोटात जात नाहीत तो पुढचे दोन लेख घासातील खडे ठरतात.

'माझ्या कवितांच्या जन्मकथा' ऐकताना मन रमून जाते. परा, पश्यन्ति, मध्यमा, वैखरी या

वाणीच्या चार अवस्था. परा मधे नाभीपाशी निर्मितीची प्राथमिक हालचाल, पश्यन्ति- त्याचे उठलेले तरंग व मध्यमामध्ये त्या तरंगाचे मनात, शब्दात उठलेले पडसाद, वैखरीत प्रगट होणाऱ्या शब्दांची मध्यमात मनाशी जुळवाजुळव होते. सामान्य माणसाला या तीन अवस्थांची जाणीवही होत नाही, पण लेखक-कवीला मात्र मध्यमा वाणीचा प्रत्यय वारंवार येतो. 'स्वप्नामधे रचिल्या ओळी यमक मला नच सापडले' विंदा करंदीकरांची ही काव्यपंक्ती बऱ्याच अंशी खरी आहे. मनाच्या अबोध पातळीवर, नेणिवेत, अतर्क्य रीतीने काही ना काही चलनवलन चालू असते आणि त्यातून कवीच्या नकळत त्याला कविता सुचते.

विशिष्ट स्थळे, विशेषतः मुंबईची प्रचंड गर्दी, माणसांची निर्विकार धावपळ, निर्जीव दुतर्फा अफाट उंच पर्वतरांगांप्रमाणे इमारती, प्रचंड गर्दी, तरी पण प्रत्येक जणाचे अलिप्तपण, एकाकीपण यावर त्यांनी बऱ्याच कविता लिहिल्या आहेत. 'तटस्थ' ही कविता अप्रतिम आहे.

रस्त्यावर अचानक फुटून विखुरलेला एक क्षण
मुंग्यासारख्या भुळभुळत सर्वत्र पळणाऱ्या सर्वत्र पळणाऱ्या मोटारी
चावी देऊन गतिमान केलेली स्प्रिंगची माणसे
आणि दुतर्फा उंच इमारतींच्या हारीच्या हारी

समुद्र, झाड, शब्द यांसारख्या प्रतिमा त्यांच्या काव्यात वारंवार येतात. बालपण व निसर्ग यांसारख्या प्रतिमांमधून माझ्या भाववृत्ती प्रकट होतात असं शांताबाई म्हणतात.

'स्मृतिचित्रा'तल्या लक्ष्मीबाई चूलमूल, पती, संसार यांबद्दलच्या आठवणी रंगवून सांगतात. 'मृदगंध' मध्ये इंदिराबाई सुद्धा अशाच प्रकारच्या आठवणी काव्यमय भाषेत सांगतात. शांताबाईंचा साहित्य हाच संसार असल्यामुळे त्यांचे बालपण, युवावस्था व आजची प्रौढावस्था या सर्व अवस्थेतून शांताबाई एक साहित्यिक, एक विदुषी म्हणूनच आपल्यापुढे उभ्या राहतात. बालपणापासून त्यांना वाचनाची किती आवड होती व तो छंद जोपासला गेल्यामुळे मोठेपणी त्यांचा साहित्य-संसार कसा अनेकांगांनी फुलत, बहरत, समृद्ध होत गेला हे आपल्याला त्यांनी सांगितलेल्या आठवणीतून दिसून येते. हे दोन्ही लेख या पुस्तकात विसंगत वाटतात.

आठवणींची सलगता पाळली असती तर संस्मरणे हे पुस्तक स्मृतिचित्रासारखे छान झाले असते. आता त्याचे स्वरूप उरलासुरला माल एकत्र कोंबल्यासारखे झाले आहे.

(संस्मरणे : शांता शेळके, विमल प्रकाशन, पुणे ३०. साठ रुपये)

(सौ. आशा भिडे, बी ९ विजय अपार्टमेंट, आराधना टॉकीजजवळ, ठाणे (पश्चिम) ४००६०२)

*










# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०

(वर्ष ८४ वे, नोंदणी क्रमांक ४०९)

**वार्षिक कार्यवृत्त १९८९-९० (१ एप्रिल १९८९ ते ३१ मार्च १९९०)**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे १ एप्रिल १९८९ ते ३१ मार्च १९९० या कालावधीचे कार्यवृत्त सादर करताना आम्हांस आनंद होत आहे.

**सभासद**

वर्षारंभी वार्षिक साधारण ६५८ आणि आजीव २६८६ अशी एकूण ३३४४ सभासद संख्या होती. १-४-८९ ते ३१-३-९० या कालावधीत नव्याने एकूण २५९ आजीव सभासद झाले. १७९ वार्षिक साधारण सभासद कमी झाले- दि. ३१-३-९० रोजी आजीव सभासद २९४५ व साधारण सभासद ४७९ अशी एकूण सभासद संख्या ३४२४ आहे.

**कार्यकारी मंडळाच्या सभा**

वृत्तान्त कालावधीत कार्यकारी मंडळाच्या एकूण ३ सभा झाल्या. या सभांना पुढीलप्रमाणे उपस्थिती होती.

| | सभा | | सभा |
|---|---|---|---|
| राजेंद्र बनहट्टी | ३ | राजा फडणीस सभा | ३ |
| गं. ना. जोगळेकर | ३ | म. वि. गोखले (२८-७-८९ पासून) | २ |
| म. श्री. दीक्षित (२८-७-८९ पर्यंत) | १ | चिं. श. जोशी | ३ |
| वीणा देव | २ | ललिता कुंभोजकर | २ |
| प्र. ल. गावडे | २ | शंकर सारडा | ३ |
| व. दि. कुलकर्णी | १ | चंद्रकुमार नलगे | ३ |
| लीला गोविलकर | ३ | वसंत सावंत | ३ |
| पुरुषोत्तम पाटील | ३ | ज्योत्स्ना देवधर | २ |

परिषदेचे एक विश्वस्त श्री. वि. ग. माटे यांनी कार्यबाहुल्यामुळे परिषदेच्या विश्वस्तपदाचा राजीनामा दिला. या रिकाम्या झालेल्या जागी श्री. म. श्री. दीक्षित यांची दि. २८-७-८९ पासून नियुक्ती करण्यात आली. त्यामुळे श्री. दीक्षित यांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कोषाध्यक्षपदाचा राजीनामा दिला. या रिकाम्या झालेल्या कोषाध्यक्षपदी डॉ. म. वि. गोखले यांची नियुक्ती करण्यात आली.

कार्यकारी मंडळाच्या सभांतून संमत झालेली महत्त्वाची कामे पुढीलप्रमाणे– वाङ्मयइतिहास खंड ७ साठी डॉ. विलास खोले आणि खंड ८ साठी डॉ. गं. ना. जोगळेकर आणि डॉ. लीला गोविलकर यांची संपादक म्हणून नियुक्ती करण्यात आली. खंड ६ भाग २ चे हस्तलिखित ३०/६/९० पूर्वी तयार करून घेण्यात यावे असे ठरले. इमारतीचे नूतनीकरण करण्याचे ठरविले. परिषदेतर्फे देण्यात येणारी सर्व ग्रंथ पारितोषिके किमान रु. ५००/– ची असावीत यादृष्टीने प्रयत्न करण्याचे ठरविण्यात आले.

दिनांक २४/९/८९ रोजी वार्षिक साधारण सभा घेण्यात आली. या सभेत १९८८-८९ चे कार्यवृत्त, हिशेब-पत्रके आणि ८९-९० चा अर्थसंकल्प यांना मान्यता देण्यात आली. परिषदेचे अध्यक्ष श्री. ग. प्र. प्रधान काही अपरिहार्य कारणामुळे या सभेस हजर राहू न शकल्याने उपाध्यक्ष हेमंत इनामदार हे अध्यक्षस्थानी होते.

**साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम :**

**ज्ञानकोशकार डॉ. केतकर स्मृतिदिन–** १० एप्रिल १९८९ रोजी सकाळी पदाधिकारी सर्वश्री राजेन्द्र बनहट्टी, म. श्री. दीक्षित, राजा फडणीस आणि गं. ना. जोगळेकर यांनी कमला नेहरू उद्यानातील डॉ. केतकर यांच्या स्मारकास पुष्पांजली वाहिली. सायंकाळी परिषदेत श्रीमती प्रतिभा रानडे यांचे 'केतकरांचे कौटुंबिक जीवन' या विषयावर व्याख्यान झाले.

**२१ जून १९८९–** नाथमाधव यांच्या स्मृतिदिनी डॉ. वि. भा. देशपांडे यांचे 'मराठी ऐतिहासिक नाटक : काही अपेक्षा' या विषयावर व्याख्यान झाले.

**का. र. मित्र स्मृतिदिन–** २२ जून १९८९ रोजी का. र. मित्र यांच्या स्मृतिदिनी प्रा. म. ना. अदवंत यांचे 'मासिक मनोरंजन' या विषयावर व्याख्यान झाले.

**५ जुलै १९८९–** कै. र. वा. दिघे यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. अंजली सोमण यांचे 'मराठी कथेतील स्थित्यंतरे' या विषयावर व्याख्यान झाले.

**२० जुलै १९८९–** कै. वा. म. जोशी स्मृतिदिनानिमित्त श्रीमती शांता शेळके यांचे 'कादंबरीकारांची दुसरी फळी' या विषयावर व्याख्यान झाले.

**१४ जुलै १९८९–** आषाढी एकादशीनिमित्त 'श्री संतदर्शन' हा अभंगगायनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. यात श्री. श्रीराम साठे, श्री. श्रीपाद भावे, श्री. मुकुंदराज गोडबोले, सौ. सुधा शिखरे यांनी भाग घेतला. या कार्यक्रमाचे निवेदन श्री. वसंत पावगी यांनी केले. श्रोत्यांनी या कार्यक्रमास चांगला प्रतिसाद दिला.

**२२ जुलै १९८९–** ग. ल. ठोकळ यांच्या स्मृतिदिनानिमित्त सुप्रसिद्ध ग्रामीण कथाकार श्री. रा. रं. बोराडे यांचे व्याख्यान झाले.

**२१ ऑगस्ट १९८९–** सुप्रसिद्ध कथाकार पु. भा. भावे यांच्या स्मृतिदिनानिमित्त, प्रा. सौ. माधवी चापेकर यांचे 'पु. भा. भावे संस्काराचे दिवस' या विषयावर व्याख्यान झाले. या वेळी भावे यांच्या दोन कथांचे कथन करण्यात आले.



अनुक्रमणिका

**२५ व २६ ऑगस्ट १९८९–** संत सावता महाराज यांच्या स्मृत्यर्थ श्री. यशवंत पाठक यांची 'संत साहित्य व कीर्तन परंपरा' या विषयावर दोन व्याख्याने झाली.

**१८ व १९ सप्टेंबर १९८९–** बालकवींच्या स्मरणार्थ 'आरती प्रभू : व्यक्तिमत्त्व आणि कवित्व' आणि 'नाटककार खानोलकर' या विषयांवर डॉ. सौ. माधवी वैद्य यांची व्याख्याने आयोजित करण्यात आली होती.

**६ ऑक्टोबर १९८९–** रोजी म. म. द. वा. पोतदार यांच्या स्मृतिदिनानिमित्त श्री. स. मा. गर्गे यांचे 'मराठ्यांचा इतिहास आणि कोल्हापूरचे छत्रपती' या विषयावर व्याख्यान झाले.

**२९ नोव्हेंबर १९८९–** सुप्रसिद्ध कवी माधव जूलियन यांच्या ५० व्या स्मृतिदिनानिमित्त नवोदित कवींचे कविसंमेलन आयोजित करण्यात आले. सर्वश्री दीपक करंदीकर, हेमंत जोगळेकर, जयंत भिडे, रामचंद्र देखणे, राजा दीक्षित, सुधीर कुबेर, नीलिमा गुंडी इ. कवींनी भाग घेतला. या संमेलनाचे संयोजन तरुण कवी संतोष शेणई यांनी केले.

**२० नोव्हेंबर १९८९–** आहिताग्नी शं.रा.राजवाडे स्मृतिदिनानिमित्त डॉ.प्र.न.जोशी यांचे 'आहिताग्नी राजवाडे यांचे विद्यापीठ' या विषयावर व्याख्यान झाले.

**२९ व ३० डिसेंबर १९८९–** श्री. म. माटे यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्रा. श्याम मानव (नागपूर) यांची 'अध्यात्म व विज्ञान' आणि 'बुद्धिप्रामाण्यवाद' या विषयांवर व्याख्याने आयोजित करण्यात आली.

**१० फेब्रुवारी १९९०–** नरहर कुरुंदकर यांच्या स्मरणार्थ डॉ. अरविंद वामन कुलकर्णी यांचे 'हिंदु-मुसलमान प्रश्न आणि प्रा. कुरुंदकरांची भूमिका' या विषयावर व्याख्यान झाले.

**१५ व १६ फेब्रुवारी १९९०–** व. ह. गोळे यांच्या स्मरणार्थ संगीत समीक्षक डॉ. श्रीरंग संगोराम यांची 'मराठी संगीत रंगभूमीची वाटचाल' या विषयावर २ व्याख्याने आयोजित करण्यात आली.

**५ मार्च १९९०–** ना. गो. चापेकर यांच्या स्मरणार्थ यदुनाथ थत्ते यांचे 'संयुक्त महाराष्ट्र निर्मितीनंतरचा ग्रामीण विकास' या विषयावर व्याख्यान झाले.

**९ मार्च १९९०–** महाराष्ट्रकवी यशवंत यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. व. दि. कुलकर्णी यांचे 'काव्यतत्त्व' या विषयावर व्याख्यान झाले.

**१० मार्च ते १९ मार्च १९९०–** ज्ञानेश्वरीच्या लेखनाला सातशे वर्षे पूर्ण झाली. जिज्ञासूंच्या मनातील काही प्रश्नांना मार्गदर्शनपर उत्तरे मिळावीत व ज्ञानेश्वरीच्या प्रत्येक अध्यायाचा परिचय घडावा म्हणून दहा दिवस 'श्री ज्ञानेश्वरी परिचय-सत्र' आयोजित करण्यात आले. या सत्रात श्री ज्ञानेश्वरीच्या क्रमशः सर्व अध्यायांवर सामान्य जिज्ञासूच्या भूमिकेतून प्रश्नकर्त्याने प्रश्न विचारावेत आणि तज्ज्ञांनी त्यांची उत्तरे द्यावीत अशी नावीन्यपूर्ण योजना केली होती. तपशील पुढीलप्रमाणे ठरविण्यात आला होता.

| | तज्ज्ञ प्रश्नकर्ते | अध्याय |
|---|---|---|
| १० मार्च १९९०. | डॉ. वि. रा. करंदीकर/म. वि. गोखले | १ व २ |
| ११ मार्च १९९० | डॉ. व. दि. कुलकर्णी/डॉ. हे. वि. इनामदार | ३ व ४ |
| १२ मार्च १९९० | डॉ. वि. रा. करंदीकर/डॉ. वसंत स. जोशी | ५ व ६ |
| १३ मार्च १९९० | डॉ. मु. श्री. कानडे/विलास खोले | ७ व ८ |
| १४ मार्च १९९० | डॉ. म. रा. जोशी/डॉ. ल. रा. नसिराबादकर | ९ व १० |
| १५ मार्च १९९० | डॉ. प्र. न. जोशी/डॉ. गं. ना. जोगळेकर | ११ व १२ |
| १६ मार्च १९९० | डॉ. उषा देशमुख/सौ. वसुंधरा बनहट्टी | १३ |
| १७ मार्च १९९०. | डॉ. वा. पु. गिंडे/डॉ. मुकुंद दातार | १४ व १५ |
| १८ मार्च १९९० | डॉ. म. वि. गोखले/डॉ. प्र. ल. गावडे | १६ व १७ |
| १९ मार्च १९९० | डॉ. शं. रा. तळघट्टी/डॉ. ललिता कुंभोजकर | १८ |

या सर्व कार्यक्रमास श्रोत्यांनी उत्स्फूर्त दाद दिली. या सर्व कार्यक्रमाचे संयोजन डॉ. म. वि. गोखले यांनी केले.

**२० मार्च १९९०**– रोजी कविवर्य बा. सी. मर्ढेकर यांच्या स्मरणार्थ डॉ. वि. म. कुलकर्णी यांचे 'गेल्या दशकातील मराठी कविता : काही विचार' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले. व्याख्यानाआधी मर्ढेकरांच्या निवडक कविता श्री. योगेश सोमण व श्री. अभय कुलकर्णी यांनी सादर करून उपस्थितांची दाद मिळविली.

**का. र. मित्र शारदीय व्याख्यानमाला**

'मासिक मनोरंजन' कर्ते का. र. मित्र यांच्या स्मरणार्थ दरवर्षीप्रमाणे यंदाही व्याख्यानमाला आयोजित केली होती. या दहा दिवसांत प्रा. शंकर वैद्य यांची 'रामायण व महाभारत' या ग्रंथांवर खाली दर्शविल्याप्रमाणे व्याख्याने आयोजित करण्यात आली होती. या उपक्रमाचे श्रोत्यांनी स्वागत केले.

१९ डिसेंबर : रामायणातील जीवनसंघर्षाचे स्वरूप आणि कथावस्तूची मांडणी.
२० डिसेंबर : रामाच्या व्यक्तिमत्त्वाचे दर्शन
२१ डिसेंबर : हनुमान : रामायणातील एक अलौकिक व्यक्तिमत्त्व.
२२ डिसेंबर : वाल्मीकिमुनींची कलादृष्टी
२३ डिसेंबर : रामायणातील काही उपकथा आणि रामचरित्राचा बोध
२४ डिसेंबर : महाभारतीय कथा : आयुष्यपटावरला एक चित्तथरारक खेळ
२५ डिसेंबर : महाभारतातील व्यक्तिदर्शन : भीष्म, धृतराष्ट्र, दुर्योधन, कर्ण
२६ डिसेंबर : महाभारतातील व्यक्तिदर्शन : युधिष्ठिर, भीम, अर्जुन, कृष्ण
२७ डिसेंबर : महाभारतातील स्त्री व्यक्तिरेखा : कुंती आणि द्रौपदीची कहाणी.
२८ डिसेंबर : महाभारतातील चित्तवेधक उपाख्याने, धर्म-नीतिविचार आणि

महाभारताची फलश्रुती.

**२७ मे १९८९-वर्धापन दिन :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ८३ वा वर्धापन दिन २७ मे १९८९ रोजी, शिक्षणशास्त्र संस्थेच्या सभागृहात महाराष्ट्राचे मुख्यमंत्री मा.ना.शरद पवार यांच्या अध्यक्षतेखाली अत्यंत देखण्या व भरगच्च स्वरूपात साजरा करण्यात आला. साहित्य क्षेत्रात प्रदीर्घ वाङ्मय सेवा केल्याबद्दल दिले जाणारे रु. ३०००/- चे 'महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक' आणि मानचिन्ह कविवर्य वा.रा.कान्त यांना मा.मुख्यमंत्र्यांच्या हस्ते देण्यात आले. तत्पूर्वी कार्याध्यक्ष राजेंद्र बनहट्टी यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणात साहित्य परिषदेने चालविलेल्या उपक्रमांची माहिती दिली. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी कविवर्य कान्त यांचा परिचय करून दिला. साहित्यिक साहाय्य निधीतून नाटककार विनायक देवरुखकर यांना तसेच म.श्री.दीक्षित यांना डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कार मा. मुख्यमंत्र्यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. भाषा आणि साहित्य संशोधन खंड ३ (संपादक डॉ.वसंत स.जोशी आणि प्रा.म.ना.अदवंत) या ग्रंथासंबंधी डॉ.जोशी यांनी निवेदन केले. अध्यक्षांच्या हस्ते ग्रंथाचे प्रकाशन झाले.

परिषदेमार्फत जी विविध ग्रंथ-पारितोषिके दिली जातात, त्या ग्रंथांचे लेखक, संपादक, प्रकाशक यांना अध्यक्षांच्या हस्ते पारितोषिके देण्यात आली. मा. शरद पवार यांनी आपल्या भाषणात परिषदेच्या इमारतीच्या नूतनीकरणासाठी एक लक्ष आणि साहित्यिक साहाय्य निधीसाठी एक लक्ष अशी दोन लक्ष रुपयांची देणगी जाहीर केली. परिषदेचे अध्यक्ष श्री. ग. प्र.प्रधान यांनी समारोपाचे भाषण केले. या कार्यक्रमाचे संयोजन श्री.राजा फडणीस आणि सूत्र संचालन सौ.वीणा देव यांनी केले.(मा. मुख्यमंत्री शरद पवार यांनी घोषित केलेली देणगीची दोन लाखांची रक्कम संस्थेकडे जून ८९ मध्ये जमा झाली आहे)

**विविध पारितोषिक प्रदान कार्यक्रम :**

**कै ग. ल. ठोकळ पुरस्कार–** ठोकळ कुटुंबियांनी ठेवलेल्या ठेवीच्या व्याजातून या वर्षीपासून ग्रामीण मराठी साहित्याबद्दल रु. १००१/- चा पुरस्कार देण्याची योजना सुरू करण्यात आली. या वर्षीचा हा पुरस्कार श्री. राजन गवस यांच्या 'भंडारभोग' या पुस्तकाला, दि.२२/७/८९ रोजी प्रसिद्ध ग्रामीण कथाकार प्राचार्य रा.रं.बोराडे यांच्या हस्ते समारंभपूर्वक देण्यात आला. पारितोषिक समितीत श्री. गं.ना.जोगळेकर आणि श्रीमती शांता शेळके यांनी काम केले.

**श्री. शंकर पाटील कथा/कादंबरी पारितोषिक–** १९८८ मधील उत्कृष्ट कथासंग्रहाचे रु. २०००/- चे पारितोषिक आणि मानचिन्ह यंदा श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या 'कृष्णजन्म' या कथासंग्रहास दिनांक ९/९/८९ रोजी साहित्य संमेलनाध्यक्ष प्रा. के. ज. पुरोहित यांच्या हस्ते देण्यात आले. परीक्षक समितीत डॉ. विलास खोले आणि डॉ. रेखा इनामदार-साने यांनी काम

पाहिले.

या प्रसंगी श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी त्यांना मिळालेल्या रु. २०००/- च्या पारितोषिकाच्या रकमेत स्वतःचे रु. १०००/- घालून, रु. ३०००/- ची मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांच्या पूरग्रस्त निधीस देणगी दिली.

**कै. द. वा. पोतदार पारितोषिक–** कै. द. वा. पोतदार यांच्या स्मृतिदिनी त्यांच्या स्मृत्यर्थ दरवर्षी देण्यात येणारे रु. २५०/- चे पारितोषिक यंदा प्रा. सदाशिव आठवले यांना त्यांच्या 'रामशास्त्री प्रभुणे' या ग्रंथाला दि. ६/१०/८९ रोजी देण्यात आले. पारितोषिक समितीचे सदस्य म्हणून स. मा. गर्गे यांनी काम पाहिले.

**कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत कै. चिं. वि. जोशी पारितोषिक–** हे पारितोषिक विनोदी पुस्तकाच्या लेखकाला रु. १२००/- व त्या पुस्तकाच्या प्रकाशकाला रु. ९००/– असते. ही पारितोषिके कै. चिं. वि. जोशी यांच्या स्मरणार्थ दरवर्षी दि. १९ जानेवारीला देण्यात येतात. यंदा सौ. मंगला गोडबोले यांच्या 'पुन्हा झुळूक' या पुस्तकाला व त्या पुस्तकाचे प्रकाशक श्री. पु. वि. बेहेरे (मेनका प्रकाशन, पुणे) यांना साहित्य संमेलनाध्यक्ष प्रा. के. ज. पुरोहित यांच्या हस्ते दि. १८/१/९० रोजी समारंभपूर्वक देण्यात आली. परीक्षक म्हणून प्रा. शरद वाघ आणि श्रीमती सरिता पदकी यांनी काम पाहिले.

**कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत कविवर्य कुसुमाग्रज पुरस्कार–** प्रतिवर्षी कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत सर्वोत्कृष्ट काव्यसंग्रहास रु. १२००/– चा व त्याच्या प्रकाशकाला रु. ९००/- चा कविवर्य कुसुमाग्रज पुरस्कार देण्यात येतो. १९८९ मधील सर्वोत्कृष्ट कवितासंग्रह म्हणून डॉ. अनुराधा पोतदार यांच्या 'मंझधार' या पुस्तकाची निवड करण्यात आली. दि. २८/२/९० रोजी श्रीमती संजीवनी मराठे यांच्या हस्ते हा पुरस्कार डॉ. अनुराधा पोतदार आणि पुस्तकाचे प्रकाशक श्री बाळासाहेब कारले (सुरेश एजन्सी) यांना देण्यात आला.

परीक्षक समितीत डॉ. वि. म. कुलकर्णी आणि श्री. हेमंत जोगळेकर यांनी काम पाहिले.

**महाराष्ट्र कवी यशवंत काव्य पुरस्कार–** दि. ९/३/९० रोजी डॉ. व. दि. कुलकर्णी यांच्या हस्ते सुप्रसिद्ध कवी श्री. सुधांशु यांना 'यात्री' या कवितासंग्रहाबद्दल रु. ५००/– चा 'कवी यशवंत पुरस्कार' सभारंभपूर्वक देण्यात आला.

**कै. दि. बा. मोकाशी पुरस्कार–** प्रसिद्ध कथाकार कै. दि. बा. मोकाशी यांच्या स्मृत्यर्थ म. सा. प. तर्फे दरवर्षी 'दि. बा. मोकाशी पुरस्कार' दिला जातो. १९८९ सालात, १९८६ ते ८८ या काळातील श्री. अशोक काळे यांच्या 'घडलेली कथा' या संग्रहास हा पुरस्कार देण्यात आला. तसेच मर्ल (निर्मला देशपांडे) आणि स्वप्नस्थ (सौ. रेखा बैजल) या दोन कथासंग्रहास प्रत्येकी १५०/- रु.चे स्वतंत्र गुणवत्ता पुरस्कार देण्यात आले.

श्री वि. ग. कानिटकर आणि डॉ. म. वि. गोखले यांनी निवड समितीचे सदस्य म्हणून काम पाहिले.

**महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दरवर्षी देण्यात येणाऱ्या विविध पारितोषिकांसाठी १९८९ सालाकरिता पुढील पुस्तकांची निवड करण्यात आली आहे.**

हरि नारायण आपटे पारितोषिक– कादंबरी, रु.१००/-
'शोधयात्रा', अरुण साधू, मॅजेस्टिक प्रकाशन, पुणे.

वा.म.जोशी पारितोषिक– कादंवरी, रु.१०००/-
'एम्.टी. आयवा मारू', अनंत सामंत, मॅजेस्टिक प्रकाशन, पुणे.

ह.स.गोखले पारितोषिक– कविता, रु.३००/-
'पीकपाणी', इंद्रजित भालेराव, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे.

कै. आनंदीबाई शिर्के पारितोषिक– कथा, रु.१०००/-
'लांडगा', राजेंद्र बनहट्टी, श्री विशाखा प्रकाशन, पुणे.

नी.स.गोखले पारितोषिक– कथा, रु.३००/-
'सुगरनचा खोपा', प्रतिमा इंगोले, साहित्य सेवा प्रकाशन, औरंगाबाद.

अ.स.गोखले पारितोषिक– उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती, रु.३००/-
'पहाटेपूर्वीचा काळोख', प्रकाशक सौ. रश्मी किशोर सोमण.

गिरजा गंगाधर पारितोषिक– संपादित ग्रंथ, रु.१००/-
'तिमिरभेद', अंजली सोमण, मनोविकास प्रकाशन, मुंबई.

ह.श्री.शेणोलीकर पारितोषिक– समीक्षा, रु.५००/-
'आदिबंधात्मक समीक्षा', डॉ.म.सु.पाटील, निहारा प्रकाशन, पुणे.

तुळशीराम वाघ पारितोषिक– संतवाङ्मय, रु.२५०/-
'संत ज्ञानेश्वरांचा भक्तियोग', डॉ. शंकर अभ्यंकर, आदित्य प्रतिष्ठान.

सुशीलप्रधान पारितोषिक– कुमार वाङ्मय, रु.२००/-
'विज्ञानकथा', अविनाश कोलारकर, सन पब्लिकेशन्स, पुणे.

विनायक कोंडदेव ओक पारितोषिक– कुमार वाङ्मय, रु.१००/-
'रहस्यमय ग्रीन हाऊस', आशा भाजेकर, राजा प्रकाशन, मुंबई.

**ललितेतर वैचारिक ग्रंथ**

(अ) शि.म.परांजपे पारितोषिक– रु.२५०/-
'गतशतक शोधिताना', स.गं.मालशे, प्रतिमा प्रकाशन, पुणे.

(आ) ना.गो.चापेकर पारितोषिक– रु.२५०/-
'विसाव्या शतकातील महाराष्ट्र, खंड १', य.दि.फडके, श्रीविद्या प्रकाशन, पुणे.

(इ) विश्वनाथ-पार्वती गोखले पारितोषिक– रु.१५०/-
'नव्या वाटा, नवी वळणे', बी. रंगराव, सुगावा प्रकाशन, पुणे.

(ई) श्री. शां. हणमंते पारितोषिक– रु.३५०/-

'क्रीडा ज्ञानकोश', डॉ. सुरेशचंद्र नाडकर्णी, गंधर्ववेद प्रकाशन, पुणे.

(उ) गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक– रु.५००/-

'जाती आणि जमाती', रामनाथ नामदेव चव्हाण, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे.

(ऊ) गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक– रु.४००/-

'महात्मा फुलेंची बदनामी-एक सत्यशोधन', हरि रामचंद्र नरके, सुगावा प्रकाशन, पुणे.

(ए) लोकहितवादी देशमुख पारितोषिक– रु.७५१/-

'स्वातंत्र्यवीर सावरकर-एक रहस्य', डॉ. द. न. गोखले, मौज प्रकाशन, मुंबई

(ऐ) कै. श्रीमंत रा. ना. नातू पुरस्कार– रु.७५०/-

'रमाबाई'– श्रीमती ज्योत्स्ना देवधर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई.

पारितोषिकांचा निर्णय करण्यासाठी परीक्षक म्हणून पुढील व्यक्तींनी काम केले–

श्री. मो. रा. वाळंबे, डॉ. द. दि. पुंडे, डॉ. कल्याणी दिवेकर, डॉ. हे. वि. इनामदार, डॉ. प्र. ल. गावडे, डॉ. विलास खोले, श्री. कमल देसाई, डॉ. वि. भा. देशपांडे, श्री. श्रीधर राजगुरू, श्री. दत्ता टोळ, श्री. चिंतामणी लाटकर, डॉ. वि. म. कुलकर्णी, श्री. हेमंत जोगळेकर आणि डॉ. वीणा देव (निमंत्रक)

**संमेलनाध्यक्ष डॉ. यू. म. पठाण यांचा सत्कार :**

पुणे येथे भरलेल्या ६३व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे नवनिर्वाचित अध्यक्ष डॉ. यू. म. पठाण यांचा महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे म. सा. प. चे अध्यक्ष श्री. ग. प्र. प्रधान यांच्या हस्ते, दि. २५/११/८९ रोजी प्रकट सत्कार करण्यात आला. या प्रसंगी श्री. शंकर पाटील, डॉ. शं. गो. तुळपुळे, डॉ. व. दि. कुलकर्णी, डॉ. हे. वि. इनामदार, आणि शंकर सारडा यांची श्री. पठाण यांच्या गौरवपर भाषणे झाली.

**महाराष्ट्र साहित्य पत्रिका :**

'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' या त्रैमासिकाचे एकूण ४ अंक या वर्षात प्रसिद्ध झाले. ऑक्टो-डिसें. १९८९ अंक दिवाळी अंक म्हणून प्रकाशित करण्यात आला. या अंकात 'आत्मभानाचे दिवस' या विषयावर मराठीतील नामवंत लेखकांनी लेख लिहिले.

अंकाची नियमित प्रसिद्धी व अंकाचे नवे स्वरूप यामुळे सभासदांनी समाधान व्यक्त केले.

**विभागीय संमेलन :**

परिषदेचे ६ वे विभागीय साहित्य संमेलन ३ व ४ जून रोजी पिंपरी-चिंचवड शाखेच्या वतीने प्रसिद्ध कवी प्रा. वसंत बापट यांच्या अध्यक्षतेखाली एच. ए वसाहतीतील वेलफेअर

सेंटरच्या सभागृहात यशस्वीपणे पार पडले. संमेलनाचे उद्घाटन खासदार प्रा. रामकृष्ण मोरे यांनी केले. डॉ. रामचंद्र देखणे यांच्या स्वागताध्यक्षीय भाषणानंतर श्री. शंकरराव खरात आणि डॉ. श्री. श्री. घारे यांच्या हस्ते मान्यवरांचा सत्कार करण्यात आला. श्री. विद्याधर गोखले यांनी नव्या अध्यक्षांना सूत्रप्रदान केल्यानंतर अध्यक्षांचा परिचय प्रा. ग. प्र. प्रधान यांनी करून दिला. प्रा. वसंत बापट यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात आजच्या कवितेसंबंधी अतिशय मार्मिक विवेचन केले. रात्री स्थानिक व नवोदित कवींचे संमेलन श्री. रवींद्र भट यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते.

दुसऱ्या दिवशी सकाळी ९ वाजता 'संतसाहित्य आज कालबाह्य झाले आहे काय ?' या विषयावर डॉ. प्र. ल. गावडे यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद झाला. त्यात डॉ. मु. श्री. कानडे, डॉ. व. दि. कुलकर्णी, डॉ. वसंत सावंत, डॉ. नरेंद्र कुंटे, डॉ. कुसुमाकर शिंपी, दिलीप फलटणकर, डॉ. रामचंद्र देखणे यांनी भाग घेतला होता. सकाळी ९ ते १ या वेळेत श्री. नारायण सुर्वे यांच्या अध्यक्षतेखाली प्रथितयश कवींचे संमेलन भरले होते. संमेलनाचे सूत्रसंचालन डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी केले. या संमेलनात शांता शेळके, अरुणा ढेरे, अनुराधा पोतदार, वसंत सावंत, अनिल कांबळे, राजा दीक्षित, रमण रणदिवे, सुधाकर नेर्लेकर, सरिता पदकी, स्नेहसुधा कुलकर्णी, गंगाधर महांबरे, कल्याण इनामदार, अमृत पऱ्हाड, रमेश वाकनीस, शरद देव, अरुण जाखडे, राजा मंगळवेढेकर आणि वसंत बापट यांनी भाग घेतला.

सायंकाळी श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली 'दूरदर्शन : वाङ्मयाला शाप की वरदान ?' या विषयावर परिसंवाद झाला. त्यात लीला गोविलकर, ललिता कुंभोजकर, शंकर सारडा, सतीश देशमुख, अनिल बळेल, वीणा देव, चि. शं. जोशी, डॉ. श्री. श्री. घारे यांनी भाग घेतला. नंतर अध्यक्ष प्रा. वसंत बापट यांचे समारोपाचे भाषण झाले. या वेळी आवर्जून उपस्थित असलेल्या प्रा. मंगेश पाडगावकरांनी आपली एक कविता पेश करून वाहवा मिळविली. डॉ. गं. ना. जोगळेकर (म. सा. प. तर्फे) आणि श्री. विजय जाधव (शाखेतर्फे) यांची आभाराची भाषणे झाल्यावर संमेलनाचा समारोप झाला. रात्री प्रा. द. मा. मिरासदार, श्रीमती ज्योत्स्ना देवधर आणि काही नवोदित कथाकारांच्या कथाकथनाचा बहारदार कार्यक्रम झाला.

प्रस्तुत विभागीय संमेलन यशस्वी रीतीने साजरे करण्यात डॉ. रामचंद्र देखणे, डॉ. श्री. श्री. घारे, श्री. विजय जाधव, प्रा. शरद देव, सौ. मनाली गाडगीळ इत्यादी कार्यकर्त्यांनी खूप परिश्रम केले. शाखेच्या या सर्व कार्यकर्त्यांची तसेच महापौर श्री. कविचंद भाट आणि पिंपरी-चिंचवडच्या सर्व नगरसेवकांची परिषद फार आभारी आहे.

**दिवाळी अंक स्पर्धा १९८९** *मधील पुढील तीन उत्कृष्ट दिवाळी अंकांना प्रत्येकी रु. १०१/- चे पुरस्कार देण्यात आले.*

(१) विविधज्ञान विस्तारकर्ते रावसाहेब मोरमकर पुरस्कार

*'श्री वत्स'* संपादक : श्री. आशुतोष शेवाळकर

(२) कै. शं. वा. किर्लोस्कर पुरस्कार

*'किस्त्रीम'* संपादक : श्री. भा. महाबळ

(३) कै. मनोरंजनकार का. र. मित्र पुरस्कार

*'दीपावली'* संपादक : अशोक कोठावळे

या पुरस्कारांबरोबरच दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललित लेखास देण्यात येणारा कै. प्रा. अनंत काणेकर पुरस्कार (रु. २००/-) श्रीमती वासंती मुझुमदार यांना त्यांच्या 'साधना' या दिवाळी अंकातील 'पुरवणी पान' या लेखाबद्दल देण्यात आला. पुरस्कारनिवडीचे काम डॉ. अंजली सोमण, श्री. बापू वाटवे आणि सौ. वीणा देव (निमंत्रक) या समितीने केले.

**संदर्भ ग्रंथालय :**

परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयाचा लाभ सुमारे आठशे सभासद सध्या घेत आहेत. वर्षारंभी ग्रंथसंख्या २४४४९ ही होती. त्यात मार्च ९० पर्यंत ६३५ ग्रंथांची भर पडली. (अभिप्रायासाठी २६९, भेटीदाखल ७६, विकत घेतलेली १५५ व बक्षिसासाठी आलेली १३५. एकूण ग्रंथसंख्या २५०६३ इतकी आहे.) या वर्षी ग्रंथालयातील पुस्तकांची मोजणी करण्यात आली. त्यात विविध विषयातील सुमारे २१ पुस्तके हरवल्याचे आढळून आले. त्यामुळे मार्च ९० अखेर ग्रंथसंख्या २५०६३ इतकी आहे.

**शाखा सभा मेळावा :**

परिषदेच्या शाखा सभांचे प्रतिनिधी आणि परिषदेचे पदाधिकारी यांचा संयुक्त मेळावा दि. ३/१२/८९ रोजी श्रीरामपूर येथे आयोजित करण्यात आला होता. शाखा प्रतिनिधींशी मनमोकळी चर्चा करण्यात आली. सर्व शाखांसाठी समान नियमावलीचा मसुदा तयार करण्यात आला. हा मसुदा सर्व शाखांकडे पाठवून, त्यांच्याकडून सूचना मागविण्याचे ठरविण्यात आले. श्रीरामपूर येथील या मेळाव्याला परिषदेतर्फे श्री. राजेंद्र बनहट्टी (कार्याध्यक्ष), राजा फडणीस (कार्यवाह), गं. ना. जोगळेकर (कार्यवाह), चिं. शं. जोशी (कार्यवाह), पद्माकर शिरवाडकर आणि म. पां. भावे (ठाणे), किशोर पाठक (नाशिक), अरुण जाखडे (पिंपरी-चिंचवड), हो. पं. चौधरी (जळगाव), अशोक राव (इचलकरंजी), ल. रा. कांबळे (येवले) आणि श्रीरामपूर शाखेच्या कार्यकारिणीचे सर्व सदस्य उपस्थित होते. श्रीरामपूर शाखेने उत्तम आयोजन केले होते. पुढील शाखा प्रतिनिधी यांची सभा येवला शाखेमार्फत घेण्याचे येवला शाखेने दिलेले निमंत्रण या वेळी स्वीकारण्यात आले.

श्रीरामपूर येथे ठरल्याप्रमाणे शाखा नियमावलीचा मसुदा सर्व शाखांकडे विचारार्थ पाठविण्यात आला. शाखांकडून आलेल्या सूचनांचा विचार करण्यासाठी पुणे येथे सर्व शाखा प्रतिनिधींची बैठक १५/४/९० रोजी बोलाविण्यात आली. या बैठकीत या नियमांना अंतिम मंजुरी देण्यात येणार आहे.



अनुक्रमणिका

**परीक्षा कार्य :**

जानेवारी १९९० मध्ये झालेल्या मराठीच्या परीक्षांची एकूण केंद्रे ३५ होती. या परीक्षांना बसलेले परीक्षावार उमेदवार पुढीलप्रमाणे– प्रथमा-१२७८, प्रवेश-३५२, प्राज्ञ-१५, विशारद-२६. गोमंतक मराठी अकादमीने मराठीच्या अभ्यासास चालना देण्यासाठी योजनाबद्ध प्रयत्न केल्यामुळे प्रथमा परीक्षेसाठी गोमंतकातून मोठ्या प्रमाणावर प्रतिसाद मिळाला. (एकूण केंद्रे-१६, उमेदवार-४५९) प्राज्ञ-विशारद परीक्षांच्या उमेदवारांची संख्या मात्र तितकीशी उत्साहवर्धक नाही.

या सर्व परीक्षांमध्ये यशस्वी झालेले गुणानुक्रमे पहिले तीन उमेदवार पुढीलप्रमाणे–

**प्रथमा–** (१) प्राची अजित सुखटणकर– ज्ञानप्रबोधिनी– पुणे ८४%

(२) यशश्री भालचंद्र कुलकर्णी– टिळकनगर विद्यामंदिर, डोंबिवली– ८३%

(३) हेमलता प्रकाश नातू– किर्लोस्कर हायस्कूल, किर्लोस्करवाडी– ८१%

**प्रवेश–** (१) स्वप्ना जयंत देशपांडे– टिळकनगर विद्यामंदिर, डोंबिवली– ७६.१%

(२) श्रद्धा अनिल उन्हाळे– टिळकनगर विद्यामंदिर, डोंबिवली– ७६%

(३) माधवी बाळासाहेब सावंत– सरस्वती सेकंडरी स्कूल, ठाणे– ७५.१%

**प्राज्ञ–** (१) जयश्री बबन विलायते– म.सा.प शाखा, श्रीरामपूर– ६१.३%

(२) रॉड्रिक्स लूक फेलीक्स– मा.रा. सारडा कन्यामंदिर, नाशिक– ५२%

(३) प्रमिला प्रभाकर चितळे– महाराणी चिमणाबाई हायस्कूल, बडोदा– ५०%

**विशारद–** (१) सरितागौरी विनायक वेहेरे– म.सा.प., पुणे– ६४%

(२) संगीता गोपाळ देशपांडे– म.सा.प. पुणे,– ६३%

(३) सतीश दत्ताराम चव्हाण– वराडकर कला महाविद्यालय, दापोली– ६२%

डॉ. गं.ना. जोगळेकर यांच्या मार्गदर्शनाखाली या वर्षीचे परीक्षाकार्य सुरळीतपणे पार पडले.

डॉ. कल्याणी दिवेकर, प्रा. मधुरा कोरान्ने, डॉ. व.न. कुबेर, डॉ. श्रीलेखा साने, डॉ. सुप्रिया अत्रे, डॉ. माधवी वैद्य, डॉ. मंजिरी नेऊरगावकर, डॉ. ललिता कुंभोजकर, डॉ. अंजली कान्हेरे, डॉ. शैला काळकर, डॉ. विनया डोंगरे, सौ. शुभांगी भट, सौ. आशा जोशी, श्री. शरद अनवलीकर, सौ. लीला होनप, प्रा. सौ. वैजयंती चिपळूणकर, प्रा. सौ. जानकी देसाई, प्रा. सौ. सुनीता पळसोदकर, प्रा. सौ. रेखा आठवले, प्रा. सौ. आरती दातार, प्रा. आशा जोशी, डॉ. सौ. उज्ज्वला गोखले, डॉ. शशिकांत देशपांडे, प्रा. जयश्री पाटील, सौ. नीलम पेंडसे या सर्वांनी या वर्षीच्या परीक्षाकार्यात आत्मीयतेने सहकार्य केले.

परीक्षा-केंद्रांचे संचालक, मुख्याध्यापक, वर्गाची तयारी करून घेणारे शिक्षक या सर्वांचे आम्ही आभारी आहोत. या परीक्षांना शासकीय मान्यता व समकक्षता मिळावी म्हणून परिषदेचे प्रयत्न चालू आहेत.

**अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ :**

अ.भा. मराठी साहित्य महामंडळाचे कार्यालय एप्रिल १९८९ पासून म.सा. परिषदेकडे व्यवस्थापनासाठी आले आहे. महामंडळाच्या मुंबईच्या ७-४-८९ च्या सभेत श्री. राजेंद्र बनहट्टी (अध्यक्ष), राजा फडणीस (कोषाध्यक्ष) आणि गं.ना. जोगळेकर, (कार्यवाह) या परिषदेच्या प्रतिनिधींची महामंडळाचे पदाधिकारी म्हणून निवड करण्यात आली.

या वृत्तान्त कालावधीत महामंडळाच्या तीन सभा झाल्या. पहिली सभा ९ जुलै १९८९ रोजी पुणे येथे घेण्यात आली. या सभेत महामंडळाच्या नवीन घटनेला संमती देण्यात आली. ही नवीन घटना ९-७-८९ पासून अमलात आली. गं.ना. जोगळेकर यांच्या नियंत्रणाखाली घटक संस्थामार्फत घेण्यात येणाऱ्या परीक्षाविषयक प्रश्नांचा विचार करण्यासाठी व मराठी साहित्य मंडळाच्या प्रचलित असलेल्या शुद्धलेखनविषयक नियमांमधील उणिवा नाहीशा करण्याच्या दृष्टीने, अशा दोन समित्या नेमण्यात आल्या. महामंडळाचे कार्य अधिक समावेशक आणि व्यापक करण्याच्या दृष्टीने महामंडळ आणि महामंडळाच्या घटक संस्था यांच्याखेरीज ज्या अनेक संस्था विविध प्रकारची साहित्य संमेलने भरवीत असतात त्यांच्या पदाधिकाऱ्यांची किंवा प्रतिनिधींची बैठक बोलावून त्यांच्याशी संवाद साधण्याचे अधिकार महामंडळाचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांना देण्यात आले. त्याप्रमाणे या बैठकीची पूर्वतयारी करून अशी बैठक पुणे येथे ७-१-९० रोजी बोलाविण्यात आली. या बैठकीस पुढीलप्रमाणे [illegible] प्रतिनिधी उपस्थित होते.

दि. २३/९/८९ रोजी पुणे येथे मा. मुख्यमंत्री शरद पवार यांची [illegible] महामंडळाच्या शिष्टमंडळाने भेट घेतली. श्री. राजेन्द्र बनहट्टी यांच्या नेतृत्वाखाली गेलेल्या या शिष्टमंडळात, श्री. के.ज. पुरोहित, श्री. राम शेवाळकर, श्री. गं.ना. जोगळेकर आणि श्री. राजा फडणीस यांचा समावेश होता. श्री. शरद पवार यांनी शिष्टमंडळाचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले व त्याच ठिकाणी पुढील मागण्या मान्य करण्याचे आश्वासन दिले– (१) महामंडळ व त्यांच्या घटक संस्था यांना प्रत्येकी एक लाख वार्षिक विनाअट अनुदान देणे. (२) महामंडळाच्या घटक संस्था घेत असलेल्या मराठीच्या परीक्षांना शासनमान्यता देणे. (३) विविध सहकारी [illegible] व साहित्य संस्कृती मंडळ यावर महामंडळ व त्यांच्या घटक संस्था यांचे प्रतिनिधी नेमणे.

मा. मुख्यमंत्री यांनी कबूल केल्याप्रमाणे ८९-९० या वर्षासाठी महामंडळ व [illegible] ही घटक संस्थांना रु. एक लाखाची अनुदान रक्कम जानेवारी १९९० मध्ये देण्यात आली. तसेच महामंडळाचे अध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी यांची साहित्य संस्कृती मंडळाचे पदसिद्ध सभासद म्हणूनही नेमणूक करण्यात आली.

महामंडळाची दुसरी सभा १ ऑक्टो. ८९ रोजी औरंगाबाद येथे घेण्यात आली. या सभेत पुणे येथे होणाऱ्या ६३ व्या अ.भा. मराठी साहित्य संमेलनाच्या कार्यक्रमाचा आराखडा ठरविण्यात आला.



अनुक्रमणिका






महामंडळाची तिसरी सभा १९ जाने.९० रोजी पुणे येथे संमेलनप्रसंगी घेण्यात आली. मा. मुख्यमंत्री शरद पवार यांनी महामंडळाच्या मागण्या मान्य करून त्यावर त्वरित कार्यवाही केल्याबद्दल त्यांचे आभार मानण्याचा ठराव संमत करण्यात आला. त्याचप्रमाणे संमेलनात मांडण्यात यावयाच्या ठरावांबद्दल चर्चा होऊन ते संमत करण्यात आले.

**महाराष्ट्र साहित्य परिषदेस मिळालेल्या देणग्या**

(१) डॉ. म. वि. गोखले सत्कार समितीने दरवर्षी प्रसिद्ध होणाऱ्या नाट्यसमीक्षात्मक स्वतंत्र ग्रंथाला रु.७५०/- चे पारितोषिक देण्यासाठी रु.१००००/- ची देणगी दिली आहे.

(२) कै. प्रा. डॉ. विद्याधर पुंडलीक यांच्या स्मृत्यर्थ त्यांच्या कुटुंबियांनी रु. १००००/- देणगी महाराष्ट्र साहित्य परिषदेला दिली आहे. या देणगीवरील व्याजातून प्रतिवर्षी आलटून पालटून व्यक्तिचित्रे/ ललित ग्रंथ आणि एकांकिका या पुस्तकाला रु.७५०/- चे पारितोषिक देण्यात येणार आहे.

(३) वा.गो.आपटे संदर्भ ग्रंथालयासाठी स्टीलची कपाटे खरेदी करण्यासाठी, व्ही. जी. आपटे इस्टेट ट्रस्ट यांच्या विश्वस्तांनी रु.१००००/- ची देणगी दिली.

या सर्व देणगीदारांची परिषद मनःपूर्वक आभारी आहे.

**अनुदान :**

महाराष्ट्र शासनाने प्रतिवर्षी एक लाख रुपये अनुदान म्हणून देण्याचे मान्य केले.८८-८९ ची अनुदानाची ही रक्कम जाने.९० मध्ये परिषदेकडे आली. हे अनुदान मिळविण्यासाठी अ.भा. मराठी साहित्य महामंडळ यांनी प्रयत्न केले. अ.भा. साहित्य महामंडळ आणि मा. मुख्यमंत्री शरद पवार आणि महाराष्ट्र शासन यांची परिषद आभारी आहे.

**श्रद्धांजली :**

परिषदेचे माजी कार्याध्यक्ष सोवतकार कै. ग.वा. बेहेरे यांना ५ एप्रिल ८९ ला परिषदेतर्फे प्रकटरीत्या श्रद्धांजली वाहण्यात आली. प्राचार्य बाळ गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या या सभेत सर्वश्री श्रीपाद जोशी, वसंत काणे, प्रभाकर ऊर्ध्वरेषे, शंकर सारडा आणि गं.ना.जोगळेकर यांची भाषणे झाली व शेवटी श्रद्धांजली वाहणारा ठराव संमत करण्यात आला.

सुप्रसिद्ध कथाकार कै. विद्याधर पुंडलीक आणि कै. प्रभाकर ऊर्ध्वरेषे यांना श्रद्धांजली वाहणारा कार्यक्रम झाला.

**ऋणनिर्देश :**

परिषदेच्या कार्यकारी मंडळाने केलेल्या विविध कार्यांत अनेक व्यक्ती आणि संस्था यांचे सतत सहकार्य लाभले. महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र राज्य शिक्षण खाते, ग्रंथालय-संचालनालय,












महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, विश्वकोश कार्यालय, पुणे महानगरपालिका, तसेच परिषदेच्या साहित्यिक साहाय्य निधीस भरघोस देणग्या देणाऱ्या व्यक्ती व संस्था, सर्व शाखासभांचे कार्यकर्ते, वृत्तपत्रे, नियतकालिके, आकाशवाणी, नव्याने झालेले आजीव व साधारण सभासद तसेच हितचिंतक या सर्वांचे आम्ही ऋणी आहोत.

आपले,
राजा फडणीस, गं.ना. जोगळेकर, चिं.शं. जोशी
कार्यवाह.

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे.

**१/४/९० ते ३०/६/९० या कालावधीचे कार्यवृत्त.**

**४-५ एप्रिल १९९० :** कै. सावित्रीबाई बारलिंगे स्मृत्यर्थ डॉ. र.बा. मंचरकर यांची दिनांक ४ व ५ एप्रिल १९९० रोजी 'संतांच्या कार्याचे सामाजिक मूल्यांकन आणि ऐतिहासिक विवेक' या विषयावर दोन व्याख्याने झाली.

**१० एप्रिल १९९० –** प्रतिवर्षीप्रमाणे सकाळी म.सा.प चे पदाधिकाऱ्यांनी कमला नेहरु उद्यानातील डॉ. केतकर यांच्या स्मारकास पुष्पांजली वाहिली. सायंकाळी परिषदेत डॉ. वि.मा. बाचल यांचे 'कम्युनिस्ट जगातील घडामोडी : शोध आणि बोध' या विषयावर व्याख्यान झाले.

**२१ जून १९९० –** नाथमाधव यांच्या स्मृत्यर्थ 'नाथमाधव : व्यक्ती आणि वाङ्मय' या विषयावर डॉ. न.म. जोशी यांचे व्याख्यान झाले.

**२५ जून १९९० –** कै. का.र. मित्र यांच्या स्मृत्यर्थ डॉ. हे.वि. इनामदार यांचे 'पत्रकारांपुढील काही प्रश्न' या विषयावर व्याख्यान झाले.

**परिषदेचा वर्धापन दिन :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ८४ वा वर्धापनदिन, रविवार दिनांक २७ मे रोजी 'लोकसत्ता दैनिकाचे संपादक पद्मश्री श्री. माधव गडकरी यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. कार्याध्यक्ष राजेन्द्र बनहट्टी यांनी प्रास्ताविक केले. नंतर कार्यवाह गं.ना. जोगळेकर यांनी डॉ. श्री. रं. कुलकर्णी यांचा परिचय करून दिला.

या समारंभाच्या प्रसंगी 'महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक' रु. ३००० व मानचिन्ह व्यासंगी संशोधक-समीक्षक डॉ. श्री.रं. कुलकर्णी यांना देण्यात आले. डॉ. कुलकर्णी यांनी समयोचित भाषण करुन महाराष्ट्राच्या सीमेलगत असलेल्या प्रदेशात मराठी भाषेच्या दृष्टीने










काय करता येईल याविषयीचे मार्गदर्शन केले. त्यांच्या ऋजु आणि विचारप्रधान भाषणाचे अध्यक्षांसह सर्वांनी सहर्ष स्वागत केले.

महाराष्ट्र साहित्य परिषदेने 'साहित्यिक साहाय्य निधी' ची योजना कार्यान्वित केली आहे. या योजनेनुसार या वर्षी कोल्हापूर येथील कथाकार श्री. बाबा पाटील यांना साहाय्य देण्यात आले. श्री. बाबा पाटील यांचा परिषदेचे अध्यक्ष प्रा. ग.प्र. प्रधान यांनी परिचय करून दिला. 'हा पुरस्कार म्हणजे एक मोठा सन्मान आहे' असा अभिप्राय श्री. पाटील यांनी आपल्या उत्तरादाखल केलेल्या भाषणात व्यक्त केला.

विदर्भ साहित्य संघाचे ज्येष्ठ कार्यकर्ते श्री. अ.ल. लिमये यांची या वर्षीच्या कै. डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कारासाठी (रु.१०००) निवड करण्यात आली होती. श्री. लिमये यांच्या कार्याची ओळख कोषाध्यक्ष म.वि. गोखले यांनी करून दिली. श्री. लिमये यांनी ग्रंथालय चळवळ आणि साहित्यिक चळवळ यांच्या एकरूपतेचा प्रयत्न आवश्यक असल्याचा विचार प्रभावीपणे मांडला.

नंतर महाराष्ट्र साहित्य परिषदेकडे विविध वाङ्मय प्रकारांसाठी असलेल्या पारितोषिकांचे वितरण अध्यक्षांच्या हस्ते झाले. शेवटी अध्यक्षीय समारोपाचे भाषण करताना श्री. गडकरी यांनी महाराष्ट्र साहित्य परिषद करीत असलेल्या विविध उपक्रमांचे मनापासून कौतुक केले. त्याचप्रमाणे त्यांनी शासन आणि साहित्यसंस्था यांच्या संबंधाबाबत आपले परखड विचार व्यक्त केले. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन डॉ. वीणा देव यांनी नेटकेपणाने केले आणि संपूर्ण कार्यक्रमाचे संयोजन कार्यवाह राजा फडणीस यांनी केले.

या समारंभामध्ये देण्यात आलेल्या विविध पारितोषिकांच्या आणि पुरस्कारांच्या निवड समितीत पुढील व्यक्तींचे सहकार्य लाभले–

श्री. यू.म. पठाण, श्री. वि.रा. करंदीकर, श्री. शरच्चंद्र गोखले आणि श्री. राजेन्द्र बनहट्टी (साहित्य परिषद पारितोषिक), श्री. म.श्री. दीक्षित, श्री. व.दि. कुलकर्णी आणि श्री. राजा फडणीस (कै. भीमराव कुलकर्णी पुरस्कार) श्री. शंकर पाटील, श्री. यदुनाथ थत्ते, श्री. सरोजिनी बाबर, श्री. ज्योत्स्ना देवधर, श्री. राजा फडणीस (साहित्यिक साहाय्य निधी) विविध ग्रंथ पारितोषिकाची निवड करण्यासाठी ज्या परीक्षकांनी काम पाहिले त्यांची नावे याच अंकात 'ग्रंथ पारितोषिके' या शीर्षकाखाली छापली आहेत.

परिषद या सर्वांची आभारी आहे.

**शाखा प्रतिनिधींची बैठक :**

सर्व शाखांसाठी समान नियमावलीचा मसुदा शाखांकडे पाठविण्यात आला होता. त्यावर चर्चा करून, त्याला अंतिम स्वरूप देण्यासाठी दि. १५।४।९० रोजी पुणे येथे सर्व शाखांचे प्रतिनिधी आणि परिषदेचे पदाधिकारी यांची संयुक्त सभा बोलाविण्यात आली होती. या सभेत सर्व नियमांवर सविस्तर चर्चा होऊन, अंतिम नियमावली तयार करण्यात आली. हे



अनुक्रमणिका






नियम सर्व शाखांना १५ ।४ ।९० पासून लागू करण्यात आले.

या सभेस परिषदेतर्फे श्री. राजेंद्र बनहट्टी (कार्याध्यक्ष), श्री. राजा फडणीस, श्री. गं.ना.जोगळेकर, श्री. चिं.शं.जोशी (कार्यवाह), आणि श्री. म.वि.गोखले (कोषाध्यक्ष) उपस्थित होते. विविध शाखांतर्फे श्री. रा.व्यं. छत्रपती (सोलापूर), श्री. शशिकांत महाडेश्वर (कोल्हापूर), श्री. विजय कसबेकर (श्रीरामपूर), श्री.व्ही. सिन्नरकर (ठाणे), श्री. हो.पं. चौधरी (जळगाव), डॉ. कुसुमाकर शिंपी (धुळे), श्री. म.द. हातकणंगलेकर (सांगली), श्री. सूर्यकांत सरकार (येवले), श्री. अशोक गोवंडे (इचलकरंजी), श्री. अरुण जाखडे (पिंपरी चिंचवड), श्री. प्रभाकर संत (कल्याण) उपस्थित होते.

**कल्याण शाखेचे उद्‌घाटन :**

२९ एप्रिल १९९० रोजी कल्याण येथे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नव्या शाखेचे उद्‌घाटन परिषदेचे कार्याध्यक्ष राजेन्द्र बनहट्टी यांचे हस्ते करण्यात आले. या प्रसंगी परिषदेचे उपाध्यक्ष आणि नामवंत कवी श्री. नारायण सुर्वे आणि परिषदेचे कार्यवाह राजा फडणीस आणि चिं.शं. जोशी हेही उपस्थित होते.

१७ जून १९९० रोजी अ.भा. मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष आणि परिषदेचे कार्याध्यक्ष राजेन्द्र बनहट्टी आणि कार्यवाह राजा फडणीस यांनी विश्रांतवाडी येथे जाऊन, ज्ञानेश्वरांच्या पालखीचे स्वागत करून, ज्ञानेश्वर माऊलीस पुष्पहार अर्पण केला.

**कार्यकारी मंडळ सभा :**

दि. १४ एप्रिल ९० रोजी आळंदी देवस्थानचे प्रमुख विश्वस्त डॉ. प्र.ल.गावडे यांचे आमंत्रणानुसार, कार्यकारी मंडळाची सभा आयोजित करण्यात आली होती. ज्ञानेश्वरीच्या सप्तशताब्दी वर्षात आळंदी देवस्थान आणि साहित्य परिषद यांनी मिळून काही विशेष सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करण्याचे ठरविण्यात आले. या सभेस विश्वस्त श्री. म. श्री. दीक्षित उपस्थित होते.

**देणगी :**

सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक कै. शं.ना. जोशी यांच्या स्मृत्यर्थ त्यांच्या पत्नी श्री. अन्नपूर्णाबाई जोशी यांनी परिषदेला, परिषदेच्या ८४ व्या वर्धापन दिन प्रसंगी रु.६००००/- ची देणगी दिली. या देणगीच्या रकमेच्या व्याजातून प्रतिवर्षी इतिहास/ सामाजिक वा सांस्कृतिक स्वरूपाच्या ग्रंथाला रु.५०००/- चा कै. शं.ना.जोशी पुरस्कार देण्यात येणार आहे. परिषद देणगीदारांची आभारी आहे.

राजा फडणीस/ गं.ना.जोगळेकर/ चिं.शं.जोशी
कार्यवाह

*



अनुक्रमणिका








# शाखा वृत्तान्त :

---

## जळगाव शाखा

दि. २/९/८९- ला प्रा. म. मो. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली प्र. श्रां. चौधरी यांचा डॉक्टरेट मिळाल्याबद्दल सत्कार करण्यात आला. प्रास्ताविक श्री. हो. पं. चौधरी यांनी केले. प्रा. राजा महाजन, प्रा. शा. न. पाटील, सौ. नीता फेगडे, त्र्यं. वि. भोळे यांनी गौरवपर भाषणे केली. आभार प्रा. दि. व. पाटील यांनी मानले. सौ. सुशील पगारिया यांचे 'नाच ग घुमा' या आत्मचरित्रावर अभ्यासपूर्ण भाषण शाखाध्यक्ष भागवतराव दादा चौधरी यांचे अध्यक्षतेखाली झाले. प्रा. शा. न. पाटील यांनी आभार मानले.

दि. ५/२/९०- ला द. वि. गंधे यांचे भाषाप्रभू गडकरी यावर व्याख्यान झाले. अध्यक्ष ना. चिं. शिरसाळे होते. प्रास्ताविक हो. पं. चौधरी यांनी केले.

दि. २५/३/९०- ला केंद्रशाखेने दिलेले कै. पिलाजीराव फडणीस स्मृतिमालेचे व्याख्यान आदरणीय श्री. भैया उपासनी यांचे 'मी एक वाचक' या विषयावर झाले. सुरुवातीला मु. द. छापेकर यांच्या निधनानिमित्त श्रद्धांजली अर्पण केली. प्रा. दि. व. पाटील यांनी आभार मानले.

हो. प. चौधरी, कार्याध्यक्ष.

## नगर शाखा

दि. १ मे ८९- प्रा. रतनलाल सोनग्रांचा सत्कार (साहित्य संस्कृति मंडळावर उपाध्यक्ष म्हणून निवडून आल्याबद्दल)

दि. १९ मे ८९- प्रा. यशवंत मनोहर यांचा सत्कार (साहित्य संस्कृति मंडळावर अध्यक्ष म्हणून निवड झाल्याबद्दल)

दि. २२ जुलै ८९- कै. ग. ल. ठोकळ स्मृतिदिन व्याख्यान. वक्ते डॉ. अरविंद वामन कुलकर्णी, विषय- ग्रामीण साहित्य.

दि. १७, १८, १९ ऑगस्ट ८९- नगर जिल्ह्यातील ८ ते १० पर्यंतच्या इयत्तांच्या मराठी शिक्षकांचे तीन दिवसाचे शिबिर. (बी. एड्. कॉलेजच्या सहकार्याने)

विषय- इयत्तांनुसार मराठीचे-गद्य-पद्य-व्याकरण यांचे अध्यापन कसे करावे ?

स्थळ- कन्याविद्यामंदिर, अहमदनगर.

वक्ते- श्री. द. श्री. कुलकर्णी. डॉ. प्रा. सौ. जोगळेकर (प्राचार्या बी. एड्. कॉलेज)

डॉ. प्रभा मुळे (बी. एड्. कॉलेज)

डॉ. हेबाळकर (बी. एड्. कॉलेज)

डॉ. ह. कि. तोडमल व डॉ. लीला गोविलकर

सर्व व्यवस्था प्रा. प्रकाश गंधे.

(नगर जिल्ह्यातील ६०/६५ शाळांमधून प्रतिनिधी आले होते.)

**२५ सप्टेंबर ८९–** सानेगुरुजी स्मृतिव्याख्यान प्रा. महावीर जोंधळे यांचे व्याख्यान व कविसंमेलन.

**७ ऑक्टोबर ८९–** 'खिडक्या' या प्राचार्य डॉ. म. ना. बोपर्डीकर यांच्या ललित लेखसंग्रहाचे प्रकाशन (स्फुर्ति प्रकाशनच्या सहकार्याने)

प्रमुख पाहुणे– कुलगुरू डॉ. श्रीधर गुप्ते

**२८ व २९ डिसेंबर ८९–** डॉ. सदानंद मोरे यांची 'श्रीकृष्ण व महाभारत' या संदर्भात दोन व्याख्याने.

**८ ते १३ जाने ९०– वसंत– व्याख्यानमाला**

(जिल्हा वाचनालयाच्या सहकार्याने)

या कालखंडात पुढील वक्त्यांची व्याख्याने झाली :

डॉ. मु. श्री. कानडे, डॉ. कल्याण काळे, डॉ. द. दि. पुंडे, डॉ. सुधाकर भोसले, डॉ. आनंद यादव, डॉ. अशोक कामत. डॉ. गं. ना. जोगळेकर. डॉ. सु. प्र. कुलकर्णी, डॉ. खांदवे, प्रा. पद्माकर पुंडे, प्रा. य. प्र. कुलकर्णी (अधिष्ठाता, कला शाखा)

या व्याख्यानमालेच्या समारोपाच्या प्रसंगी नगरशाखेच्या **विद्यार्थिविभागाचे उद्घाटन डॉ. गं. ना. जोगळेकर** यांच्या हस्ते करण्यात आले. 'थापा मारणे' यातील विजेत्यांना बक्षिसे प्रा. य. प्र. कुलकर्णी यांच्या हस्ते देण्यात आली.

नगरशाखेच्या या विद्यार्थिविभागाने फेब्रुवारी ९० मध्ये काव्यवाचनस्पर्धा घेतली व एप्रिल ९० मध्ये तिकिटे लावून कथाकथनाचा कार्यक्रम यशस्वी केला. श्री. कळमकर, श्री. जोशी, कु. शिल्पा रसाळ यांनी विशेष परिश्रम घेतले.

**१४ जानेवारी ९०–** डॉ. यू. म. पठाण यांचा सत्कार समारंभ– मा. सेतुमाधवराव पगडी यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाला.

**२५ ते २८ फेब्रुवारी ९०–** श्रीज्ञानेश्वरी सप्तजन्मशताब्दि व्याख्यानमाला (जैन धार्मिक बोर्डाच्या सहकार्याने) वक्ते प्रा. सुहास जोशी, माननीय मुकुंदमहाराज, डॉ. मु. श्री. कानडे व डॉ. यू. म. पठाण.

ज्ञानेश्वरी-माहात्म्य, जैनधर्म व तत्त्वज्ञान-परंपरा इ. विषयांवर यांची व्याख्याने झाली.

सुजाता महाजन. कार्यवाह

## कोल्हापूर

**४ मे १९८९–** साहित्य अकादमी पारितोपिक विजेते 'उचल्या'कार लक्ष्मण गायकवाड

यांचा इतर संस्थांच्या सहकार्याने सत्कार करण्यात आला.

**६ मे १९८९–** अ. भा. म. सा. संमेलनाचे अध्यक्ष प्रा. के. ज. पुरोहित यांचा सत्कार आयोजित करण्यात आला. त्यात शाखा सहभागी झाली.

**३-४ जून १९८९–** पिंपरी-चिंचवड येथे झालेल्या म. सा. प. विभागीय संमेलनात शाखेच्या वतीने कार्यवाह शशिकांत महाडेश्वर सहभागी झाले व उत्तम कार्याबद्दलचा सत्कार स्वीकारला.

**१६ जून १९८९–** साहित्य संस्कृति मंडळाचे सदस्य असलेल्या डॉ. यशवंत मनोहर, प्रा. फ. मु. शिंदे, वामन निंबाळकर आदी मान्यवरांचा सत्कार व कविसंमेलन.

**२ सप्टेंबर १९८९–** वि. स. खांडेकरांच्या पुण्यतिथीनिमित्त त्यांच्या स्मृतीला अभिवादन करण्यात आले.

प्रा. भैरव कुंभार, शशिकांत महाडेश्वर कार्यवाह.

## वाई

**दि. १९ ऑगस्ट १९८९–** पु. भा. भावे स्मृतिव्याख्यान मालेतर्फे श्री. प्र. नी. नवरे यांचे व्याख्यान झाले. प्रास्ताविक अशोक स. भट यांनी केले. प्रा श्रीपाद नानजकर यांनी आभार मानले. अध्यक्षस्थानी डॉ. अ. वि. प्रभुणे होते.

**दि. १९ ऑक्टोबर १९८९–** ना. ह. आपटे जन्मशताब्दीनिमित्त डॉ. सौ. सौदामिनी चौधरी, पांचगणी यांचे व्याख्यान. दलितमित्र रा. ना. चव्हाण यांचा महाराष्ट्र सरकारने दिलेल्या गौरववृत्तीबद्दल सत्कार, तसेच म. सा. प. वाई शाखेचे माजी कार्याध्यक्ष डॉ. वसंत स. जोशी यांनी साठाव्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल व त्यांचे 'मराठी गौळण' हे पुस्तक प्रकाशित झाल्याबद्दल त्यांचा सत्कार. प्रास्ताविक प्रा. विजयकुमार फरांदे यांनी केले. परिचय डॉ. पंडित टापरे यांनी करून दिला. अध्यक्षस्थानी डॉ. अ. वि. प्रभुणे होते. प्रा. श्रीपाद नानजकर यांनी आभार मानले.

**दि. १३ जानेवारी १९९०–** डॉ. अरविंद वामन कुलकर्णी, पुणे यांचे वि. द. घाटे 'स्मृतिनिमित्त' ग्रामीण साहित्य व ग्रामीण अर्थव्यवस्था या विषयावर व्याख्यान. प्रास्ताविक अशोक स. भट यांनी केले. डॉ. वसंत जोशी यांनी पाहुण्यांचा परिचय करून दिला. आभार प्रा. विजयकुमार फरांदे यांनी मानले.

**दि. १९ एप्रिल १९९०–** वार्षिक सर्वसाधारण सभा झाली. त्यात पुढील कार्यकारी मंडळाची निवड करण्यात आली. **अध्यक्ष** डॉ. अ. वि. प्रभुणे, **उपाध्यक्ष** श्री. पां. वा. नातू, ॲड. भा. द. प्रभुणे, **कार्याध्यक्ष** ॲड. अशोक स. भट, **कार्यवाह** प्रा. विजयकुमार फरांदे, श्री. मधुसूदन नेने **कोषाध्यक्ष** श्री. माणिकचंद ओसवाल. **सभासद** डॉ. वसंत स. जोशी, डॉ. शरद अभ्यंकर, प्रा. श्रीपाद नानजकर, डॉ. आनंदराव अ. कदम, श्री. नरहर नायगावकर, प्रा. रमेश डुबल, प्रा. सतीश सूर्यवंशी.

मधुसूदन नेने, प्रा. विजयकुमार फरांदे कार्यवाह.



अनुक्रमणिका

## श्रीरामपूर शाखा

**१३ जुलै १९८९**– विविध विषयांवर चर्चा करण्यासाठी म.सा.प. सभासदांची बैठक आणि स्थानिक कवींचे काव्यवाचन.

**२० ऑगस्ट १९८९**– म.सा.प.च्या परीक्षांसंदर्भात चर्चा करण्यासाठी बैठक. या बैठकीत परीक्षांच्या कामकाजाचे नियोजन करण्यात आले.

**३१ ऑगस्ट १९८९**– म.सा.प. शाखा श्रीरामपूर कार्यकारिणी आणि मुख्याध्यापक यांची म.सा.प.च्या परीक्षा संदर्भात चर्चा करण्यासाठी बैठक.

**९ सप्टेंबर १९८९**– म.सा.प.च्या प्रथमा, प्रवेश, प्राज्ञ व विशारद या परीक्षा वर्गांचे उद्घाटक– डॉ. शरदराव आगाशे, अध्यक्ष– अण्णा पेंडसे, प्रमुख पाहुणे– वसंतराव देशमुख (संपादक दै. सार्वमत) प्रमुख उपस्थिती– ॲड. रावसाहेब शिंदे, प्राचार्य शिवाजीराव भोर, प्राचार्य विजय कसबेकर, सूत्रसंचालन– रामचंद्र राऊत.

**२८ सप्टेंबर १९८९**– म.सा.प. शाखा श्रीरामपूरचे उपाध्यक्ष नागेश अनंत पेंडसे आणि कोषाध्यक्ष हरिभाऊ कुलकर्णी यांना श्रद्धांजली.

**२७ नोव्हेंबर १९८९**– दि. ३ डिसेंबर १९८९ रोजी आयोजित करावयाच्या बैठकीचे नियोजन करण्यासाठी बैठक. कवी नारायण सुमंत व इतर कवींचे काव्यवाचन.

**३ डिसेंबर १९८९**– म.सा.प.च्या सर्व शाखा प्रतिनिधींची संयुक्त बैठक. या बैठकीस कार्याध्यक्ष राजेंद्र बनहट्टी व कार्यवाह सर्वश्री राजा फडणीस, गं. ना. जोगळेकर, चिं. शं. जोशी व शाखा प्रतिनिधी उपस्थित होते. श्रीरामपूर शाखेचे प्रतिनिधी म्हणून सौ. सुमती लांडे यांनी कामकाज पाहिले. प्रारंभी बनहट्टी यांनी उपस्थितांचे स्वागत केले. त्यानंतर शाखा प्रतिनिधींनी 'मसाप'च्या कामकाजासंदर्भात सूचना केल्या. दुपारच्या सत्रात जानेवारी १९८९ मध्ये झालेल्या 'मसाप' परीक्षेत उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना बनहट्टी यांच्या हस्ते प्रमाणपत्रे देण्यात आली.

**२१ जानेवारी १९९०**– प्रा. बाबूराव उपाध्ये, प्रा. रामचंद्र राऊत, सौ. सुमती लांडे आदी स्थानिक कवींचे काव्यवाचन व साहित्यिक गप्पा.

**१८ फेब्रुवारी १९९०**– कार्यकारिणीची बैठक, वार्षिक कामकाजाचे नियोजन आणि 'नटसम्राट' या नाटकावर चर्चा.

साहित्य परिषदेमार्फत घेतल्या जाणाऱ्या प्रथमा, प्रवेश, प्राज्ञ, विशारद या परीक्षांचे अभ्यासवर्ग चालविले. (सप्टेंबर १९८९ ते डिसेंबर १९८९) प्राज्ञ परीक्षेत कु. जयश्री बबनराव विलायते ३०० पैकी सर्वाधिक १८५ गुण मिळवून सर्व केंद्रांत पहिली आली.

## कल्याण

महाराष्ट्र साहित्य परिषद हा एक जगन्नाथाचा रथ आहे. आणि त्याच्या शाखा ह्या त्याची चाके आहेत, असे उत्साहपूर्ण उद्गार अखिल भारतीय मराठी महामंडळाचे अध्यक्ष श्री. राजेंद्र











बनहट्टी यांनी कल्याण म. सा. प. शाखेच्या उद्घाटन समयी काढले. मराठी साहित्य मंदिर सभागृहात दि. २९ एप्रिल ९० रोजी उद्घाटन झाले. प्रमुख पाहुणे म्हणून कवी नारायण सुर्वे, म.सा.प. चे कार्यवाह राजा फडणीस हे उपस्थित होते.

लता मंगेशकर, कुसुमाग्रज, ज्ञानेश्वर नाडकर्णी यांच्या अभिनंदनाचे ठराव करण्यात आले. कल्याणातील पत्रकार श्री. क. ह. देशपांडे यांचा सत्कार केला गेला. राज्य नाट्य स्पर्धेतील द्वितीय आलेल्या 'अभिवादन' नाट्य संस्थेच्या 'लोभ नसावा ही विनंती' या नाटकातील कलावंतांचा सत्कार करण्यात आला. दिग्दर्शक रवींद्र लाखे, दीपक वैद्य व दिलीप बंगाली, संजय रणदिवे, स्मिता मोहरील हे हजर होते.

उद्घाटन समारंभापूर्वी सर्वसाधारण सभा ठाणे जिल्हा म.सा.प.चे अध्यक्ष व मसापचे कार्यवाह श्री. चिंतामण जोशी यांच्या उपस्थितीत झाली.

नवी कार्यकारिणी– अध्यक्ष– श्री. द. य. केळकर, उपाध्यक्ष– क. ह. देशपांडे आणि मनोहर हरकरे, कार्याध्यक्ष– प्र. अ. संत, कार्यवाह– भालचंद्र रेडे, सह कार्यवाह– श्री. द. ज. सोमठाणकर, कोषाध्यक्ष– बाळकृष्ण विरारी. व ११ कार्यकारिणी सभासद.

कार्यकारिणी सदस्य– (१) किरण जोगळेकर (२) अरविंद शिंपी (३) माधव डोळे (४) डॉ. गिरीश लटकें (५) सौ. वसुधा गद्रे (६) श्रीमती सुशीला मोतीवाले (७) किशोर खराटे (८) बाळ सिगासने (९) प्रा. भगवान भोईर (१०) यशवंत वैद्य (नियुक्त कार्यकारिणी) (११) चंद्रकांत कायदे (नियुक्त केंद्र)

भालचंद्र रेडे, कार्यवाह

## ठाणे

३१ मार्च १९९० अखेर संस्थेच्या पटावर आजीव सभासदांची संख्या १६९ झाली आणि त्यात साधारण सभासद जमेस धरून शाखेच्या एकूण सभासदांची संख्या १८२ होते.

**दि. २८ मे १९८९–** या दिवशी जिल्ह्यातील साहित्य रसिकांसाठी एक दिवसाचा मेळावा आयोजित केला होता. 'कलेने साहित्याला काय दिले ?' या परिसंवादात बी. विठ्ठल, विद्याधर व्यास, बाबूराव सडवलेकर व सौ. मंजिरी देव यांनी भाग घेतला होता. 'लेखिकांनी तरी स्त्रियांच्या प्रश्नांना न्याय दिला आहे काय ?' या परिसंवादात सौ. संजीवनी खेर, प्रा. सौ. माधवी चाफेकर, नयना आचार्य, प्रा. सौ. ज्योतिका ओझरकर व सौ. शीला मराठे यांनी भाग घेतला. काव्यस्पर्धेत सुमारे ३५ कवींनी भाग घेतला. परीक्षक म्हणून कविवर्य म. पां. भावे, सौ. पद्मिनी बिनीवाले व सौ. ज्योतिका ओझरकर यांनी काम पाहिले. पारितोषिक वितरण संस्थेचे उपाध्यक्ष कविवर्य पी. सावळाराम यांचे हस्ते झाले.

**दि. १८ जून १९८९–** संस्थेचा २० वा वर्धापन दिन. साहित्यिक डॉ. म. वि. गोखले यांचे व्याख्यान. विषय– साहित्यातील वारकरी आणि धारकरी.

**दि. २५ सप्टेंबर १९८९–** शाखेचे संस्थापक कार्यकर्ते प्रा. म. वि. फाटक यांच्या










स्मृतिदिनानिमित्त समीक्षक डॉ. म. सु. पाटील यांचे 'नव कविता : काही विचार' या विषयावर व्याख्यान झाले. प्रा. फाटक कुटुंबियांनी दिलेल्या देणगीच्या व्याजात भर घालून हे व्याख्यान आयोजित केले जाते.

**दि. १० फेब्रुवारी १९९०–** सुप्रसिद्ध नेपथ्यकार व नाट्यनिर्माते श्री. मोहन वाघ यांचे 'नाट्यनिर्मिती-काही अनुभव' या विषयावर व्याख्यान.

**दि. २६ मार्च १९९०–** ६३ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. यू. म. पठाण यांचा येथील मराठी ग्रंथ संग्रहालय, ठाणे या संस्थेच्या सहकार्याने सत्कार.

चिंचवड-पिंपरी येथे झालेल्या सहाव्या विभागीय साहित्य संमेलनात शाखेचे अध्यक्ष श्री. चिंतामण जोशी, कार्याध्यक्ष श्री. म. पां. भावे, कोषाध्यक्ष श्रीहरी भिडे, कार्यवाह पद्माकर शिरवाडकर तसेच सभासद व्ही. सित्ररकर हे उपस्थित होते. एका परिसंवादात श्री. चिंतामण जोशी यांनी भाग घेतला होता. कविसंमेलनात श्री. म. पां. भावे यांनी आपल्या कविता सादर केल्या.

६३ व्या अखिल भारतीय संमेलनालाही सर्वश्री चिंतामण जोशी, म. पां. भावे, पद्माकर शिरवाडकर, अरुण मैड, व्ही. सित्ररकर; चांगदेव काळे ही कार्यकारिणीची मंडळी उपस्थित होती. भावे यांना कविसंमेलनात निमंत्रित केले गेले होते.

शाखा प्रतिनिधींच्या ३ डिसेंबर १९८९ रोजी श्रीरामपूर येथे झालेल्या सभेस शिरवाडकर आणि माने उपस्थित होते. घटना दुरुस्तीच्या चर्चेत या दोघांनीही भाग घेतला.

कविवर्य वि. वा. शिरवाडकर तथा कुसुमाग्रज यांना ज्ञानपीठ पुरस्कार मिळाल्याबद्दल त्यांच्या नावे नाशिकला स्थापन झालेल्या प्रतिष्ठानला शाखेच्या वतीने १००१/- रु. देणगी देण्यात आली.

साहित्यिक कार्यक्रमांना गावातील मराठी ग्रंथ संग्रहालय, ठाणे नगर वाचन मंदिर, डॉ. बेडेकर विद्या मंदिर इत्यादी संस्थांनी त्यांच्या जागा देऊन जे सहकार्य दिले त्याबद्दल संस्था त्यांची ऋणी आहे.

पद्माकर शिरवाडकर कार्यवाह.

*










# प्रकाशक संमेलन

## नव्या आव्हानांना सामोरे जाण्याची सिद्धता

**प्रतिनिधी**

प्रकाशक संमेलन हे खरे तर व्यावसायिक संमलेन. महाराष्ट्रातील प्रकाशकांनी एकत्र यावे, प्रकाशन व्यवसायाशी संबंधित अडीअडचणींची चर्चा करावी, ग्रंथप्रसारासाठी नवनव्या योजनांची आखणी करावी, दूरदर्शनकडे वा सरकारकडे आपल्या मागण्यांची संघटितपणे पेशकश करून, काही पदरात पडते का ते पाहावे– अशा नानाविध गोष्टी सुलभपणे करणे सोयीस्कर जावे यासाठी हे एक उत्तम व्यासपीठ. त्याचे हे सहावे संमेलन मुंबई मराठी साहित्यसंघाच्या निमंत्रणावरून दिनांक ३ जून रोजी साहित्यसंघात पार पडले. शंभरेक प्रकाशक त्याला हजर होतेच. पण शांताराम पुरोहित, रमेश मंत्री, सुभाष भेंडे, द्वा. भ. कर्णिक, शंकर वैद्य, ज्ञानेश्वर नाडकर्णी, डॉ. सुरेंद्र बारलिंगे, उषाकिरण वगैरे मान्यवर लेखक-कलावंतही आवर्जून आले होते. त्यामुळे एकूणच या संमेलनाची शान मनावर ठसणारी होती. या संमेलनाचे अध्यक्ष मधुकाका कुलकर्णी यांनी आवर्जून आपल्या स्नेहीजनांना पाचारण केले होते. त्यामुळे हे संमेलन खरोखरच जोरदार झाले.

प्रदीप भिडे दूरदर्शनसाठी चित्रीकरण करण्यासाठी आले होते. साहजिकच आपला चेहरा दिसावा म्हणून सारेजण हसतमुख आणि ताजे तरतरीत झाले.

संमेलनाचे उद्घाटक शिक्षणमंत्री विलासराव देशमुख हे हैद्राबादहून रेल्वेने निघून सकाळी ६ ला मुंबईत पोचणार होते. उद्घाटन १० ॥ वाजता होणार होते. परंतु नऊ वाजताच विलासरावांच्या स्वीय सचिवाने रेल्वे लेट आहे आणि १२ च्या नंतर ती पोचेल अशी कल्पना प्रकाशक परिषदेच्या कार्यकर्त्यांना दिली. तेव्हा विलासरावांचे तयार भाषण वाचून दाखवावे व उद्घाटन त्यांनीच केले असे मानावे असे काहींनी सुचवले. परंतु उशिराने का होईना, ते आले तर त्यांना बोलण्यासाठी काही शिल्लक राहावे म्हणून एका ज्येष्ठ प्रकाशकाच्या हस्ते दीपप्रज्वलन करून उद्घाटन करावे असा पर्याय स्वीकारण्यात आला. त्याप्रमाणे जयहिंद प्रकाशनचे ग. का. रायकर यांच्या हस्ते उद्घाटन केले गेले. मंचावर श्री. पु. भागवत, रामदास भटकळ, वा. वि. भट हे माजी अध्यक्ष, एव्हरग्रीन माधव गडकरी, गंगाधर गाडगीळ इ. होते.

**प्रकाशकाची माहिती**

साहित्य संघाचे अध्यक्ष गंगाधर गाडगीळ हे या संमेलनाचे स्वागताध्यक्ष. त्यांनी प्रकाशक हा केवळ पुस्तके छापणारा व वितरित करणारा माणूस नसतो. लेखकाची निसर्गदत्त प्रतिभा हेरून, त्याला वाव देणारा, पैलू पाडणारा, लेखनास उद्युक्त करणारा, त्या लेखनाचे रसग्रहण व्हावे म्हणून प्रयत्न करणारा आणि त्याच्या चरितार्थाची व्यवस्था करणारा असतो,



अनुक्रमणिका






असे सांगून प्रकाशक-लेखक नात्यातील वेगळेपणाचे रहस्य प्रकट केले. त्यांच्यातील लव्ह-हेट नात्याकडेही लक्ष वेधले. प्रकाशक जे व्यावसायिक कौशल्य दाखवतो, त्यामानाने त्याला पैसा, प्रतिष्ठा मिळत नाही. मराठीतील पुस्तकांची विक्री सावकाश होते, पुस्तकाचे दुकान चालविणे अवघड, पानपट्टी– टी. व्हीची दुकाने अधिक फायदेशीर ठरतात वगैरे वास्तवाकडे लक्ष वेधून दरवर्षी दसऱ्याला ग्रंथोत्सव साजरा करावा, अशी सूचना त्यांनी केली.

गंगाधर गाडगीळ यांच्यासारख्या अग्रगण्य लेखकाने प्रकाशक हा लेखकालाही घडवतो, पैलू पाडतो असे जाहीरपणे म्हटल्यामुळे साहजिकच प्रकाशकांच्या मुद्रेवर तेज चढणारच. सारे खूष. संमेलनाचा सूर एकूणच छान जमला.

**कृतज्ञ सत्कार**

परिषदेचे कार्याध्यक्ष अनिल मेहता यांनी परिषदेच्या कार्याची स्थूल रूपरेखा पुढे केली. ज्येष्ठ विक्रेते, प्रकाशक व विशेष कर्तृत्व दाखवणारे प्रकाशक यांचा भावपूर्ण सत्कार झाला. जी. डी. शर्मा (संपादक, व्यापारी मित्र), दादा नेवे (जळगाव), वामनराव बापट (बापट आणि कंपनी, मुंबई), दिलीप भोगले (जवाहर बुक डेपो, विलेपार्ले), रामचंद्र विनायक लिमये (कोल्हापूर), ह. अ. भावे (वरदा बुक्स), खैरनार गुरुजी (नाशिक), शि. म. पवार (अमरावती) अशा ज्येष्ठ व्यक्तींच्या या सत्कारामुळे साहजिकच आपल्या आयुष्यभराच्या सेवेचे चीज झाले असे वाटावे असा हा कार्यक्रम होता. नॉर्वेचा दौरा इब्सेनच्या अभ्यासासाठी करून आलेले अनिरुद्ध कुलकर्णी आणि ३ ॥ वर्षं अखंडपणे ढवळे ग्रंथ यात्रेची कल्पना राबवणारे रघुवीर ढवळे या तरुणाचा सत्कारही केला गेला. ज्या पुस्तकांना कुठलेही पुरस्कार मिळाले असतील त्यांच्या प्रकाशकांचा प्रशिस्तपत्र देऊन गौरव करण्यात आला.

**गडकरींचे हार-प्रहार**

मधुकाका कुलकर्णी यांनी आपल्या परखड अध्यक्षीय भाषणात पाठ्यपुस्तक मंडळ, साहित्य संस्कृती मंडळ, ग्रंथाली इ. वर झोड उठविली. काही विधायक सूचनाही केल्या. माधव गडकरींनी तिथल्या तिथे कोपरखळ्या मारत मित्रवर्य मधुकाकांच्या काही सूचनांची अव्यावहारिकता स्पष्ट केली. पाठ्यपुस्तक मंडळ व साहित्य संस्कृती मंडळ बरखास्त करा अशा मागणीऐवजी त्यांची पुनर्रचना करा असे सुचविले. प्रकाशक आपापसात भांडतात. एकत्र येत नाहीत. त्यामुळे नोकरशाहीचे व सरकारचे फावते, प्रश्न सुटत नाहीत असेही त्यांनी सुनावले. ग्रंथालय संचालकांचे माणुसकीकरण व्हावे, त्यांनी लेखक-प्रकाशकांना गोठ्यातल्या गुरांप्रमाणे वागवू नये असाही स्पष्ट इशारा दिला.

**शिक्षणमंत्र्यांचा दिलासा :** ना. विलास देशमुख तोपर्यंत येऊन ठेपले. त्यांनी पाठ्यपुस्तक मंडळाचा पदसिद्ध अध्यक्ष या नात्याने मीही प्रकाशकच आहे, आणि प्रकाशकांच्या अडचणींची मला कल्पना आहे असे सांगून जमलेल्या प्रकाशकांशी एकदम जवळीक साधली. शिक्षणावर खर्च होणाऱ्या १४०० कोटींपैकी ९४ टक्के रक्कम केवळ वेतनावर खर्च होते, शंभर मुले बालवर्गात प्रवेश घेतात त्यांतील फक्त ६/७च एस. एस. सी. पर्यंत टिकतात, दोन

टक्के लोकही पुस्तके घेऊन वाचत नाहीत. वगैरे वस्तुस्थितिनिदर्शक विधाने आणि रेंगाळेलेले प्रश्न प्रकाशकांच्या प्रतिनिधींशी चर्चा करून वर्षाच्या आत सोडवण्याचे आश्वासन, यामुळे विलासरावांच्या भाषणावर सर्वजण खूप झाले. आणि या खुपीच्या लहरींमध्येच तरंगत सर्वांनी स्वरुचि भोजनाचा लाभ घेतला.

**व्यवसायाच्या स्वरूपात क्रांती**

दुपारी या संमेलनातील पहिला परिसंवाद 'प्रकाशन व्यवसायातील समस्या' या विषयावर घेतला गेला. समीक्षक शंकर सारडा हे त्याचे सूत्रसंचालक होते. पूर्वीचा प्रकाशन व्यवसाय सोपा होता. कागद-शाई-मुद्रण स्वस्त होते. उधारीत सारे मिळत होते. चांगले ग्रंथमुद्रण करणारे छापखाने होते, प्रकाशकही थोडेच होते. मोजके पण प्रामाणिक ग्रंथविक्रेते होते. ज्यात जाहिरात केली तर ग्रंथप्रेमींपर्यंत माहिती जाईल अशी ठराविक वृत्तपत्रे होती. त्यामुळे पुस्तक काढल्यावर स्वस्थ बसून ऑर्डर्स पुरवत राहणे एवढेच काम उरे. परंतु मुद्रणतंत्रातील क्रांतीमुळे आणि एकूणच महागाईमुळे या क्षेत्रांतील स्पर्धा आणि गुंतवणूक वाढली आहे. जोखीमही वाढली आहे. लेखकांना शुद्धलेखन येत नाही. हस्तलिखितांवर संस्कार करणे आवश्यक ठरते. तसे करणारे ग्रंथसंपादक आज नाहीत. पुरेसे मुद्रितशोधक नाहीत. त्यामुळे पुस्तकांचा दर्जा खालवत आहे. दुसरीकडे पुस्तकांची जाहिरात करणे परवडत नाही. दूरदर्शन-नियतकालिके यांमुळे वाचकाला मोकळा वेळ वाचनासाठी कमी मिळतो. त्यामुळे एकूणच पुस्तकांचा खप कमी होतो. काही दुय्यम दर्जाच्या पुस्तकांचे प्रकाशक कमिशन भरमसाट देऊन संस्थांच्या गळयात पुस्तके मारतात. त्यामुळे कमी कमिशनची चांगली पुस्तके मागे पडतात. ग्रंथविक्रेत्यांची चांगली साखळी नाही. नवे पुस्तक पुण्या-मुंबईबाहेर बघायलाही मिळत नाही. वितरण-प्रसिद्धी-वसुली हे प्रश्नही भेडसावतात. नव्या मुद्रण तंत्रामुळे बऱ्याच नव्या समस्या निर्माण झाल्या आहेत, परंतु त्याबरोबर प्रकाशन क्षेत्रातही पूर्वी कधी नव्हे इतकी प्रगतीची व नफ्याची शक्यताही निर्माण झाली आहे याकडे शंकर सारडा यांनी प्रारंभीच लक्ष वेधले.

अनिरूद्ध कुलकर्णी यांनी नॉर्वेमधील प्रकाशन व्यवसायाची रूपरेखा दिली. ४० लाखांच्या देशात चांगले पुस्तक ४०/५० हजार प्रतींचा खप मिळवू शकते. प्रत्येक घरात ग्रंथालय असते. त्यात जुन्या काळातील पुस्तकेही नीट ठेवलेली असतात. नवीन पुस्तकाच्या २०० प्रती निघतात. इ. तपशील लक्षवेधक होता.

ह. अ. भावे यांनी प्रकाशनक्षेत्राला भांडवलाची समस्या सर्वांत जास्त भेडसावते, त्यासाठी बुक फायनान्स कॉर्पोरेशन स्थापून कमी व्याजदराने अर्थसाहाय्य करावे असे सुचविले. अनेक नवे प्रकाशक ५०/६० पुस्तके झाल्यावर व्यावसायिक दृष्ट्या दिवाळे काढतात. स्वतःचा ग्रंथ आटोपता घेतात; गोडाऊनलाही जागा कमी पडते. इ. निरीक्षणे त्यांनी मांडली.

सन पब्लिकेशन्सचे नानासाहेब जोशी यांनी प्रकाशन व्यवसायाला लघुउद्योग म्हणून मान्यता मिळावी आणि आयकराच्या पूर्वीच्या सवलती पुन्हा लागू कराव्यात यावर भर दिला.



अनुक्रमणिका






रमेश वाडेकर यांनी शाळांना कमिशन देऊ नये. राजा राममोहन फाउंडेशनच्या खरेदीतही कमिशनचा दर कमी राहावा अशी सूचना केली.

रघुवीर ढवळे यांनी ग्रंथयात्रेच्या ७५ प्रदर्शनांच्या अनुभवावरून जे निष्कर्ष काढले ते सांगितले. ३० लाखांच्या विक्रीतील ८ लाखांची संस्थात्मक खरेदी वगळता उरलेली २२ लाखांची विक्री वैयक्तिक ग्राहकांची होती याकडे लक्ष वेधून ते म्हणाले, "लोकांना पुस्तके खूप हवी आहेत. पण त्यांच्यापर्यंत आपण पोचले पाहिजे." भांडवलाची व गोडाऊनची समस्याही त्यांनी धुडकावून लावली. खरी समस्या विक्रीची आहे. जर विक्री झटपट झाली तर भांडवल मोकळे राहील, गोडाऊनची गरजही कमीच राहील. प्रकाशकांनी ग्रंथप्रदर्शन वगैरे नव्या मार्गांचा फायदा अधिक प्रमाणात करून घ्यायला हवा असे त्यांनी सुचविले.

शंकर सारडा यांनी या परिसंवादाचे समालोचन करताना म्हटले, "हजार प्रतींची आवृत्ती ही हौस ठरते. तो धंदा होत नाही. आपले बहुतेक प्रकाशक हे हौशी प्रकाशक आहेत. पुस्तक काढण्यातच त्यांची दमछाक होते. पुस्तकाच्या विक्रीसाठी प्रयत्न करण्याची ताकदच ते दाखवत नाहीत. पुस्तकाचे हस्तलिखित स्वीकारल्यावर त्याचा संभाव्य वाचकवर्ग कुठला हे जाणून, त्या वाचकवर्गाला त्या पुस्तकाबद्दल माहिती, कुतूहल, आकर्षण निर्माण व्हावे यासाठी काही योजना आखावी लागते. ती कोणी आखत नाही. पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर ते लौकरात लौकर सर्वत्र उपलब्ध व्हावे म्हणूनही स्थायी योजना नसते. वृत्तपत्रे पुस्तकांना विपुल प्रसिद्धी फुकट देतात. परंतु तिचा फायदाही बहुतेक प्रकाशक घेत नाहीत. अभिप्रायासाठी पुस्तके वेळेवर पाठवत नाहीत. पुरस्कारांचा उपयोग खपासाठी करून घेत नाहीत. प्रकाशन व्यवसायाला खऱ्या अर्थाने व्यावसायिक व्यवस्थापनतंत्र व प्रसिद्धी तंत्र यांची जोड मिळाली तर एवढा फायदेशीर व्यवसाय अन्य नाही. त्याचे सांस्कृतिक मोल तर अमापच आहे. दूरदर्शन, आकाशवाणी, साप्ताहिक आवृत्त्या यांचा उपयोग पुस्तकांच्या प्रसिद्धीसाठी योग्य प्रकारे केला गेला तर चांगली पुस्तके दहा-वीस हजार खपवणेही अवघड जाणार नाही. प्रकाशन व्यवसायाला आजच्या इतके चांगले आणि आव्हान देणारे दिवस पूर्वी कधीच नव्हते. चांगले पुस्तक काढा आणि लाखो रुपये मिळवा असा आजचा संदेश आहे."

शंकर सारडा यांचा हा आशावाद अनेक वैतागलेल्या प्रकाशकांपर्यंत कितपत पोचला असावा, याची शंकाच वाटते. परंतु एकूण हा परिसंवाद स्फूर्तिदायक, प्रेरक झाला हे निश्चित !

'माझा नवरा-प्रकाशक' या विषयावर काही प्रकाशक-पत्नींनी बोलावे ही कल्पना खुसखुशीत होती. परंतु सौ. उषा कुलकर्णी याच एकमेव वक्त्या हजर असल्याने ती काहीशी बारगळली गेली. उषा कुलकर्णींनी मुद्रण आणि प्रकाशन यातील फरक दाखवण्यासाठी एक विनोद सांगितला तो मात्र सर्वांना आवडला असावा. एक प्रकाशक हा फरक सांगताना एका तरुणीला म्हणतो, "मी जर तुमचे चुंबन घेतले तर ते होईल मुद्रण. आणि त्यामुळे तुम्ही बाहेर जाऊन आरडाओरडा केला तर ते होईल प्रकाशन !" या वेळी मधुकाका शेजारीच बसलेले होते म्हणून बरे !










# महाराष्ट्र साहित्य परिषद

## टिळक रस्ता, पुणे ४११०३०

### वार्षिक साधारण सभेची सूचना

दिनांक ४ ऑगस्ट १९९०

स. न. वि. वि.

महाराष्ट्र साहित्य परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दिनांक **२६ ऑगस्ट १९९०** जी पुणे येथे माधवराव पटवर्धन सभागृहात **सायंकाळी ४–३०** वाजता भरणार आहे. या भेला सभासदांनी उपस्थित राहून सहकार्य करावे, अशी विनंती आहे.

या सभेत खालीलप्रमाणे कामकाज होईल.

**सभेत करावयाची कामे**

१) श्रद्धांजली.
२) मागील सभेचे कार्यवृत्त वाचून संमत करणे.
३) १९८९–९० या वर्षाचे कार्यवृत्त संमत करणे.
४) १९८९–९० चे उत्पन्न-खर्चपत्रक आणि ताळेबंद संमत करणे.
५) १९९०–९१ चा अर्थसंकल्प संमत करणे.
६) १९९०–९१ करिता हिशोब तपासनीसांची नेमणूक करणे.
७) मा. अध्यक्षांच्या संमतीने येणारे आयत्या वेळचे विषय.

आपले

| | | |
|---|---|---|
| **म. वि. गोखले**<br>कोषाध्यक्ष | **राजेन्द्र बनहट्टी**<br>कार्याध्यक्ष | **ग. प्र. प्रधान**<br>अध्यक्ष |
| **गं. मा. जोगळेकर**<br>कार्यवाह | **राजा फडणीस**<br>कार्यवाह | **चिं. शं. जोशी**<br>कार्यवाह |

**विशेष सूचना :** १) पुरेशी गणसंख्या नसल्यास सभा १५ मिनिटे स्थगित करण्यात येईल व नंतर ती रीतसर सुरू होईल. अशा वेळी गणसंख्येचे बंधन असणार नाही.

२) वरील कामकाजासंबंधी मतदार सभासदांस काही सूचना करावयाच्या असतील वा माहिती पाहिजे असेल, अगर ठराव मांडायचा असेल तर लेखी स्वरूपात तसे **२० ऑगस्ट १९९०पर्यंत कळवावे.**

अनुक्रमणिका

दिनांक ३१ मार्च १९९०

| निधी व देणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| **विश्वस्तनिधी** | | ५,२९,४२०–४५ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ४,७९,७०७–४५ | |
| आजीव समासद (८९–९०) | ५०,७१३–०० | |
| **इतर राखीव निधी** | | |
| (अ) इमारत | ८९,६४४–९४ | ८९,६४४–९४ |
| (ब) ग्रंथालय | २३,५७३–१० | २३,५७३–१० |
| (क) वाङ्मयेतिहास योजना | | ७३,३२३–६९ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ३४,०८३–७६ | |
| ८९-९० विक्री | २०,६०८–९० | |
| ३१-३-९० साठा | ४८,३००–०० | |
| वजा ३१-३-८९ साठा | २२,२७८–९७ | |
| वजा ८९-९० खर्च | ७,३९०–०० | |
| (ड) पारितोषिके व स्मृतिदिन निधी | | २,९४,१५६–०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | २,७४,१५६–०० | |
| ८९-९० मधील जमा | २०,०००–०० | |
| (इ) फर्निचर खरेदी निधी | | १०,०००–०० |
| (फ) इमारत नूतनीकरण निधी | १,००,०००–०० | |
| (ज) उत्पन्न खर्च खात्यातून वर्ग | ५०,०००–०० | १,५०,०००–०० |
| (ग) साहित्यिक साहाय्य निधी | | २,४३,३१४–५० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | १,३६,८५८–०० | |
| ८९-९० जमा | १,०६,४५६–५० | |
| इतर देणी | | ५२,७६५–३७ |
| अनामत | | १०,०००–०० |
| ग्रंथालय अनामत | | ५४,२५९–०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ४३,८९२–०० | |
| ८९-९० जमा | १०,३६७–०० | |

अनुक्रमणिका

नियम (१) प्रमाणे
रोजीचा ताळेबंद

| जिंदगी व येणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| स्थिर जिंदगी | | ५३,६८९–९६ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ५५,०६६–६२ | |
| वजा – घसारा | १,३७६–६६ | |
| गुंतवणुका | | १,२१,५५०–०० |
| (अ) कर्जरोखे (दर्शनी किंमतीचे) | ५,३००–०० | |
| कन्व्हर्जन लोन | २,७००–०० | |
| (ब) शेअर्स - से. प्रा. रेल्वेज | २,३००–०० | |
| महाराष्ट्र स्टेट को. ऑप. बँक | १,२५०–०० | |
| (क) टेल्को डिवेंचर्स | ६०,०००–०० | |
| (ड) महानगर टेलिफोन निगम | ५०,०००–०० | |
| फर्निचर व डेड स्टॉक | | १६,९५८–०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ८,३९२–२४ | |
| अधिक - या वर्षीची खरेदी | १०,४५०–०० | |
| | १८,८४२–२४ | |
| वजा - घसारा | १,८८४–२४ | |
| ग्रंथालय | | ३६,३२६–७३ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ३४,८६९–३३ | |
| अधिक ८९-९० मधील खरेदी | ५,४९३–७० | |
| | ४०,३६३–०३ | |
| वजा - घसारा | ४,०३६–३० | |
| शिल्लक साठा | | ९७,४०३–३० |
| वाङ्मयेतिहास प्रकाशने | ४८,३००–०० | |
| संशोधन प्रकाशने | २७,५३३–३० | |
| मराठी फार्स | २१,५७०–०० | |
| वीज बोर्ड अनामत | | २६०–०० |
| आयकर वसुली | | १२,९३१–०० |
| इतर येणी | | ४०,५६२–६६ |
| संचित व्याज येणे खाते | | २,९०३–४५ |

| निधी व देणी | रुपये | पैसे | रुपये | पैसे |
|---|---|---|---|---|
| हिशेब तपासनीस | | | १,०००–०० | |
| मराठी फार्स | | | १३,२४१–९८ | |
| मागील ताळेबंदावरून | १३,४१४–४३ | | | |
| ८९-९० विक्री | ४७६–७५ | | | |
| ३१-३-९० साठा | २१,५७०–०० | | | |
| वजा ८९-९० खर्च | ४००–०० | | | |
| वजा १-४-८९ साठा | २१,८१९–२० | | | |
| साहित्य परिषद पारितोषिक निधी | | | ३,९१४–२५ | |
| संशोधन प्रकाशने | | | ९,८३५–५२ | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ९,८१६–०७ | | | |
| ८९–९० विक्री | ९,४१२–२० | | | |
| ३१-३-९० साठा | २७,५३३–३० | | | |
| वजा १-४-८९ साठा | १०,६३१–१५ | | | |
| वजा ३१-३-९० खर्च (८९-९०) | २६,२९४–९० | | | |
| कै. रा. श्री. जोग स्मारक निधी | | | १०,०००–०० | |
| | | | १५,७८,४४८–८० | |

आमच्या आजच्या तारखेच्या रिपोर्टानुसार
पाटणकर अँड असोसिएटस्, चार्टर्ड अकौंटंटस् करिता
एन्. सी. भळगट
भागीदार

पुणे.
दिनांक १-८-९०

| जिंदगी व येणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
| --- | --- | --- |
| महामंडळ खाते | | १,४४१–७० |
| ठेवी | | ९,७२,७५०–०० |
| अ-विश्वस्त ठेवी | ८,८७,०००–०० | |
| ब- कार्यकारी मंडळ ठेवी | ८४,७५०–०० | |
| क-ग्रंथालय आनामत | १,०००–०० | |
| तूट | | १,४५,१८०–५६ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | २,०८,४०५–४८ | |
| शिल्लक – ८९-९० | ६३,२२४–९२ | |
| वाङ्मयेतिहास - इंग्रजी | | १,१३४–५० |
| अखेरच्या शिल्लका | | ७५,३५६–९४ |
| रोख | ५०६–४४ | |
| स्टेट बँक (वि) से. | १०,९१०–८९ | |
| बँक ऑफ बडोदा (वि) से. | १३,२१९–०० | |
| पुणे पिपल्स बँक - २७९० | ३,४४५–७० | |
| पुणे पिपल्स बँक - १५९४ | २८,१५८–९५ | |
| पुणे पिपल्स बँक - १८०४ | ३,४३८–८५ | |
| देना बँक - से. | ११,८४६–६९ | |
| देना बँक - करंट | १,४५१–५० | |
| बँक ऑफ महाराष्ट्र | १,८६४–५१ | |
| बँक ऑफ बडोदा (करंट) | ५१४–२१ | |
| | | १५,७८,४४८–८० |

गं. मा. जोगळेकर
राजा फडणीस
चिं. शं. जोशी
कार्यवाह

म. बि. गोखले
कोषाध्यक्ष

सर्जेराव घोरपडे
मधुकर परांजपे
म. श्री. दीक्षित
विश्वस्त

## महाराष्ट्र साहित्य परिषद,

शेड्यूल ११

दिनांक १-४-८९ ते ३१-३-९०

| खर्च | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| मालमत्तेसंबंधी | | १,५२६–५० |
| भुईभाडे व म्युनिसिपल कर | ४४९–०० | |
| विमा | – – | |
| जनरल मेन्टेनन्स | १,०७७–५० | |
| व्यवस्थापन | | ८२,६४८–७६ |
| पगार | २७,६८६–१० | |
| छपाई, टायपिंग व स्टेशनरी | २२,०४४–१३ | |
| टपाल व दूरध्वनी | ९,४०१–०५ | |
| कार्यकारी मंडळ | ३,२४७–०० | |
| प्रवास व प्रचार कार्य | २,५९५–५५ | |
| वीज | १७,६७४–९३ | |
| लीगल व प्रोफेशनल फीज् | | ५००–०० |
| हिशेब तपासनीस | | |
| किरकोळ खर्च | | ११,८७१–२० |
| आतिथ्य | ४,१८२–१० | |
| विश्वस्त | – – | |
| इतर (किरकोळ) | ७,६८९–१० | |
| घसारा | | ७,२९७–२० |
| इमारत | १,३७६–६६ | |
| फर्निचर व डेड स्टॉक | १,८८४–२४ | |
| ग्रंथालय | ४,०३६–३० | |
| संस्थेच्या उद्दिष्टांकरिता | | १,६४,०१३–३० |
| साहित्य-सांस्कृतिक कार्यक्रम | १२,३४४–०० | |
| शाखा सभा | ३,८५६–५० | |
| पत्रिका | ९०,७४०–२० | |
| ग्रंथालय (वेतन व इतर) | ८,३५०–०० | |
| परीक्षा | १५,७१७–९५ | |

## पुणे ४११०३०

नियम (१) प्रमाणे

या कालावधीचे उत्पन्न-खर्च पत्रक

| उत्पन्न | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| व्याज व डिव्हिडंड | | १,०५,७३०–८३ |
| देणग्या | | ८०,१५२–०० |
| अनुदान–शासकीय | | १,००,०००–०० |
| ग्रंथालय | | २,५००–०० |
| पत्रिका | | २४,०००–०० |
| इतर उत्पन्न | | ७०,१८४–०५ |
| परीक्षा शुल्क | १९,३९३–०० | |
| इतर जमा | ६,२९८–०० | |
| साधारण सभासद वर्गणी | ७,१५४–०० | |
| पत्रिका वर्गणी व जाहिरात | २०,५५१–०० | |
| संलग्न संस्था वर्गणी | २,०३७–०० | |
| प्रकाशने | १४,७५१–०५ | |

अनुक्रमणिका

| खर्च | रुपये | पैसे | रुपये | पैसे |
|---|---|---|---|---|
| पारितोषिके व स्मृतिदिन | ३३,००४–६५ | | | |
| साहित्यिक साहाय्य | | | १,४८५–०० | |
| इमारत नूतनीकरण निधी वर्ग | | | ५०,०००–०० | |
| शिल्लक | | | ६३,२२४–९३ | |
| | | | ३,८२,५६६–८८ | |

ग. मा. जोगळेकर
राजा फडणीस
चिं. शं. जोशी
कार्यवाह

म. वि. गोखले
कोषाध्यक्ष

सर्जेराव घोरपडे
मधुकर परांजपे
म. श्री. दीक्षित
विश्वस्त

अनुक्रमणिका

| उत्पन्न | रुपये | पैसे | रुपये | पैसे |
| --- | --- | --- | --- | --- |
| | | | ३,८२,५६६–८८ | |

तपासले आहे. आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार
पाटणकर अँड असोसिएटस्, चार्टर्ड अकौंटंटस् करिता
एम्. सी. मळगट
भागीदार

पुणे.
दिनांक १-८-९०

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य परिषद,

### अर्थसंकल्प

| खाते जमा | संकल्प ८९–९० रुपये | प्रत्यक्ष रुपये | संकल्प ९०–९१ रुपये पैसे |
|---|---|---|---|
| व्याज व डिव्हिडंड | ८०,००० | ८५,२३० | ९०,०००–०० |
| साहित्यिक साहाय्य निधी (व्याज) | २२,००० | २०,५०० | २२,०००–०० |
| देणग्या (योगक्षेमार्थ) | ५०,००० | ८०,१५२ | ८०,०००–०० |
| शासकीय अनुदान | १०,००० | १,००,००० | १,००,०००–०० |
| पुणे महापालिका अनुदान | ५,००० | – | – |
| सा. सं. मंडळ अनुदान पत्रिकेसाठी | १२,००० | २४,००० | १२,०००–०० |
| ग्रंथालय अनुदान | २,५०० | २,५०० | २,५००–०० |
| पत्रिका (वर्गणी, जाहिरात इ.) | ८,००० | २०,५५१ | १५,०००–०० |
| वार्षिक सा. सभासद वर्गणी | ८,००० | ७,१५४ | ८,०००–०० |
| परीक्षा शुल्क | १०,००० | १९,३९३ | २०,०००–०० |
| संलग्न संस्था वर्गणी | १०० | २,०३७ | १,०००–०० |
| किरकोळ (रद्दी इ.) | १,००० | ६,२९८ | १,०००–०० |
| संशोधन अनुदान | – | – | – |
| प्रकाशन | ५०० | १४,७५१ | ५००–०० |
| विभागीय सा. संमेलन | १,००० | – | – |
| ग्रंथ पारि. व स्मृतिदिन | ६,००० | – | – |
| फर्निचर खरेदी निधी | – | १०,००० | – |
| इमारत नूतनीकरण | – | १,००,००० | – |
| साहित्यिक साहाय्य निधी | – | १,०६,४५६ | – |
| तूट | ३९,४०० | – | – |
| | २,५५,५०० | | ३,५२,०००–०० |

**राजेन्द्र बनहट्टी**
कार्याध्यक्ष

**म.वि.गोखले**
कोषाध्यक्ष

अनुक्रमणिका






पुणे ४११०३०

१९९०–९१

| खाते खर्च | संकल्प ८९–९० रुपये | प्रत्यक्ष रुपये | संकल्प ९०–९१ रुपये पैसे |
|---|---|---|---|
| म. न. पा. कर व भुईभाडे | १,००० | ४४९ | ५००–०० |
| इमारत (देखभाल व विमा) | ३,००० | १,०७७ | १,१००–०० |
| फर्निचर व नवीन सामान | ४,००० | १०,४५० | १०,०००–०० |
| पगार व प्रॉ. फंड | २७,००० | २७,६८६ | ३२,०००–०० |
| छपाई व टंकलेखन, स्टेशनरी | ६,००० | २२,०४४ | २३,०००–०० |
| टपाल व दूरध्वनी | १२,००० | ९,४०१ | १०,०००–०० |
| वीज | ७,५०० | १५,६७४ | १०,०००–०० |
| कार्यकारी मंडळ (प्रवास) | ५,००० | ३,२४७ | ५,०००–०० |
| प्रवास व प्रचारकार्य | ३,००० | २,५९५ | ३,०००–०० |
| साहि./सांस्कृतिक कार्यक्रम | १२,००० | १२,३४४ | १३,०००–०० |
| पत्रिका– कागद, छपाई, टपाल इ. | ७०,००० | ९०,७४० | १,००,०००–०० |
| ग्रंथालय (खरेदी, वेतन इ.) | १५,००० | १३,८४३ | १५,०००–०० |
| परीक्षा | १०,००० | १५,७१७ | १८,०००–०० |
| शाखासभा (वर्गणी हिस्सा) | ६,००० | ३,८५६ | ४,०००–०० |
| महामंडळ (सभा व वर्गणी) | ५,००० | – | २,०००–०० |
| आतिथ्य | ३,००० | ४,१८२ | ५,०००–०० |
| संशोधन | १,००० | – | – |
| ग्रंथ पारि. व स्मृतिदिन इ. | ३२,००० | ३३,००५ | ३५,०००–०० |
| हिशेब तपासनीस | १,००० | ५०० | १,०००–०० |
| किरकोळ | १,००० | ७,६८९ | ८,०००–०० |
| प्रकाशने | १,००० | – | १,०००–०० |
| विभागीय सा. संमेलन | १,००० | – | ५,०००–०० |
| घसारा | ६,००० | ७,२९७ | ८,०००–०० |
| विश्वस्त व्यवहार | १,००० | – | १,०००–०० |
| निवडणूक | – | – | – |
| साहित्यिक साहाय्य निधी | २२,००० | १,४८५ | २५,०००–०० |
| इमारत नूतनीकरण | – | ५०,००० | – |
| शिल्लक | – | ६३,२२४ | १६,४००–०० |
| | २,५५,५०० | | ३,५२,०००–०० |

गं.मा.जोगळेकर　　राजा फडणीस　　चिं.शं.जोशी

अनुक्रमणिका

Maharashtra Sahitya Patrika
Tilak Road, Pune 411 030

Regd. No. 6398/57
August 1990



अनुक्रमणिका